माधवजूलियनकृत काव्यें

1 सुधारक
२ विरहतरङ्ग
३ द्राक्षकन्या
४ गज्जलाञ्जलि
५ स्वप्नरञ्जन
६ तुटलेले दुवे

---

पुढील काव्यें

1 नकुलालङ्कार
२ मधुलहरी

---

प्रा. माधवराव पटवर्धनकृत ग्रन्थ

1 फार्सी-मराठी कोश
२ अुमरखय्यामकृत रुबाया
३ छन्दोरचना
४ भाषाशुद्धि-विवेक

मुद्रक नि प्रकाशक
लक्ष्मण नारायण चापेकर,
आर्यसंस्कृति मुद्रणालय, १९७।१७
सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणें २

श्री. नरसिंह चिन्तामण केळकर

यांस

( त्यांच्या अनुज्ञेने )

सादर समर्पण

# प्रस्तावना

भाषाशुद्धीवर अेक स्वतन्त्र पुस्तक लिहावें असें माझ्या मनांत होतें; परन्तु व्यक्तींशी केलेल्या वादविवादाच्या, खण्डनमण्डनाच्या भरांत जें लेखन वा भाषण होतें त्यांतील जिव्हाळा, चटकदारपणा हा तटस्थ पुस्तकांत येणार नाही असें वाटल्यावरून, पूर्वी प्रकाशित झालेले लेख नि भाषणें हींच अेकत्र करून, त्यांत किरकोळ शाब्दिक सुधारणा, सङ्कोच वा विस्तार करून आता पुस्तकरूपाने प्रकाशित करण्यांत येत आहेत. गद्य लेखांचा हा माझा पहिलाच सङ्ग्रह आहे. ललित गद्यलेखनाची आवड म्हणून काही हे लेख लिहिण्यांत आले नव्हते. सार्वजनिक रीत्या अमुक अेक गोष्ट साङ्गितलीच पाहिजे असें जेव्हा जेव्हा मनाला वाटलें तेव्हा तेव्हा कष्ट-पूर्वक ती गोष्ट मीं साङ्गून टाकिली. परिस्थितीची निकड लागूनच मीं लेख लिहिले नि भाषणें केलीं. या गोष्टी माझ्या हातून घडतील असें मला कधीच वाटलें नव्हतें.

मराठी भाषेचें शुद्धीकरण या विषयावर ता. २१ अेप्रील १९२५ च्या केसरींत श्री. विनायकराव सावरकर यांचा १ ला लेख प्रसिद्ध झाला. ता. १२ मे १९२५ च्या केसरींत त्यांनी ४ था लेख लिहून आपली लेखमाला सम्पविली. ता. २ जून या दिवशीं श्री. स. बा. हुदलीकर यांचा विरुद्ध लेख प्रकाशित झाला. परकी शब्द मराठीचें गौरव वाढविणारे आहेत असें मत ठोकून देअून त्यांनी अशी भीति व्यक्त केली की "आज साव-रकरांचा राग मुसलमानी शब्दांच्यावर आहे तो अुद्या लहर पालटून अिङ्ग्रजी शब्दांवर होअील !" अुर्दूला त्यांनी मोठें कुतूहलजनक प्रशस्तिपत्र देअून टाकिलें आहे. ते म्हणतात, "अुर्दू भाषा खरोखरीच मर्द आहे व

त्यांतील शब्दरचना व वाक्यरचनाहि फार काव्यमय व गोड आहे !" जूनच्या अुत्तरार्धांत श्री.र. गो. भाटवडेकर यांचे दोन विरुद्ध लेख केसरींतच प्रकाशित झाले. ता. २१ जुलै या दिवशीं प्राध्यापक ब. ग. खापर्डे यांचाहि विरुद्ध लेख प्रकाशित झाला. त्यांनी अशी पृच्छा केली की अलीकडेच भाषेंत शिरलेले अिङ्ग्रजी शब्द जर टाकून देतां येणार नाहीत तर पूर्वीच रूढ झालेले फार्सी शब्द कसे हाकून देतां येणार ! हा शुद्धीकरणाचा वाद अेवढाच झाला; आणि २२ सप्टेम्बरपासून १० नोवेम्बरपर्यन्त पाच लेख लिहून सावरकरांनी या वादाचा समारोप केला.

सावरकरांच्या दृष्टीने पाहता मी तेव्हा विशेष अपराधी होतों. तेव्हा त्यांच्या लेखांना मीही अुत्तर द्यावें असें विविधज्ञानविस्तारकर्त्यांनी मला सुचवितांच मी तें काम पत्करिलें नि पारहि पाडलें. ही नवी चळवळ कितपत यशस्वी करितां येअील याचा विचार विरोधक करीत नसत. ती अशक्य वा अनिष्ट कशी दाखवितां येअील हेंच ते अधिक पहात असत. परन्तु परकी शब्द स्वभाषेंत घेतल्याने तिच्या स्वरूपावर, शब्दसम्पत्तीवर आणि नवशब्दप्रसवशक्तीवर कसे प्रतिकूल परिणाम होतात हें मला तेव्हा सावरकरांच्या लेखमालेवर विचार करीत असतांना प्रथम कळलें; आणि अल्पसङ्ख्य फार्सी शब्दांपेक्षा भराभर मराठींत घुसूं लागलेले अिङ्ग्रजी शब्दच मला शत्रूसारखे वाटूं लागले. तेव्हा त्यांच्याविरुद्ध जो लेख मी लिहिला त्याचा सावरकरांच्यावर झालेला परिणाम त्यांच्या पाठीमागून लिहिलेल्या लेखांत दिसतो. तो माझा लेख या पुस्तकांत आरम्भींच मी दिला आहे. त्यावरून माझी त्या वेळची भूमिका वाचकांच्या ध्यानांत येअील. सार्वजनिक चळवळ करण्याची धमक आणि सवड माझ्याजवळ नसल्याने मीं स्वतःपुरती तरी सुधारणा करून टाकण्याचें ठरविलें. त्या वेळीं माझे काही स्नेही या सुधारणेला अनुकूल असल्याने आम्ही असा अेक नियम केला की अेकमेकाशी बोलतांना नेणतेपणीं अिङ्ग्रजी शब्द अुच्चारण्यांत आला तर त्याला अेक दिडकी दण्ड असावा.

मराठी पर्याय सुचत नाही म्हणून आगाअू सूचना देअून अिङ्ग्रजी शब्द वापरल्यास दण्ड नसे. प्रथम प्रथम आम्हांला हा दण्डक फार भोवला; 'फण्ड' शब्द वापरल्यानेच निर्घीत काही दिडक्यांचा दण्ड भरला गेला! पण लौकरच आम्हाला शुद्ध मराठी बोलण्याची सवय झाली. चामचक्षी (पैशाचें पाकिट), ताप-नळी, तेलचूल, डब्यांची सोड-जोड (शण्टिङ्ग), रूळरस्ता अित्यादि शब्द याच काळांत जन्म पावले. विरहतरङ्गांत मोटारीला धूर-चाकी हा शब्द योजण्यांत आला तो याच काळांत. लौकरच आमच्या या मित्रमण्डळाची पाङ्गापाङ्ग झाल्याने हें कार्य थाम्बलें. तरी माझ्या लिखाणा-पुरता मी अिङ्ग्रजी शब्दांचा बहिष्कार नि स्वकीय शब्दांचा पुरस्कार करी-तच राहिलों.

१९३२ च्या डिसेम्बरांत, कोल्हापूर येथील महाराष्ट्र साहित्य सम्मेल-नाच्या विषयनियामक समितींत जो बनाव घडला तो पृ. ३६ वर वर्णिले-लाच आहे. त्या घटनेमुळेच या थण्डावलेल्या चळवळीला नवें बळ आलें. त्या धमकावणीमुळे अल्पसङ्ख्य फार्सी शब्दांचें चारित्र्य सूक्ष्मपणाने पारख-ण्यास मी सज्ज झालों; आणि मला असें स्पष्ट दिसून आलें की कित्येक फार्सी शब्दांनी मूळ मराठी पर्यायांना नाहीसें केलें आहे. या फार्सी शब्दां-वर बहिष्कार टाकल्यावाचून मराठी शब्दाची आठवण होणें अशक्य झालें आहे. परकी शब्द मराठींत घेतल्याने मूळचे शब्द जर निष्कारण नाहीसे होत असतील तर शब्दसम्पत्तींत पडणारी भर भ्रामकच मानिली पाहिजे. माझ्यापुरता तरी आता मी फार्सी शब्दांवरहि बहिष्कार टाकला. हा बहि-ष्कार कृतींत अुतरूं लागतांच अडचणी जाणवूं लागल्या, आणि त्यांचें निराकरण करण्यांत माझें मत वारंवार कसोटलें जाअूं लागलें. नाशिक येथे ता. १६ सप्टेम्बर १९३३ या दिवशीं महाराष्ट्र कविसम्मेलनाचा अध्यक्ष या नात्याने मीं जें भाषण केलें तें शुद्ध मराठींत करण्याचा मीं प्रयत्न केला तरीहि त्यांत अर्क, कमी, खुलासा, गरज, चेहरा, जमणें, जागा, डफ, तमाशा, तऱ्हा, तुणतुणें, दिवाणखाना, नखरेदार, नाजूक,

फाजील, बदलणें, बाग, बाजार, बाबत, बारकाओी, मन्दी, मेज, व, शाहिरी, सक्ती, सफाओी, सफेता, हाल, हुशारी, आणि हौशी असे ३० फार्सी शब्द आलेच! लेखकांचें भाषाविषयक कर्तव्य आहे तें मीं या भाषणांत पुढील शब्दांत साङ्गितलें आहे:—"जेणेंकरून भाषा आपल्या नडी भागविण्यास स्वत: समर्थ होओील, नवनव्या कल्पना प्रकट करण्यास लागणारे नवनवे शब्द निर्माण करण्याची सर्गसक्ति तिच्यांत येओील अशा रीतीने स्वभाषेचें सङ्गोपन करणें हें प्रत्येक लेखकाचें कर्तव्य आहे. थोडीशी दुर्बोधता पत्करूनहि भाषेची सेवा कवींनी नि साहित्यसेवकांनी करावीच अशी दूरदर्शी लोकांची अपेक्षा आहे."

घाओीने हें भाषण लिहून काढीत असतांना शुद्ध मराठी लिहिण्यांत जरी मला तितकेसें यश आलें नाही तरी माझी भाषाशुद्धीची अिच्छा नष्ट झाली नाही. भाषाशुद्धीची सार्वजनिक घोषणा करण्याची अिच्छा मनांत मधून मधून बळावे. असें करण्याला लोकांनी मला १९३४ पासून वेळोवेळीं सन्धि दिली; आणि म्हणूनच मला माझा सेवाधर्म साम्भाळून गेल्या ३।४ वर्षांत अजरें, अमदाबाद, अिचलकरन्जी, अिस्लामपूर, औन्ध, कऱ्हाड, चिकोडी, नागपूर, निपाणी, पुणें, बडोदें, बेळगांव, मण्डलेश्वर, मिरज, मुम्बओी, वर्धा, विजापूर, साङ्गली, सातारा, सोलापूर, हैद्राबाद अित्यादि ठिकाणीं विद्यार्थ्यांच्या नि बहुजनसमाजाच्या पुढे मला भाषाशुद्धीवर व्याख्यानें देतां आलीं. कित्येक ठिकाणीं दोन दोन, तीन तीन व्याख्यानेंहि झालीं. भाषाशुद्धीचा प्रश्न मराठीपुरताच आहे असें मला वाटत नाही, म्हणून या विषयावर अिङ्ग्रजींतहि मीं अेक लेख लिहून तो मद्रासच्या त्रिवेणीमासिकांत प्रकाशित केला. प्रथम प्रथम हा विषय केवळ कुतूहलजनक वाटे. पुढे पुढे बहुजनसमाजाची या चळवळीला सहानुभूति मिळूं लागली. आश्चर्याची गोष्ट अशी की विरोध सुशिक्षित लेखकांच्याकडून होत आला आहे; आणि आपल्या बुद्धीचा अुपयोग ते आपल्या चुकीची सुधारणा करण्याकडे न करितां तिचें समर्थन करण्याकडे करीत आले आहेत. असें

करितांना त्यांनी जे जे कोटिक्रम लढविले त्यांच्यावर तोड काढण्यासाठी मला अधिकाधिक विचार करावा लागला. प्रा. दत्तो वामन पोतदार, प्रा. कृष्णाजी पाण्डुरङ्ग कुलकर्णी, श्री. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर. प्रा. श्रीनिवास नारायण बनहट्टी अित्यादि आक्षेपकांचा मी फार आभारी आहें. श्री. नरसोपन्त केळकर हेहि मूळचे विरोधकच. श्री. क्षीरसागरांनी जो लेख भाषाशुद्धीविरुद्ध महाराष्ट्रशारदामन्दिरांत वाचला तो केळकरांना आवडला आणि त्यांनी अगत्यपूर्वक तो सह्याद्रींतून प्रकाशित करविला. पुढे पुण्यांतच वसन्तव्याख्यानमालेंत आणि शारदोपासकसम्मेलनांत चर्चा झाल्या. १९३६ च्या नोवेम्बरांत जेव्हा जळगांव येथे महाराष्ट्रसाहित्य-सम्मेलनाच्या अध्यक्षस्थानीं माझी निवडणूक झाली तेव्हा अध्यक्षीय भाषणांतून याच प्रश्नाची मीं चर्चा केली. श्री. काकाजी कालेलकर यांनी ही चळवळ हाणून पाडण्याचा निश्चय आधीच वर्तमानपत्रांतून घोषिला होता. भर सम्मेलनाच्या पुढे त्यांनी पुढील ठराव माण्डला. "मराठी भाषेंत चाङ्गले, अर्थवाही, रूढ शब्द असूनहि त्यांचे अैवजी त्याच अर्थांचे परदेशी शब्द, परकी भाषेच्या प्रतिष्ठेमुळे किंवा केवळ चालढकलीमुळे नव्याने दाखल करण्याची किंवा दाखल होअूं देण्याची संवय आपल्या लोकांत दिसून येते ती अनिष्ट आहे, असें या सम्मेलनाचें ठाम मत आहे. जुने आणि नवे रूढ मराठी शब्द हाच मराठी भाषेचा खरा पाया आहे. या शब्दांचा नित्य अुपयोग करून त्यांचें जतन करणें हें मराठी बोलणाऱ्या सर्व लोकांचें कर्तव्य आहे. मात्र मराठींत रूढ होअून बसलेल्या व आज प्रचलित असलेल्या कोणत्याहि शब्दाला तो मूळचा परदेशी (अुदा. फार्शी, अरबी, पोर्तुगीज किंवा अिङ्ग्रजी होता) म्हणून बहिष्कृत करण्याची नीति या सम्मेलनाला मान्य नाही." स्वदेशी वस्तु वापरा पण विदेशी टाकूं नका या अुपदेशांत जी सङ्गति आहे तीच काकाजींच्या ठरावांत दिसते. परदेशी वस्तूविषयींचा पक्षपात लोकांच्या हाडींमासीं रुळलेला आहे हें जर मान्य तर परदेशी वस्तूवर बहिष्कार टाकल्यावाचून स्वदेशीची आठ-

चण होणारच कशी ! प्राध्यापक शङ्करराव पेण्डसे यांनी अशी अुपसूचना माण्डली की मूळ ठरावांतील शेवटलें वाक्य गाळून टाकावें. काकाजींना हेंच वाक्य विशेष महत्त्वाचें वाटत होतें. ते ही अुपसूचना कशी स्वीकारणार ! शेवटीं ही अुपसूचना मतास टाकिली तेव्हा ती ५५ विरुद्ध ६५ मतांनी सभेस मान्य असल्याचें दिसून आलें. विषयनियामक समितींत ही अुपसूचना फेटाळून लावण्यांत आली होती ! अुपसूचना मान्य होते असें बघतांच अचानक अेका गृहस्थांनी मतनोन्दणीची मागणी केली या गृहस्थांचा परिचय मी अितरत्र पृ. १६१ वर करून दिलाच आहे. होती. या मागणीमुळे सभागृहांत अेकच गोन्धळ माजला. साहित्यिकांत थोडासा विचारविनिमय होअून मूळ ठराव नि अुपसूचना दोन्हीं मागे घेण्यांत आलीं ! अशा रीतीने या सम्मेलनांत भाषाशुद्धीच्या चळवळीची मान मुरगळण्याचा प्रयत्न फसला. भाषाशुद्धीचा ठरावहि तसा मान्य झाला नाही पण अशी चळवळ नुसता ठराव मान्य झाल्याने यशस्वी होणारी नाही. तरी नन्तर भाषाशुद्धीचे विरोधक मामा वरेरकर यांच्या अध्यक्षतेखालीं ठाणें येथे ज मुम्बअी आणि अुपनगर यांचें सम्मेलन भरलें त्यांत श्री. रामचन्द्र महादेव आठवले आणि अनन्त हरि गद्रे यांच्या प्रयत्नाने भाषाशुद्धीचा ठराव प्रचण्ड बहुमताने मान्य करण्यांत आला.

असो; माझ्या जळगांवच्या अध्यक्षीय भाषणावर प्रा. बनहट्टी यांनी विहङ्गम मासिकांतून विस्तृत टीका केली, पण त्याच वेळीं श्री. नरसोपन्त केळकर यांचा तात्त्विक विरोध मावळला. अध्यक्षीय भाषण वाचून पाहतां शुद्ध स्वदेशी शब्द घालण्याच्या आग्रहानेहि तें सहसा कोठे दुर्बोध किंवा हास्यास्पद झालें आहे असें मला वाटत नाही असा त्यांनी जो स्पष्ट अभिप्राय दिला तो वाचून मला स्वाभाविकपणेंच फार समाधान वाटलें. भाषाशुद्धीच्या तत्त्वाला त्यांनी प्राञ्जलपणें मान्यता देअून तपशीलाच्या चर्चेची मागणी केली. अितक्या चळवळीनन्तर भाषाशुद्धीच्या तत्त्वाला महाराष्ट्रांतील अग्रेसर लेखकाची मान्यता मिळाली ! श्री. केळकर यांनी अितक्या

वर्षांची जडलेली संवय या वयांत षष्ठ्यब्दपूर्तीनन्तर सोडून नवी सवय लावून घेण्याचा निश्चय करावा हें त्यांच्या तत्त्वनिष्ठेचें नि प्रगमशीलतेचें द्योतक आहे. आता श्री. सावरकर हेहि निर्बन्धविमुक्त झाले आहेत. तेव्हा या चळवळीची धुरा ते आपल्या बळकट खान्द्यावर वाहतील याविषयी शङ्का नाही. या चळवळीविरुद्ध नवीन असा अेखादा आक्षेप आता निघेल असें वाटत नाही. कार्य द्विविध आहे. फार्सी शब्दांना पर्याय सुचविण्याचें कार्य झालें आहे. अिङ्ग्रजी शब्दांना पर्याय सुचविण्याचें अधिक अवघड काम मात्र राहिलें आहे. मी माझे लेख, भाषणें नि कामाचा वृत्तान्त प्रकाशित करून भाषाशुद्धीच्या कैवाऱ्यांचा नि विरोधकांचा निरोप घेत आहें. विरोधकांशी जे माझे वादविवाद झाले त्यांत अशिष्ट असें काहीच घडलें नाही. प्रतिपक्षाच्या म्हणण्याचा मी विपर्यास केला असा कोणीहि आरोप केला नाही हें माझें सुदैव होय. अितकेंच नव्हे तर ता. २५ मार्च १९३८ च्या ज्ञानप्रकाशांत 'शब्दांच्या अर्थाची प्रभावळ' या प्रत्युत्तरांत व्याकरणाभ्यासी श्री. गो. कृ. मोडक यांनी असें म्हटलें आहे की "या लेखाच्या अुत्तरांत रा. माधवराव यांनी अत्यन्त सरळपणा ठेविला आहे. माझ्या म्हणण्यांतील विपर्यास मुळीच केला नाही." त्यांनी दिलेल्या या प्रशस्ति पत्राकरिता मी त्यांचा फार आभारी आहें; असो. यापुढे निराळें अेखादें काम मीं स्वीकारलें तरी परकी शब्द न वापरणें, जुन्या मराठी शब्दांचा आठव ठेवून पुरस्कार करणें आणि नव्या नडी स्वावलम्बनाने कष्टून भागविणें या गोष्टी मी करीत राहीनच.

या पुस्तकांतील लेख वाचून फार तर भाषाशुद्धीला अनुकूल मत होअील; परन्तु हें मत कृतींत अुतरायला बहिष्कार्य आणि पुरस्कार्य शब्दांची सूचि पाहिजे. रत्नागिरी येथील 'भाषाशुद्धिलिपिमण्डळा'चे अध्यक्ष श्रीयुत अ. स. भिडे यांनी नुकताच (१९३७ च्या डिसेम्बरमासीं) आपला शुद्ध शब्दकोश प्रकाशित केला आहे. तो माझ्या १९२५ मध्ये प्रकाशित झालेल्या फार्सी-मराठी कोशावर आधारलेला आहे हें अुघड आहे. तथापि

श्री. भिडे अितकेंच म्हणतात की "फार्सी-मराठी कोश सहज चाळतां चाळतां कितीतरी फार्सी शब्द मराठीमध्ये अेकजीव झालेले आढळले. पुढे विविध मराठी शब्दकोश जमविण्याचें कार्य चालू करून मराठींत घुसलेल्या शब्दांची टिपणी करण्यास प्रारम्भ केला...बॅ. सावरकर यांनी प्रत्यक्ष सूचना देअून कार्यपद्धतीची दिशा दाखविली." परन्तु माझ्या फार्सी-मराठी कोशावरूनच जर, 'चाळतां चाळता' नव्हे तर काळजीपूर्वक टांचण करण्यांत आलें असतें तर अक्कल, अजब, अत्तर, कमी, टन्चाअी, बस्स, माहीत, मेहनत, शिकार, हजर, हमी अित्यादि अनेक बहिष्कार्य शब्द देण्याचें राहून गेलें नसतें, आणि कैफ, जोर, टन्चाअी, तजेला, धास्ती, नक्की, बाजू, बिचारा, बिदागी, माहिती अित्यादि बहिष्कार्य फार्सी शब्द त्यांनी दिलेल्या तदर्थक स्वकीय शब्दांत दिसले नसते. या कोशांत हा दोष दिसल्यानेच मला पुन्हा तसा कोश या पुस्तकांत निरुपायाने द्यावा लागला आहे. अितकें करूनहि काही बहिष्कार्य शब्द सुटले असल्यास वाचकांनी क्षमा नि कृपा करून मला कळवावें. मराठी पर्याय देतांना संस्कृत नव्हे तर रायनळ मराठी शब्दांची अुपस्थिति व्हावी तशी होत नाही. या प्रकरणीं बहुजनसमाजाचें साहाय्य पाहिजे. परन्तु या कोशावरून कोणत्या शब्दांना बहिष्कृत करावयाचें, निदान गौण मानावयाचें, हें तरी कळेल. अिङ्ग्रजी भाषेतून आलेल्या शब्दांना मराठी पर्याय सुचविण्याचें कार्य अितकेंच निकडीचें आहे पण तें कोणी तरी अेखादी संस्था स्थापून करावें हें बरें, अेकट्यादुकट्याने कार्य करून विशेष कार्यसिद्धि होत नाही.

गुढीपाडवा शके १८६०<br>(ता. १ अेप्रील १९३८)<br>निवान्त, प्रभात रस्ता, पुणें ४

माधवराव पटवर्धन

# भाषाशुद्धि-विवेक

## १ मराठीवरील भयङ्कर सङ्कट[१]

रा. विनायकराव सावरकरांनी 'मराठी भाषेचें शुद्धीकरण' या विषयावर केसरींत अेक लेखमाला लिहून अेका महत्त्वाच्या प्रश्नाकडे महाराष्ट्राचें लक्ष वेधिलें आहे यासाठी प्रथमतः त्यांचे आभार मानणें अवश्य आहे. मराठीच्या स्वत्वसंरक्षणाच्या नि अभिवृद्धीच्या दृष्टीने सावरकरांच्या ओजस्वी नि अूर्जस्वल लेखमालेवर विचार करीत असतांना, मराठी भाषा अेका अदृश्य परन्तु भयङ्कर अशा सङ्कटाच्या जबड्यांत सापडली आहे असें स्पष्ट दिसून आलें; आणि अेका नवीन विचारप्रणालिकेला चालना मिळाली. त्यामुळे सावरकरांच्या मर्यादित चळवळीविषयी जरी मला विशेष सहानुभूति नाही तरी तिचा यथामति परामर्श घेअून नन्तर भावी अनर्थाविषयी मी माझे विचार मराठीची पोटतिडीक बाळगणाऱ्यांपुढे माण्डूं अिच्छितों. मराठीचें मराठपण न जातां तिचें गोमटेंच व्हावें ही अिच्छा प्रत्येक मराठ्यास, महाराष्ट्रीयास आहे असें धरून चालायला प्रत्यवाय दिसत नाही.

सावरकरांनी सुचविलेलें मराठी भाषेचें शुद्धीकरण आणि धार्मिक शुद्धीकरण यांत भेद आहे. बलात्काराला अथवा वेडगळ समजुतीला बळी पडून किंवा स्वार्थामुळे बुद्धि भ्रंश पावून परधर्मांत गेलेल्या परन्तु हिन्दुधर्मावरील प्रेमामुळे परत हिन्दुधर्मांत नि हिन्दुसमाजांत येअूं अिच्छिणाऱ्या

---

१ हा लेख विविधज्ञानविस्तारमासिकाच्या (५६।१०) आक्टोबर १९२५ च्या अङ्कांत प्रकाशित झालेला आहे. या लेखाचा काही भाग संस्करण करून १९२७ मध्यें प्रकाशित झालेल्या छन्दोरचनेच्या १ ल्या आवृत्तींत घेतला होता.

लोकांना धार्मिक शुद्धीकरण हें हिन्दु करून घेतें. परन्तु सावरकरांच्या मतें अुर्दू शब्दांच्या प्राणघातक मुसल्मानी स्पर्शापासून स्वभाषेस मुक्त नि शुद्ध करून घेणें म्हणजे मराठी भाषेचें शुद्धीकरण होय. सावरकरांच्या या चळ-वळीची अुभारणी ही हिन्दी मुसल्मानांच्या अहिन्दी धर्मवेडामुळे वाटणाऱ्या सन्तापावर आणि मराठी भाषेच्या अभिमानावर झालेली आहे.

मुसल्मानांची चढेल नि दण्डेल वृत्ति पाहून, हिन्दुस्थानाचा ज्यांना जिता अभिमान आहे परन्तु राष्ट्राकरिता हिन्दुत्वाचा त्याग करण्याअितकी अुदासीनता ज्यांच्यांत नाही अशा काही सात्त्विक अनत्याचारी माणसांना सुद्धा तीव्र सन्ताप वाटणें शक्य आहे; "आणि मुसल्मानी परदेशी शब्द शक्य तितके आपल्या लेखणीस वा वाचेस न विटाळतील अशी सावधा-नता ठेविली पाहिजे" अशी त्यांना अिच्छा होणें हें त्या सन्तापाचेंच द्योतक आहे. प्रतिस्पर्ध्याला आपल्या मनःक्षोभाची जाणीव करून देण्याचीं जीं साधनें आहेत त्यांतील बहिष्कार हें अेक होय. कितीहि बला-त्कार, कितीहि अन्याय झाला तरी निर्लज्ज कोडगेपणाने तो सहन करणें, कितीहि अपमान झाला तरी स्वाभिमानशून्य बधिर मनाला त्याचें काहीच न वाटणें, असल्या लाजिरवाण्या जिण्यापेक्षा चीड येअून निराशेने जिवाचें बरेंवाअीट करून घेण्यास प्रवर्तणें हें शतपटीने बरें होय. पुन्हा, प्रतिस्पर्ध्याला आपल्या दुखावलेल्या भावनांची जाणीव करून दिल्यानेच कित्येकदा आपला कार्यभाग साधतो. म्हणून बहिष्काराच्या मुळाशीं असलेल्या सन्तापाला आत्मिक मूल्य आहे; तथापि बहिष्कार हें साध्य नसून तें अन-त्याचारी विरोधाचें, निष्क्रिय निराशेचें अेक शस्त्र आहे हें विसरून चाला-वयाचें नाही.

निरुपाय होअून ज्या वेळीं मनुष्य आपला सन्ताप व्यक्त करितो त्या वेळीं व्यावहारिक हिताहिताचा तो विचार करीतच नाही. मुसल्मानांच्या अहिन्दी धर्मवेडाचा तीव्र निषेध करण्यापुरताच मुसल्मानी शब्दांवर बहिष्कार घालावयाचा असेल तर जो तो आपआपल्या सन्तापाच्या तीव्रतेप्रमाणे

न्यूनाधिक कालपर्यंन्त त्या शब्दांच्यावर बहिष्कार घालील. हा प्रश्न स्वाभिमान व्यक्त करण्याचाच असल्याने, असें केल्यास लोक हसतील कीं काय, मराठीची शब्दसम्पत्ति अुणावेल कीं काय, अितकेंच नव्हे, तर हा बहिष्कार शक्य आहे कीं नाही याहि गोष्टींचा विचार न करितां तो हा बहिष्कार स्वतःपुरता आचरणांत आणील. ज्या भावनेच्या क्षोभामुळे मनुष्य अशा सात्त्विक बहिष्कारास प्रवृत्त होतो ती भावना प्रशंसनीय आहे यांत शङ्का नाही. हा क्षोभ निदान चेतनेची चुणूक तरी दाखवितो; परन्तु कालमानाने सन्ताप थोडासा शमल्यावर मनुष्याला पुढील अुपायाची योजना केल्यावाचून गत्यन्तर नाही. निष्क्रिय असहकाराला विधायक कार्यक्रमाची आवश्यकता लागते ती अिथेच. आज मूठभर मुसल्मान शब्दांची मराठींतून हकालपट्टी केली तरी तेवढ्याने हिन्दुमुसल्मानांतील वैषम्याचा प्रश्न सुटणार आहे काय ! या प्रश्नाचा समाधानकारक शेवट करावयाचा असला तर हिन्दूंनी मुसल्मानांचा द्वेष करून तो क्षुल्लक गोष्टींत व्यक्त करण्यापेक्षा आदरपूर्वक मुसल्मानांच्या अेकीचें निदान करून, त्यांच्या सामर्थ्याचीं कारणें शोधून, हिन्दूंवर अधिक प्रेम करून, अखिल हिन्दुसमाज सुसङ्घटित आणि सामर्थ्यवान् होअील अशा योजना क्रियेंत आणिल्या पाहिजेत. समर्थाचा स्वाभिमान दुखविण्याची कोणास अिच्छाच होत नाही, अिच्छा झाली तर छाती होत नाही, आणि मूर्खपणाने छाती झाली तर त्याला कडक शिक्षा मिळाल्यावाचून रहात नाही.

हिन्दी नि बङ्गाली या भाषांतील मुसल्मानी शब्दांच्या अुचाटनावरून सावरकरांस मराठी भाषेच्या शुद्धीकरणाची स्फूर्ति झाली असावी असें दिसतें. ते म्हणतात, "या वेळेस हिन्दु हिन्दी लेखकांत अेखाद दुसरा अरबी अित्यादि विदेशी शब्द येअूं न देण्याचे कामांत अगदी अहमहमिका चाललेली आहे. अशा अविश्रान्त प्रयत्नाने आजची हिन्दी अितकी शुद्ध व (नि) परदेशी शब्दांच्या कचाट्यांतून निर्मुक्त झालेली दिसत आहे की तिच्या त्या निर्मळ रूपास पाहून मराठीसहि आपल्या अङ्गावर अुडालेल्या चिन्धो-

त्यांस आपण अजूनहि धुतलें नाही याची लाज वाटावी...अुत्तरीय प्रगतिशील अशा बङ्गाली व (नि) हिन्दी भाषांशी अुत्तमत्वांत, शुद्धत्वांत व (नि) सुसंस्कृतत्वांत जर मराठीस हार जावयाचें नसेल तर तिला त्यांच्याप्रमाणेच मुसल्मानी परदेशी शब्द शक्य तितके आपल्या लेखणीस व वाचेस न विटाळतील अशी सावधानता ठेविली पाहिजे." 'शक्य तितके' या दोन शब्दांवरून सावरकरांनी आपल्या चळवळीच्या शक्याशक्यतेचा विचार केला आहे असें दिसतें; आणि हा बहिष्कार केवळ सन्ताप व्यक्त करण्यापुरता नसावा अशी शङ्का येते. कारण, सन्तापव्यक्तीच्या वेळीं मनुष्य शक्याशक्यतेचा फारसा विचार करीत नाही.

मुसल्मानी परदेशी शब्द आपल्या लेखणीस मुळीच न विटाळतील अशी सावधानता हिन्दी लेखक घेत आहेत असें वस्तुतः दिसत नाही. चण्डीप्रकाश 'हृदयेश' यांसारखे अगदी सुसंस्कृत हिन्दी लिहिण्याची प्रतिज्ञा करणारे काही लेखक असतील. त्यांची भाषासरणी पाहून वाचकांस मराठींतील 'जीवनसन्ध्या' किंवा पावगींचा 'विलायतचा प्रवास' अशा ग्रन्थांतील भाषेची आठवण झाल्यावाचून रहाणार नाही. परन्तु अशी गाळीव भाषा लिहिण्याचा प्रयत्न करणारे 'हृदयेश' यांच्याहि लिखाणांत सजा, मालूम, अेकबारगी, तब्ला अित्यादि काही विदेशी शब्द आढळतातच. यावरून शुद्ध संस्कृतप्रचुर भाषा लिहितां येणें शक्यच नाही असें मात्र नव्हे. शब्द हे माणसांकरिता आहेत, माणसें हीं शब्दाकरिता नव्हत. शब्दांना लेखक देअील आणि वाचक अनुमति देतील तो अर्थ मान्य करावा लागतो. पुन्हा, बहुजनसमाजाची भाषेवरील सत्ता सुद्धां अितकी अनियन्त्रित नि अव्यय नसते की विद्वान् विचारी तपस्वी व्यक्ति आपला विक्षिप्तपणासुद्धा त्या भाषेवर थोडाबहुत लादूं शकणार नाही.

मराठींतून फार्सी शब्दांची हकालपट्टी करण्याची ही चळवळ आहे तेव्हा फार्सी शब्द मराठींत आले कसे याचा विचार करणें अिष्ट आहे. मूठभर परदेशीय मुसल्मानांनी येअून महाराष्ट्रांत राज्यें स्थापिलीं तेव्हा साहजिकच

त्यांच्या फार्सी भाषेला—म्हणजे मूळची आर्य असूनहि अरबीच्या आक्रमणानें जवळ जवळ अनार्य झालेल्या फार्सीला—राजकीय महत्त्व आलें. फर्मानें, खलितें, सनदा यांची भाषा जरी फार्सी झाली तरी देशाचे नि राज्याचे नानाविध व्यवहार हे देशी बोलींतूनच होत होते. राज्यव्यवहार नि युद्ध-व्यवहार यांतील काही संज्ञा जरी फार्सीतून आल्या तरी मराठी भाषेला नष्ट करून टाकण्याचा केव्हाहि पद्धतशीर प्रयत्न झाला असें म्हणायला आधार नाही. अुलट अेकनाथ, दासोपन्त प्रभृति सन्तांनी हिन्दु धर्मांची नि मराठी भाषेची परम्परा मुसल्मानांच्याच राजवटींत चालू ठेविली. फार्सी—अरबी भाषांचें अध्ययन तेव्हा मर्यादित असल्यामुळे भाषेवर सङ्कट असें ओढव-लेंच नाही. दैनिक व्यवहारांतील काही फार्सी शब्द मराठींत शिरले नि रूढ झाले;[१] पण फार्सी शब्दांचें अवडम्बर असें केवळ मायन्यांतून नि सर्कारी पत्रव्यवहारांतून राहिलें. फार्सी वाङ्मयांत पदोपदीं आढळणारे कित्येक शब्द मराठींत आलेले दिसत नाहीत; आणि पत्रव्यवहारांत, राजकारण नि युद्ध यांविषयी जे पुष्कळ फार्सी शब्द दिसतात त्यांतले बहुतेक आजमितीस मराठींत लुप्तप्राय झाले आहेत.

आता सावरकर काय म्हणतात तें पहा. “(शिवाजी) महाराजांनीहि रघुनाथपण्डिताकरवीं राज्यव्यवहारकोश रचवून राजलिखित मराठींत ठेवा-वयाची सुरवात (आरम्भ) करवून व (नि) संस्कृत भाषेच्या अभ्यासास अुत्तेजन देववून मराठीस मुसल्मानी कचाटींतून सोडविण्याचा प्रयत्न केला. त्याचा परिणामहि हळुहळू होअून नानासाहेब पेशव्यांच्या (पन्तप्रधानांच्या) अुत्तर हिन्दुस्थानांतील पत्रांत व (नि) अन्तीं मोरोपन्तांच्या शुद्ध, सरळ (नि) म्लेञ्छ शब्दांच्या सम्पर्काने अकलुषित असलेल्या सुन्दर कवितेंत दिसून येणारें शुद्ध स्वरूप मराठीस लाभूं लागलें. श्रीशिवरायापासून मोरोपन्तां-पर्यन्त मराठींतून मुसल्मानी शब्दांची अुचलबाङ्गडी करण्याचे प्रयत्न

१ पण या फार्सी शब्दांवाचूनहि मराठीचें अगदी अडलें होतें आणि म्हणूनच ते रूढ झाले असें नाही.

चालले असतांहि तींत राजकीय व (नि) व्यावहारिक विषयांवरील अनेक शब्द अितस्ततः लपून छपून राहून गेले ते तेव्हापासून आजपर्यन्त तसेच राहिलेले आहेत.”

या विधानांत सावरकरांचें मराठी अितिहासाविषयीचें अज्ञान वा विपर्यस्त ज्ञान व्यक्त होत आहे. अैतिहासिक सत्याचा बुद्धिपुरस्सर विपर्यास त्यांनी केलेला नसेल, तथापि राष्ट्रीय दृष्टीने भूतकालाचें निरीक्षण करीत असतांना दृश्य विकृत कसें दिसतें त्याचें हें अेक अुदाहरण आहे. अिङ्ग्रजी शिक्षणानन्तर, पाश्चात्य संस्कृतीच्या संसर्गाने ज्या देशाभिमान, धर्माभिमान, भाषाभिमान अित्यादि गुणांची थोरीव आम्हांला पटली ते गुण आमच्यांत असलेच पाहिजेत असें वाटून आम्ही त्यांचा सम्बन्ध शिवराज्याशी जोडूं पाहतों. पण हिन्दुधर्माचा आम्हांला अभिमान असता तर कुळ-वाडीसाठी ब्राह्मण मुसलमान झाले नसते, हिन्दूंच्या देवळाशेजारीं आणि कित्येकदा डोक्यावरें सुद्धा, पीराची स्थापना होअूं शकली नसती,[1] मुसल्मान साधूंनी स्थापिलेल्या पन्थाला ते मिळाले नसते, आणि अुध्वस्त झालेलीं हिन्दु पुण्यक्षेत्रें पाहून त्यांचे बाहु स्वस्थ बसले नसते. ‘मराठा तितुका मेळवावा’ ही समर्थोक्ति, शिवाजीच्या अेका संस्मरणीय पत्रांतील ‘हिन्दवी स्वराज्य’ हा शब्दप्रयोग यांवरून सूचित होणारा मराठमोळ्याचा, महाराष्ट्र-धर्माचा खराखुरा अभिमान जर आमच्यांत असता तर मराठ्यांचा दरारा अटक-बङ्गाल्यापर्यंत बसल्यानन्तर नाशिकसारखीं क्षेत्रें नि अहमदनगरा-सारखीं राजधानीजवळील बळकट स्थळें अितक्या अुशीरा हिन्दवी स्वराज्यांत समाविष्ट झालीं नसतीं; पूर्वेकडील मोंगल निजाम नि पश्चिमेकडील शिद्दी श्यामल नि गोवेकर फिरङ्गी हे महाराष्ट्रांतच घट्ट नखें रोवून बसले नसते; आणि रावरम्भा निम्बाळकर, जाधव, सोमवंशी, राजे रायरायां, विठ्ठल सुन्दर अित्यादि मोठमोठे सर्दार, ज्यांचे सोयरिकीचे सम्बन्धी मराठराज्यांत होते ते मोंगलाअींत आपुलकीने राहून सातारकर छत्रपतींच्या पन्तप्रधानां-

१ चांपानेर येथील पावागडाच्या शिखरावरील देवीच्या देवळावर पीर आहे.

विरुद्ध नि सर्दारांविरुद्ध लढले नसते. परमार्थाची ओळख सुसंस्कृत-असंस्कृत सर्वांस व्हावी म्हणून राजाश्रयासाठी थाम्बून न राहतां निरपेक्षबुद्धीने ज्यांनी वेदान्त सुलभ केला, भागवतधर्माचें प्रवचन केलें, रामायणमहाभारतांतील कथा सुबोध केल्या, भक्तिभावाने ओथम्बलेलीं गाणीं गाअिलीं त्यांचें मराठीवर प्रेम नव्हतें असें म्हणणें चुकीचें होअील. अेकनाथांनी तर संस्कृताचा भलताच अभिमान बाळगणाऱ्या पण्डितांचा जाच सोसून, मराठीचें बहुजनसमाजाची भाषा म्हणून संरक्षण नि संवर्धन केलें. तत्रापि मराठी भाषा ही अेका देशांतील बहुजनसमाजाच्या अैक्याची निदर्शक आहे, नि त्या राष्ट्राचा अेक आधार आहे या दृष्टीने तिची सङ्घटना नि संवर्धन करायला पाहिजे ही भावना त्या काळीं नव्हती. मराठीला ही स्थिति अलीकडे येत चालली आहे. मराठीचीं व्याकरणें, कोश इत्यादि ग्रन्थ अिङ्ग्रजी राजवटींत निर्माण झाले ही गोष्ट दृष्टीआड करितां कामा नये. मुसल्मानी राजवटींत मराठी वाङ्मयांत पहिल्या प्रतीची भर पडली; पण हिन्दवी स्वराज्याच्या भरभराटीच्या काळीं जिवन्त वाङ्मय निर्माण झालेंच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. मराठी भाषेचें महाराष्ट्रीय महत्त्व जर आमच्या पूर्वजांनी जाणलें असतें आणि मराठी भाषा बोलणारा तो मराठा, त्याच्याविषयी आपुलीक अङ्गीं बाणली असती तर शिवरायांच्या पूर्वजांची जेथे कुळ-वाडी, महाराष्ट्राच्या कुलस्वामिनीचें—श्रीतुळजाभवानीचें—जेथे वास्तव्य, अेकनाथदासोपन्त अित्यादि सन्तसाहित्य सेवकांच्या पराक्रमाचें जेथे क्षेत्र तो पुण्यप्रदेश, तो मराठवाडा मराठ्यांच्या स्वामित्वाखाली येण्याला अितका अुशीर कां लागला असता ! दोनदा मोठ्या लढाया जिङ्कल्याने तो महाराष्ट्रांत समाविष्ट झाला असतांहि "अुरेल तीच दौलत करूं" बघणाऱ्या राज्यकर्त्यांनी तो परत मोंगलास कां दिला असता !

असो; भाषेच्या शुद्धीकरणाचा आरम्भ सावरकरांनी शिवरायांच्या हस्तें करविला आहे. हें चित्र हृदयङ्गम वाटलें तरी त्यांत वास्तवता नाही हा मोठाच दोष आहे. राजव्यवहारकोशांत त्या काळीं पत्रव्यवहारांतून रूढ

असलेल्या शेकडों फार्सी शब्दांचे संस्कृत पर्याय दिलेले नाहीत; अुलट कित्येक देशी प्राकृत शब्दांचे पर्याय दिलेले आहेत. त्या अर्थी हा कोश मुसलमानी शब्दांचे पर्याय मराठींत योजून भाषेची शुद्धि करावी या हेतूने रचविला गेला असेल असें वाटत नाही. हिन्दवी (म्हणजे हिन्दूंचें) स्वराज्य स्थापन झाल्यामुळे संस्कृत भाषेला नि विद्येला थोडेंफार अुत्तेजन मिळालें असेल; परन्तु मराठीस मुसल्मानी कचाटींतून सोडविण्याचा प्रयत्न करण्यांत आला असें म्हणायला आधार नाही. फार्सी शब्द पन्तप्रधानकीच्या अन्तापर्यन्त आणि नन्तरहि सर्कारी कागदपत्रांतून अनेक आढळतात. 'काव्येतिहास सङ्ग्रहांतील पत्रें यादी वगैरे' या ग्रन्थाच्या १४० व्या पानावर शिन्द्यांना धन्यवाद देतांना, नानासाहेब "शाबास तुमच्या हिमतीची व दिलेरी रुस्तुमीची" या सहा शब्दांच्या सुप्रसिद्ध वाक्यांत 'तुमच्या' हा अेकच शब्द मराठी वापरतात ! मोरोपन्ती काव्यांतहि 'शुद्ध सरळ व (नि) म्लेञ्छ शब्दांच्या स्पर्शाने अकलुषित' असें मराठीचें स्वरूप सावरकरांना कसें दिसतें कोणास ठाअूक ! मोरोपन्ताने आपल्या काव्यांत योजिलेल्या फार्सी शब्दांची जी जन्त्री प्रा. श्रीधर विष्णु परांजपे यांनी आपल्या केकावलीच्या आवृत्तीच्या परिशिष्टांत दिली आहे ती पाहतां मोरोपन्ताने फार्सी शब्द ९० हून अधिक वापरले आहेत असें दिसतें ! मराठी भाषेंतून फार्सी शब्द लुप्तप्राय होत जाणें ही क्रिया अगदी अलीकडील आहे. अिङ्ग्रजी शिक्षणानन्तर मराठीला प्रौढ करण्याच्या भरांत, मराठीचें तुटपुंजें ज्ञान आणि संस्कृताशी वाढता परिचय या दोन कारणांनी घरगुती मराठी शब्दांसङ्गतीं फार्सी शब्दांची हळुहळू हकालपट्टी झाली. तेव्हा सावरकरांनी मराठी भाषेच्या शुद्धीकरणाची जी पूर्वपीठिका साङ्गितली आहे तिला फारसा आधार नाही.

मराठींत अेके काळीं जरी अनेक फार्सी शब्द घुसले असले तरी आज फारच थोडे प्रचलित आहेत. अुदाहरणार्थ मराठींत केव्हा तरी अुपयोगांत आलेले अचे कने आरम्भ होणारे अेकन्दर फार्सी शब्द १२५ आहेत; तर

रूढ असे आजमितीस चाळीसाहून अधिक नाहीत. त्यांतील विशिष्ट वस्तू वा प्रकार दर्शविणारे अतअेव क्षम्य असे कन्दील, कनाथ, कपापचिनी, कफनी, कबूतर, कल्मा, कल्हअी, कलाबतू, कब्हा नि कवाली हे दहा वगळल्यास पुढील ३१ शब्द अुरतात :— कङ्गोरा (कड, कोर), कजा (भाण्डण, खटला), कजाग (कर्कशा), कत्तल (डोचकेमारणी, हत्या), कदम (पाअूल), कब्जा (पकड, स्वामित्व), कबर (थडगें), कबरस्तान (निखननस्थान), कबूल (सम्मत, अनुकूल), कबुलायत (सम्मति), कम-कुवत (अशक्त), कम-जोर (दुर्बल), कम्तरता (न्यूनता, अुणीव), कम्बख्ती (दुर्दैव), कम्बर (कटि, कड), कमान (बांक, माहिराप, खण्डमण्डल, कमठा), कमाल (पराकाष्ठा, धन्य, महत्तम), कमी (अुणें), कयास (अटकळ, तर्क, अनुमान), कर्ज (ऋण), करामत (चमत्कार, कौशल्य), करार (ठराव), कलम (लेखणी), कवाअीत (साङ्घिक हालचाल), कस्बीण (कलावन्तीण, वेश्या), कसरत (व्यायाम), कसब (कौशल्य, गुण), कसाब (खाटीक), कसूर (चूक, न्यून), कसोशी (परिश्रमशीलता), कहर (कोप, अनर्थ) या ३१ शब्दांपैकी कङ्गोरा, कत्तल, कवाअीत आणि कमान हे चार शब्द असे दिसतात की त्यांना चप्खल मराठी पर्याय नाहीत. अुरलेले विकल्पें करून वापरले जात आहेत. त्यामुळे मराठी शब्द लुप्तप्राय न होतां अुलट भाषेंतील सम्पत्तींत भरच पडली आहे असे वाटतें; आणि त्यामुळे अुर्दू शब्दांचा मुसल्मानी स्पर्श प्राणघातक आहे आणि ते मराठीच्या घरांत धनीपणा गाजवीत आहेत किंवा धन्यालाच ठार मारण्याअितके ते प्रबळ नि बहुसङ्ख्य झाले आहेत असें म्हणावेंसें वाटत नाहीं.[1]

---

१ याच गोष्टीचा खोल विचार केला असतां निराळेंच अनुमान निघतें. अेखाद्या फार्सी शब्दाला मराठी पर्याय आहे कीं नाही या प्रश्नापेक्षा, पर्याय असल्यास तो फार्सी शब्दाच्या मानाने सारखे वेळां आणि सारख्याच सुलभतेने आठवतो कीं नाही या प्रश्नाला अधिक महत्त्व आहे. या दृष्टीने पाहिलें असतां या शब्दांचे तीन चार वर्ग पडतात. कब्जा, कजाग, कबर, कमकुवत, कम-जोर, कयास, कदर, कसम,

जे फार्सी शब्द मराठींत आले आहेत त्यांतील कित्येकांचीं रूपें आम्हीं पार पालटून टाकिलीं आहेत; कित्येकांच्या अर्थांत महदन्तर पडलें आहे. त्यांना मूळ रूपांत मूळ अर्थांनीच योजावें अशी अद्यापि प्रवृत्ति नाही,[1]

---

कसाब आणि कहर या १० शब्दांच्या प्रकरणीं असें म्हणतां येईल की त्यांचे मराठी पर्याय तुल्यबल आहेत. त्यांची उपस्थिति सारखेच वेळां होते. म्हणजे या १० शब्दांनी मराठीच्या मूळ शब्दसम्पत्तीचा काही नाश न करितां तीत तेवढी भरच टाकली आहे. कदम, कम्बख्ती, करामत, कलम, कस्बीण, कस्रत हे ६ शब्द मराठी पर्यायापेक्षा थोडे वेळां आठवतात आणि योजण्यांत येतात; ते डोईजड झालेले नाहीत. कब्जा, कबरस्तान, कबूल, कबुलायत, कमतरता, कम्बर, कमाल, कमी, कर्ज, कसूर, कसोशी हे ११ शब्द मात्र मराठी पर्यायांहून अधिक वेळां आठवतात आणि योजिले जातात. त्यांचे मराठी पर्याय आठवून योजायला हेतुपुरस्सर परिश्रम करावे लागतात. कबरस्तानाला निखनन-स्थान हा शब्द शोधान्तीच सापडतो. हे फार्सी शब्द अपरिहार्य होऊन बसले आहेत, कमी करणें, कमी होणें यांचे उणावणें, घटणें हे पर्याय सहसा आठवणार नाहीत. बरें, 'कमान' या फार्सी शब्दाप्रमाणे वरील ११ फार्सी शब्द काही नवीन अपरिचित अर्थ व्यक्त करण्यासाठी मराठींत आले आहेत असें म्हणावें तर तशीहि स्थिति नाही. कर्ज-वाम हे फार्सी शब्द मराठींत येण्यापूर्वी आमच्यांत हा व्यवहार होतच नव्हता असें नव्हे. अर्थात् हे ११ शब्द अल्पसङ्ख्य असलें तरी ते जे डोईजड होऊन बसले आहेत त्याला कारण आमच्या हातून नकळत होत आलेला पक्षपात होय. कत्तल या शब्दाला चपखल पर्याय आम्हांला आठवायला हवा. कारण पाडवांच्या शिबिरांत रात्रीं शिरून अश्वत्थाम्याने जो संहार केला त्याचें वर्णन आमच्या वाङ्मयांत नाही असें नाही. कवाईत या शब्दाला आलेला अर्थ मूळांत नाहीच. मूळांत त्याचा अर्थ नियम असून कवाअिद् हें काअिदा शब्दाचें अनेकवचनाचें रूप आहे. कवाईत शब्दाला विशिष्ट अर्थ आता पाठीमागून आला आहे ही गोष्ट निराळी. सावरकरांनी सुचविलेला सञ्चलन हा शब्द अधिक सार्थ वाटतो. कमान या अर्थी तोरण हा शब्द वापरतां येईल.

१ पण हिन्दी-हिन्दुस्तानीच्या अभ्यासाने या फार्सी शब्दांच्या मूळ शुद्ध रूपांशी परिचय होऊं लागला कीं ही प्रवृत्ति डोकें वर काढील. अिन्दूरकडे हिन्दीशी असणाऱ्या परिचयामुळे सुरू या शब्दाच्या ठिकाणीं शुरू म्हणतात हें विसरतां कामा नये.

पण अशी चळवळ झालीच तर मात्र तिला निकराचा विरोध करायला हवा.

संस्कृत धातूंपासून झालेल्या फार्सी शब्दांना मात्र सावरकरांची आड-काठी नाही. आजहि पिदर (पितर), मादर (मातर), आब (आप्), बाद (वात) यांसारखे आर्य शब्द अनेक आहेत; परन्तु ते संस्कृतोद्भव आहेत असें मानणें चुकीचें होईल. बहुतेक मूळच्या आर्यभाषा संस्कृतभाषेच्या दुहिता नसून स्वसा आहेत. सावरकरांनी आर्य म्हणून जवळ केलेले काही शब्द वस्तुतः आर्य नसून अरबी आहेत. हक्क आणि सुरू हे शब्द अनुक्रमें स्वक आणि सु यांपासून व्युत्पादणें म्हणजे अिङ्ग्रजी शब्द कॉम्पाअुण्ड् हा कुम्पणापासून व्युत्पादण्यासारखेंच आहे. अशा भ्रामक व्युत्पत्तीमुळे निवळ आत्मवञ्चना होते.

(१) मराठींत आलेले फार्सी शब्द अल्पसङ्ख्य आहेत; (२) त्यांची सङ्ख्या वाढण्याचा सम्भव नाही; (३)[१] मराठींतील प्रतिशब्द ते नामशेष करूं शकले नाहीत; त्यामुळे मराठीच्या सर्गशक्तीस क्षय न लागतां अुलट शब्दसम्पत्तींत पर्यायवाचक शब्दांची भरच पडली आहे; (४) कित्येक फार्सी शब्दांचे अर्थ नि वेष पालटल्यामुळे ते जणू काय पुनर्जन्म पावून मराठमोळ्यांत समाविष्ट झाले आहेत; (५) आणि त्यांना जुने वेष नि जुने अर्थ देण्याकडे म्हणजे पर्यायाने फार्सीचें दास्य मानण्याकडे आमच्यांत प्रवृत्ति अद्यापि नाही. या पांच बुद्धिग्राह्य कारणांसाठी पङ्क्तिपावन झालेल्या मूळच्या फार्सी शब्दांना मराठी भाषेत गुण्यागोविन्दाने रहाण्याला मोकळीक असली पाहिजे असें वाटतें.

परन्तु फार्सी शब्दांवाचून आमचें अडेल, आमची भाषा नेभळट होईल अशी भीति मला मुळीच वाटत नाही. 'मराठी भाषेची साम्प्रतची स्थिति' या लेखांत निबन्धमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर म्हणतात की "मुस-ल्मानांच्या सहवासाने आपल्या पेहरावांत जितकी तफावत पडली तितकीच भाषेंतहि पडली. म्हणजे मूळची साधी रीत जी दोनच वस्त्रें वापरण्याची

१ परन्तु हें ३ रें कारण साधार वाटत नाही. मागे पृ. ९-१० पहा.

ती जाअून तीहून डौलाचा जो सध्याचा अङ्गरखा, पागोटें, अुपवस्त्र हा पोशाक जसा त्या लोकांपासून आपण अुचलला त्याप्रमाणेच त्यांच्या भाषेंतून आपल्या भाषेंत काही शब्द येअून व तीस नवें वळण लागून तींत झोंकदारपणा व आवेश हे गुण मात्र जास्त आले. तेव्हां त्या भाषेच्या मिसळण्याने आपल्या भाषेचें अहित न होतां हितच झालें यांत संशय नाही." तसेंच मराठीशब्दरत्नाकरकर्ते वासुदेव गोविन्द आपटे आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात की "मराठी भाषेच्या अङ्गीं जो मर्दानीपणा आला आहे तो पुष्कळ अंशीं या यावनी शब्दांनीच आलेला आहे. या यावनी शब्दांबद्दल त्यांचे संस्कृत पर्याय घालून वाक्यरचना केली तर तें वाक्य व्हावें तसें जोरदार होत नाही ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे"[१] बहुजनसमाचाहि ग्रह असाच आहे. तेव्हा अधिक चर्चा करून या मताचा फोलपणा सिद्ध केला पाहिजे.

भाअूसाहेबांच्या बखरींतील मारवाडावरील पराक्रमणाचें पुढील वर्णन पहा. "त्यांस व (नि) यांस दहा कोसांची तफावत (अन्तर) होती. यांणी स्नानें करून, तमाम (सर्व) अेकमेकांस निरवानिरव करून, तमाम अङ्गांत चिल्खतें व बक्तरें (कवचें) घालून, जिरे-टोप (शिरस्त्राण) पेट्या बान्धून, दारूगोळी (!) लोकांस वाटून, तङ्गबार (!) करून, मुहूर्तें सिद्ध होअून चालले. मार्गीं शकुनहि चाङ्गले झाले. तेव्हा आधिकच हिम्मत (अवसान) येअूं लागली. तीस हजार (सहस्र) फौज (सैन्य) होती. त्यांची निवड करून दोन भाग केले. अेकीकडे दत्ताजी शिन्दे झाले. आणि अेकीकडे जयाजी शिन्दे झाले. दोन्ही सैन्यांच्या गांठी पडल्या. बिजेसिङ्ग याणें तमाम आपले फौजेंत ताकीद (आज्ञा) करून समय-

---

१ याच वाक्यांत मर्दानीपणा आणि जोरदार या दोन शब्दांच्या ठिकाणीं अनुक्रमें संस्कृत पर्याय पौरुष आणि सबळ हे घातले तर तीं वाक्यें कदाचित् समाधानकारक वाटणार नाहीत. परन्तु क्षात्रतेज आणि कणखर हे शब्द वापरले तर तीं वाक्यें समाधानकारक वाटणार नाहीत असें नाही. पर्याय योजितांना मूलार्थाकडेच पाहून संस्कृतच शब्द वापरले पाहिजेत असें नाही.

सामान (सामग्रीसहित) सिद्ध झाले, भोंवती रिसाला (घोडदळ) तोफा (भाण्डी) वगैरे (अित्यादि) तयार (सज्ज) झाले. जोंपर्यंत अङ्गाशीं अङ्ग लागलें नव्हतें तों तोफांचे मार व हस्त-नाले व सुतर-नाले (अुण्ट-नाले) व जेजाला (!) व रेकले व व गञ्जीफियाच्या (!) गाड्या व बर्खन्दाज अशी अेकदाच सरबत्ती झाली. बाणांचा वर्षाव मेघाप्रमाणे झाला. मोठा कडाखा झाला. धुराची व धुळीची धुन्दी झाली. कोणाचें तोण्ड कोणाचे दृष्टीस पडेनासें झालें. यन्त्रांच्या धडाकियाखाली घोडे मनुष्यें बधिर झालीं. क्षण-भर अशी गर्दी (धुन्दी) होअून चोंहीकडून हरहर म्हणोन अेकदाच घोडे घातले. ते समर्यींच कडाखा तेथील अनुभविक असतील त्यांस ठाअूक असेल. अैशी आग झाली. नन्तर आगीचा मार राहून तर्वारींची खणा-खणी झाली. त्यांत ते आधीच रजपूत, त्यांत मार्वाडी हाडे; त्यांचे मर्दुमीचें (शौर्याचें) नवल नाही. परन्तु मराठियांनी फार शर्थ (पराकाष्ठा) केली. अैसें युद्ध गनिमांत (मराठ्यांत) कोणीं केलें नाही. मल्हारराव यांचे अिरेने दांत-निसकीस येअून मोठमोठे खेतांत येअून जिवा अधिक केली. मोठा प्रळय जाहला. न भूतो न भविष्यति. पांचसातशे भले चाङ्गले लोक गनीमा-कडील ठार झाले. जखमी घायाळ दोन अडीचशें मनुष्यें झालीं. पांच-सातशें घोडीं हि पडलीं. मार्वाडियांकडील दोन अडीच हजार मनुष्यें ठार झालीं. तोफा व रिसाला काही पाडाव केला. अैसा प्रळय झाला. परन्तु धन्य! रजपुतांची माय रजपुतासच व्याली! असें गनीमास होतें तर धुरोळा दृष्टीस पडूं न देते. त्यांत गनीम यांचा अुत्कर्ष, चढती सद्दी (दैव). नाही-तर मार्वाडियांस तम्बी (शिक्षा) पोहोचवावी असें नव्हतें. त्यांतहि हटेले रजपूत, जैसा मोटेचा बैल सरतो तैसे मार खातच खेती सोडून, आपले मुर्दे (शवें) साम्भाळून, दोन कोस माघारे निघाले. शिन्दे यांणी ही जागा (स्थळ) फत्ते करून (जिङ्कून) शहाजणें (जयवाद्यें) वाजवीत खेतीवर अुभे राहिले. आणि आपले भले लोकांचे मुर्दे जमा (अेकत्र) करून अग्निप्रसाद दिला. घायाळांच्या जखमा (घायटे) बान्धोन परम खुशाली (आनन्दी-

आनन्द) केली. तो आनन्द पत्रीं लिहून कळवावा तो काय !"

ह्या अुतारा वाचतांना कंसांत दिलेल्या पर्यायांचा अुपयोग मूळ फार्सी शब्दांच्या ठिकाणीं केला तर वर्णनाची परिणामकारकता अुणावेल असें मला वाटत नाही. युद्धविषयकसामग्रीवाचक काही शब्द फार्सी असणें तेव्हा अपरिहार्य होतें. दारू नि तङ्गबार या शब्दांस पर्याय सापडत नाहीत, पण आग-पूड नि पलाण-कशी असे मराठी समर्पक शब्दप्रयोग करितां येतील. वरील अुताऱ्यांत जेथे लढाअीचें वर्णन आहे तेथे फार्सी शब्द विरळ होत गेले आहेत हें वाचकाच्या ध्यानांत येअिलच. त्याचप्रमाणे सिद्ध (तयार), कडाखा, धडाका, खेती (रणमैदान), भले (थोर, मातबर) धुन्दी (गर्दी) अित्यादि मराठी सकस शब्दांचा अुपयोगहि ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. असा अेकहि फार्सी शब्द वरील अुताऱ्यांत नाही की जो काढला आणि त्याच्या ठिकाणीं मराठी पर्याय वापरला तर भाषेचा आवेश अुणावेल.'[1]

हिन्दुस्थानाबाहेरील राङ्गड्या दाण्डग्यानीं, यादवीने पोखरलेल्या या देशांत घुसून राज्यें स्थापिलीं. पुढे त्याच्या राजवटींत आमच्यांतहि शूर धारकरी होअून त्यांनी ख्यात केली. कधी हुतूतू घालीत कावे देत देत त्यांनी शत्रूंना धापा टाकायला लाविलें तर कधी खेतींत अुभे गाडून अमित्रांशी गांठ घेअून भलीं झुंजें केलीं. आगीच्या मारांस न गांठता पायअुतार होअून स्वाङ्गें तर्वारीने खणाखणी करून शत्रूस धुडावून देअून रणावरच विजयी ढालांभोवती जयघोष केला. अशा आमच्या शूर वीरांच्या बोलींत सभोंवतील परिस्थितीमुळे काही मुसल्मानी शब्द शिरले, आणि ताम्ब्रांच्या नि हटेल रजपूतांच्या नि गनीमी मराठ्यांच्याहि पराक्रमामुळे त्या शब्दांत क्षात्राचा ध्वनि आला. परन्तु खेत हा शब्द मैदानापेक्षा आणि तर्वार हा शब्द समशेरीपेक्षा कणखरपणांत अुणा नाही. यावनी शब्द यवनांच्या दाण्डगे-

---

१ जखम (घायटा) आणि हजार (सहस्र) यांचे पर्यायवाचक शब्द लुप्त झाल्यामुळे हे कसे अपरिहार्य होअून बसले आहेत तेंहि ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

रणाच्या साहचर्यामुळे आम्हांला अधिक सावेश, अधिक पराक्रमी वाटतात; परन्तु मराठी भाषा बोलणारे लोक पराक्रमी झाले म्हणजे त्यांची भाषा शुद्ध मराठी असली तरी सावेश वाटूं लागेल. मराठीच्या अभिमान्यांनी पूर्वजांच्या राङ्गडी भाषेचा सुद्धा आस्थापूर्वक अभ्यास करून अनेक अप्रसिद्ध परन्तु कणखर शब्दांचा परिचय बहुजनसमाजाला, स्वकीयांच्या कोणत्याही नव्या टुमीला हसणाऱ्या महाराष्ट्राला करून दिला पाहिजे. आज तोफ या शब्दाशीच आमचा परिचय आहे. पूर्वी भाण्डें हा शब्द रूढ, परिणामकारक होता.[1] मैदान या शब्दाच्या ठिकाणीं रणाङ्गण, रणक्षेत्र अित्यादि संस्कृत शब्द आम्ही योजितों, पण खेत (क्षेत्र) या परिणत नि अेका काळीं रूढ असलेल्या शब्दाचा आम्हांला विसर पडतो आणि शेवटीं, भाषेंत क्षात्रतेज आणायला यावनी शब्दांचाच अुपयोग केला पाहिजे असें वर प्रतिपादन करितों. ही किती लज्जास्पद आत्मवञ्चना आहे !

मराठी भाषेच्या संवर्धनाच्या दृष्टीने फार्सी शब्दांचा विचार करीत असतांना मराठीवर ओढवलेल्या गुप्त सङ्कटाच्या भीषणपणाची मला जाणीव झाली. ही जाणीव महाराष्ट्राला करून देअून या नव्या गळचेपींतून तिची सुटका करणें हें प्रत्येक मराठ्याचें कर्तव्य आहे. महाराष्ट्रदेश नि मराठी भाषा हीं आपल्या नव्या अेकीकरणाचीं केन्द्रें आहेत. महाराष्ट्राचें राजकीय अेकीकरण आज अिष्ट असलें तरी शक्य नाही. तेव्हा सांस्कृतिक अेकीकरण तरी अबाधित चालू ठेविलें पाहिजे. स्वत्व न हारवतां मराठी भाषा ही प्रगमनशील व्हावी या दृष्टीने अिङ्ग्रजांच्या राजकीय साळसूद गुप्त आक्रमणाप्रमाणे मराठी भाषेचें संरक्षण नि संवर्धन करीत राहणें अत्यवश्य आहे. अिङ्ग्रजी शब्द टोळधाडीप्रमाणे परन्तु गुप्तपणें मराठीची शब्दसम्पत्ति खाऊन टाकतील कीं काय अशी बळकट शङ्का येअूं लागली आहे. अिङ्ग्रजांच्या बहुताङ्गी अुन्नतीमुळे, राजकीय सत्तेमुळे,

१ बुरूज या शब्दाच्या ठिकाणीं हुडा हा शब्द पूर्वी सर्वत्र प्रचलित होता. आज शेतीस महाराष्ट्राच्या काही भागाच्या बोलींतच हा प्रचलित आहे.

नानाविध शास्त्रें नि कला यांतील प्रगतीमुळे निरानिराळ्या शास्त्रांतील, नि धन्द्यांतील नि व्यवहारांतील अिङ्ग्रजी शब्द महाराष्ट्रांत द्विजांपासून अद्विजांपर्यन्त म्हणजे सुशिक्षितांपासून अशिक्षितांपर्यन्त परिचित होत चालले आहेत. साधारणपणें दुसऱ्याला समजणारा अेखादा शब्द हाताशी असल्यावर तो अिङ्ग्रजी आहे म्हणून दुसरा शोधून काढण्याच्या वा निर्माण करण्याच्या भानगडींत कोणी पडत नाही. लेखी भाषेंत मात्र संस्कृतोद्भव शब्द सिद्ध करून वापरण्याकडे अभिनन्दनीय प्रवृत्ति आहे. परन्तु बोलीमान्य म्हणून अिङ्ग्रजी शब्द कादम्बऱ्यांतून नि लघुकथांतून बेधडक वावरूं लागले आहेत. आमच्यांत अगदीच जागृति झालेली नाही असें नाही. मराठीचें निर्मूलन व्हावें अशी निदान सार्वभौम राजकर्त्यांची तरी अिच्छाहि नाही. तथापि आम्हीच जर निवृत्तिमार्गाचा अवलम्ब करून स्वस्थ बसलों आणि या गुप्त माऱ्याचा प्रतिकार केला नाही तर अरबीने फार्सीची जी दशा केली तीच गत मराठीची होअील; म्हणजे फार्सी भाषा ज्याप्रमाणे स्वत्वाला मुकली आहे त्याप्रमाणे मराठी भाषाहि स्वत्वाला मुकेल.

मराठींत आलेल्या फार्सी शब्दांविषयी जी सहानुभूति मी दाखवितों ती अिङ्ग्रजींतून दैनिक बोलींत घुसलेल्या आणि ग्रान्थिक प्रगल्भ भाषेंत पाय पसरूं पाहणाऱ्या शब्दाविषयी दाखवीत नाहीं हा पक्षपात आहे असें वाटण्याचा सम्भव आहे. परन्तु फार्सी शब्द मराठींत घुसले तेव्हा स्वभाषेचें राजकीय महत्त्व आमचे पूर्वज ओळखत नव्हते म्हणून आजहि आम्हीं भाषेच्या स्वत्वसंरक्षणाकडे दुर्लक्ष करावें हें योग्य होअील काय ! अिङ्ग्रजी शब्दांचा बहिष्कार हा परधर्माच्या द्वेषामुळे पुकारला जात नसून मराठीचें स्वत्व जाअील की काय या भीतीने पुकारला जात आहे. महाराष्ट्राला स्वदेश आणि मराठीला स्वभाषा मानून हिन्दूंच्याविषयी आपुलीक ठेवून वागणारे जे कोणी मुसलमान नि खिस्ती असतील त्यांच्या धर्मभेदामुळे अीद, बाङ्ग, निमाज, मशीद, सब्बाथ, बाप्तिस्मा यांसारखे विशेषार्थवाचक शब्द मराठींत आले तर त्यांना माझी अगदी आडकाठी नाही. परमतसहिष्णुता हें तर

हिन्दु संस्कृतीचें अुज्ज्वल नि अुदात्त तत्त्व आहे. परन्तु अिङ्ग्रजी शब्द अगणित घुसत आहेत; त्यांची सङ्ख्या वाढतच जाअील अशी अटकळ आहे; मराठींतील प्रतिशब्द मागे पडून नष्ट होण्याचा सम्भव आहे; मराठीच्या सर्गशक्तीस अपाय होत आहे; अिङ्ग्रजीच्या अभ्यासामुळे, अर्थ-वेषान्तर केलेल्या अिस्पिताळ-हपीसादि शब्दाना शुद्ध करण्याकडे म्हणजे न-कळत का होअीना पण अिङ्ग्रजीचें दास्य स्वीकारण्याकडे प्रवृत्ति आहे; या गोष्टी जर खऱ्या असल्या तर वेळींच जागें होअून स्वत्त्वसंरक्षणाचा नि स्व-सामर्थ्य वाढविण्याचा प्रयत्न करायला नको काय ! राज्यकर्त्यांची भाषा, जागतिक व्यापाराची भाषा नि पाश्चात्य विद्यांची भाषा या तीन नात्यांनी अिङ्ग्रजीला आज विलक्षण महत्त्व आलें आहे. "न वदेद्यावनीं भाषां प्राणैः कण्ठगतैरपि" असें पिछेहाटीचें धोरण ठेवून लोकांनी अन्धारांतच घोरत पडावें असें नव्हे. परन्तु विचारांत, अुच्चारांत नि आचारांत अिङ्ग्रजांचें. प्रतिष्ठेसाठी वा टूम म्हणून, निवळ अनुकरण करावें हें अिष्ट नाही-मराठींत आपले विचार व्यक्त करणाऱ्या बहुतेक विद्वान् लोकांनी अिङ्ग्र, जीचा बरा अभ्यास केलेला असतो, परन्तु त्यांचा मराठीचा अभ्यास बेता-चाच असतो. त्यामुळे वाक्यरचनेवर अिङ्ग्रजीचा फार परिणाम झाला आहे. अिङ्ग्रजी वाक्प्रयोगांचें अनेकदा आम्ही केवळ शब्दशः अनुकरण करितों ही गोष्ट नक्राश्रु, विश्वविद्यालय, सहानुभूति, सुवर्णमध्य अित्यादि शब्द पाहिले असतां सहज दिसून येअील. शब्दाच्या प्रकरणीं मराठीच प्रतिशब्द शोधून काढून वा निर्माण करून वापरीन असा स्वाभिमान दैनिक व्यव-हारांत चालवणें जड जातें, आणि मनुष्याला पुढे दिसणाऱ्या नि लोकांस कळणाऱ्या परकी शब्दांवरच निर्वाह करण्याची सवय जडते. हा आयत-खाअूपणा अेकदा जडला की भाषेस पक्षाघात झालाच म्हणून समजावें. अशा वेळीं काही अुपाय करून आरोग्य परत मिळवावें तर तसें न करितां, आहे ही स्वास्थ्यस्थिति अुत्तम आहे अशी आम्ही स्वतःची समजूत करून घेतों. मराठींत घुसणारे नवे शब्द कालप्रभावाने रूढ होत आहेत; त्यांची

हकालपट्टी करणें अशक्यच नव्हे तर आत्मघातकीपणाचें आहे; ही चळवळ द्वेषमूलक असून सोवळ्याओवळ्याच्या खुळचट कल्पनेचें प्रदर्शन करणारी आहे; अिङ्ग्रज लोकाचें जर हिन्दुस्थानांत राज्य आहे, तर तें निरनिराळ्या देशी भाषांतून प्रतिबिम्बित होणें हें अपरिहार्यच नव्हे तर अितिहासाची साक्ष देणारें आहे अित्यादि कोटिक्रम लढवून आम्ही आपलें समाधान करून घेतों. परन्तु प्रत्यहीं परिश्रम केल्यानेच ज्याप्रमाणे स्नायूंची शक्ति वाढते आणि शरीर तेजःपुञ्ज नि बळकट होतें त्याचप्रमाणे राष्ट्राच्या नानाविध व्यवहारांत येणाऱ्या भाषाविषयक अडचणी स्वतः दूर करण्याचे श्रम घेण्यानेच भाषा वाढते, तिचा व्याप वाढतो आणि स्वाभाविक वाढीच्या दृष्टीने अत्यवश्यक अशी जी सर्गशक्ति ती वाढते. म्हणून अिङ्ग्रजी शब्दांच्या प्रकरणीं सहिष्णुता दाखविणें आत्मघातकीपणाचें आहे.

अगदी घरगुती जिव्हाळ्याच्या बोलींत सुद्धा पपा, ममा, वाअिफ, मिसेस, बेबी, होम अित्यादि शब्द कौतुकाने वापरण्यांत यावेत हें स्वाभिमानशून्यतेचें लक्षण आहे कीं नाहीं हें वाचकांनीच साङ्गावें. 'मटण' हा शब्द सर्वत्र रूढ होतो; सागुती हा शब्द क्वचित् कानावर पडतो. बोलाअी ही देवी आहे. तिच्या अुपासकांस बकऱ्याचें मांस निषिद्ध असल्याने ते मेण्ढ्याचें मांस खातात. अशा मांसास 'बोलाअीचें मटण' म्हणून अुल्लेखतात तेव्हा आपल्याला चमत्कारिक काहीच वाटत नाही.[1]

मुम्बअी, वसअी, शीव, लोणावळें, नागपूर हीं नावें बॉम्बे, बसीन्, सायन्, लॅनोली, नॅग्पोर अशीं अुच्चारण्यांत आम्हांला सुसंस्कृतपणा वाटतो. सर्कार, दुक्ख, सिंव्ह, संव्शय असें अुच्चारानुसारी लेखन केलें तर तें आम्हांला अशुद्ध वाटतें; आणि सरकार, दुःख, सिंह, संशय असें लेखन चालू ठेवण्यांतच स्वाभिमान वाटतो. परन्तु कॉलेज हा परकी अुच्चार मात्र

१ अण्डे हा शब्द फार ओळखीचा म्हणून तो नको तेव्हा आमचे सुसंस्कृत ग्राहक 'बैदा' हा अरबी वा 'अेग' हा अिङ्ग्रजी शब्द वापरतील पण 'कवट' हा मराठी शब्द वापरणार नाहीत.

कॉलेज नि कालेज यांपासून भिन्न आहे हें दाखविण्यासाठी आणि अुच्चारान्तर होअूं नये म्हणून तो शब्द मूळ अुच्चारानुसार लिहिण्यासाठी आम्ही लिपींत ॅ हें अेक नवीन चिन्ह निर्माण करितों !

अिङ्ग्रजी शब्दांचा स्वीकार हा मराठीची सर्गशक्ति कशी नष्ट करील याचीं काही अुदाहरणें दिल्यावाचून मला वाटणाऱ्या भीतीची साधारता वाचकांना पटणार नाही. फॅशनेबल या शब्दांतील अर्थच्छटा काही और आहे; ती दुसऱ्या कोणत्याहि शब्दाने व्यक्त होणें शक्य नाही; आणि फॅशनेबल हाच शब्द अधिक लोकांना कळतो अित्यादि कल्पनांनी हा शब्द आधी आपद्धर्म म्हणून आणि नन्तर अपरिहार्य म्हणून ग्रन्थाच्या प्रगल्भ भाषेंत लौकरच रूढ होण्याचा सम्भव आहे. फॅशन् या अर्थाने बूट, टूम, अित्यादि शब्द विद्यमान आहेत; दार हा प्रत्यय लावून त्यापासून विशेषणें सिद्ध करितां येतील. टूमदार हा शब्द बङ्गल्यापुरता मर्यादित न करितां त्याची व्याप्ति वाढवून टूमदार कपडे, टूमदार राहणी असे शब्दप्रयोग केले तर ते काय दुर्बोध थोडेच होणार आहेत ! प्लॅटफार्म् या शब्दाला ओटा नि धक्का हे पर्याय होअूं शकणार नाहीत काय ! नौकेंतून काठावर अुतरतांना नौका खोल पाण्यांत अुभी राहूनहि मनुष्याला कोरड्या भूमीवर अुतरणें सोयीचें व्हावें म्हणून काठावर जो उञ्च नि लाम्ब ओटा बांधतात त्याला जर धक्का हा मराठी शब्द चालतो, तर आगगाडींतून अुतरतांना सोयीचें जावें म्हणून जो अुञ्च नि लाम्ब ओटा बान्धण्यांत येतो त्याला प्लॅटफार्म हा शब्द अथवा 'फलाट' हा अपभ्रष्ट शब्द कशाला ! श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यानी कवितेंत अेके ठिकाणीं 'लोहरथ्या' हा शब्द वापरला आहे. या दुर्बोध शब्दांत हास्यास्पद पण्डिती असेल पण त्यांतील आपलेपण 'रेल्वे' या शब्दांत असणें शक्य आहे काय ! अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांची भाषा अिङ्ग्रजी, पण ते लोक सुद्धा रेल्वे न म्हणतां रेल्रोड म्हणण्याचें स्वातन्त्र्य व्यक्त करितात. जर्मनींत आयूझेन्बान् (लोहमार्ग) किंवा शीनेन्बान् (रूळरस्ता) म्हणतात. मराठीने असे स्वाभिमानपूर्वक नवीन मराठी शब्द—सामासिक

शब्द बनवून कां घेअूं नयेत! रोमान्स्, रोमाण्टिक, यांच्या ठिकाणीं काव्यात्मता, काव्यात्म हे शब्द काय सार्थ होणार नाहीत! पोस्ट–ऑफिसाला डाकघर वा टपालघर म्हटलें तर काय बिनसेल! पुणें विश्वविद्यालयावर अग्रलेख लिहितांना केसरीने मथळ्यांत 'युनिव्हर्सिटी' हा शब्द घालावा हें स्वाभिमानशून्यतेचें अथवा घातुक निष्काळजीपणाचें द्योतक नाही तर काय! सावरकरांच्या शब्दांत साङ्गायचें म्हणजे "तोण्डांत, हाडामासांतून रुळलेल्या शब्दांस परकी म्हणून सोडण्याचा प्रयत्न करितांना, बोलतांना प्रत्येकास फार व (नि) पदोपदीं त्रास होअील, परन्तु या त्रासाने हे शब्द टाळण्याचा आपला निर्धार मात्र अधिक दुणावला पाहिजे. त्रासाचा दोष ज्यांनी आपल्या भाषेंतील ही घाण अुघडी करून दाखविली त्यांचा नसून, ज्यांनी ती काढतां काढली जाअूं नये अितकी वाढूं दिली त्यांचा —आपणां सर्वांचा आहे." नवीन शब्द अुपयोगितांना कुचेष्टेची चिन्ता मुळीच करितां कामा नये. माध्यम या शब्दाचें अेका काळीं असेंच हसूं होत होतें; आज ती स्थिति राहिली नाही.

# २ मराठी भाषेंतील शुद्धीकरण

शब्दकोशाच्या दुसऱ्या खण्डाच्या प्रकाशनसमारम्भांत श्री. नरसोपन्त केळकर हे आपल्या भाषणांत म्हणाले, 'अिङ्ग्रज बायको करून घेणारा हिन्दु मनुष्य व्रात्यस्तोमविधीने आपल्या बायकोला हिन्दु करून घेत नाही का! मग परकी शब्दांवरच बहिष्कार कां! तेथे आपण आक्रमणपर वृत्ति ठेवावी. अशा शब्दांना मराठी व्याकरणाचे प्रत्यय लावून त्यावर आपल्या संस्कृतीचा संस्कार केला म्हणजे झालें'[१] या शुद्धीकरणाविरुद्ध, परभाषेंतील शब्दांच्या स्वीकरणाविरुद्ध मला बोलायचें आहे. 'मराठी व्याकरणाचे प्रत्यय लावून' परभाषेंतीस शब्द कितपत शुद्ध होत असतील ते होवोत; परन्तु असावधपणें आणि अुदासीनपणें त्यांना मराठी भाषेंत आक्रमण करूं देण्याने आणि पाठीभागून हें मराठीचेंच परभाषांवर आक्रमण होत आहे अशा भ्रामक समर्थनाने मराठी भाषेचें भयङ्कर अहित होत आहे हें खोल विचार केल्यास दिसून येअील. परभाषेंतील शब्द हा मराठीच्या देहांतील सत्त्वशोषण करणारा रोग आहे; आणि त्याचें बहिष्करण, निर्मूलन करण्याचा निश्चय केल्याविना मराठी भाषेची शुद्धि नि अभिवृद्धि हीं होणार नाहींत.

विचार, विकार आणि वासना प्रकट करण्याचें भाषा हें एक साधन आहे. समाज जसजसा विकास पावतो तसतशी भाषा प्रभावी होत जाते. भाषेच्या शब्दप्रयोगांत भाषा बोलणाऱ्या लोकांचा अितिहास आणि संस्कृति हीं प्रतिबिम्बित होतात. रामबाण हा शब्द आम्हांला प्रिय असणाऱ्या आमच्या रामाचा प्रभाव सुचवितो, तर नक्राश्रु या शब्दांत अिङ्ग्रजी

---

१ हें औन्ध येथे दिलेलें व्याख्यान पुरुषार्थ मासिकाच्या मार्च १९३५ च्या अङ्कांत आलेलें आहे. १ ता. १९-१२-१९३३ चा केसरी पहा.

वाक्प्रयोगाचें मराठी भाषेवरील आक्रमण दिसतें. भाषा हें एखाद्या राष्ट्राच्या कौटुम्बिक साधर्म्याचें, अैक्याचें द्योतक होतें अेवढेंच नव्हे तर त्या अैक्याचें संरक्षण करून तें दृढतर करण्याचें हें अेक महत्त्वाचें साधन आहे. म्हणून स्वभाषेला स्वधर्मस्वदेशाच्या पङ्क्तींत स्थान आहे. मराठी भाषेची वाढ अशा दिशेने झाली पाहिजे की तींत भावी मराठी पिढ्यांना आमचा पराक्रम दिसावा आणि त्या वाढीचा अभिमानच वाटावा.

फ्रेञ्च लेखक अल्फॉन्सो दॉदे याने लिहिलेली 'शेवटला धडा' ही हृदयस्पर्शी लघुकथा अवश्य वाचून पहा. जेते हे जेव्हा भाषेचें राष्ट्रीय महत्त्व ओळखतात तेव्हा ते जित राष्ट्राची भाषा नामशेष करण्याचा पद्धतशीर प्रयत्न करतात. अल्सास, पोलण्ड इत्यादि देशांत अलीकडे असे प्रयत्न करण्यांत आले, परन्तु स्वत्वरक्षणाच्या कामीं तिकडील जित लोकहि श्वानाप्रमाणे जागरूक राहिल्यामुळे जेत्यांच्या प्रयत्नांना यश आलें नाही. ही जाग फार उशीरा आली तर तिचा काही अुपयोग होत नाही. डी व्हॅलेरा प्रभृति लोकांना स्वभाषेचें—गेलिक भाषेचें—पुनरुज्जीवन करण्याची अिच्छा असूनहि फारसें काही करितां येत नाही. अिराणांतहि शुद्ध फार्सी भाषेंत लिहिण्याची तीव्र अिच्छा पूरिदावूद प्रभृति लेखकांस आहे; परन्तु बाराशेहून अधिक वर्षें झोपेंत गेल्यामुळे मुखोद्गत असलेली प्राचीन शब्द-सम्पत्ति बहुतेक लुप्त झाली आणि अरबी भाषेचें प्राबल्य जें स्थापित झालें तें आता अपरिहार्य होअून बसलें आहे. आधुनिक पहलवी राजवटींतहि आता पहलवी भाषेच्या मुलीचें म्हणजे शुद्ध फार्सी भाषेचें पुनरुज्जीवन अशक्य झालें आहे. तुर्कस्थान मात्र वेळींच जागा झाला आहे. अिच्छेच्या जोडीस सत्ता असल्यामुळे अरबी लिपी नि भाषा यांचें जोखड झुगारून देणें त्यांना तितकें दुर्घट झालें नाही. कुराण तुर्की भाषेंतूनच पढलें पाहिजे, प्रार्थना तुर्की भाषेंतूनच केली पाहिजे, धर्मोपदेश तुर्की भाषेंतूनच झाला पाहिजे इत्यादि दण्डकांची करडी वहिवाट करून त्यांनी धर्मवेडाची तीव्रता बोंथट केली आहे. खेड्यापाड्यांतून हिण्डून तुर्की बोलींतील शब्दांचें

संशोधन, विश्वसनीय स्वभाषाभिमानी विद्वानांच्या समितींकडून करवून नव्या क्रमिक शालेय पुस्तकांतून या शब्दांना चालना देण्यांत आली. सत्तेमुळे ही क्रान्ति सुलभ झाली असली तरी सत्तेच्या अभावींहि अशी क्रान्ति समाजास अवश्य वाटल्यास ती अशक्य नाही. किम्बहुना लोकांनी स्वयंस्फूर्तीने, सहकाराने म्हणजे आत्मबलाने एखादी क्रान्ति घडवून आणण्यांतच त्यांचा स्वावलम्बनासारखा जीवनोपयोगी गुण विकास पावतो. याचा अर्थ राजसत्तेचा उपयोग करून घेऊंच नये असा मात्र नव्हे.

हिन्दवी स्वराज्यांत आपल्याला काय दिसतें ! समशेरबहादुर, वजारत मावसारखीं परभाषेंतील बिरुदें मिरविणें मराठी स्वाभिमानास बाधक वाटत नाहीं. पेशवा शब्दापुढे पन्तप्रधान या शब्दाची पिछेहाट होते. मुसल्मान राज्यकर्ते गांवाचीं मूळचीं नावें फिरवून त्यांना नवीं मुसल्मानी नांवें देतात आणि आपल्या आक्रमणपर कर्तृत्वाचीं स्मारकें देशभर पसरून ठेवतात. अुलटपक्षीं तीं नांवें पालटून पुन्हा प्राचीन नावांचें पुनरुज्जीवन मराठी राज्यकर्ते करीत नाहीत. देवगिरीचें दौलतबाद होतें; पण पुन्हा दौलताबादची देवगिरी होत नाहीं आणि शेवटीं परकीयांचीच दौलत आबाद राहते ! जीं गांवें वा नगरें परकीय राज्यकर्त्यांनी स्थापिलीं त्यांच्याहि नांवांचें हिन्दवीकरण 'जशास तसें' या न्यायाने योग्यच झालें असतें; परन्तु 'अेकाने गाय मारली म्हणून दुसऱ्याने वासरूं मारूं नये' या न्यायाने सुद्धा दौलताबादेचें नांव पुन्हा देवगिरी ठेवायला कांहींच प्रत्यवाय नव्हता. पण ही दृष्टिच मराठी लोकाना नव्हती. अितिहासांत ज्यांचीं नाव घेण्यासारखी कामगिरी नाही, अितिहासांत जे नामशेषहि नाहीत, अशा कित्येक मुसल्मानांचीं नावें गांवांच्या नांवात अवशिष्ट आहेत. परन्तु प्रतापराव गुजर, तानाजी मालुसरे, गोपाळ गोविन्द, सखाराम हरि, हरिपन्त तात्या अित्यादि अनेक शूर वीरांचीं स्मारकें कोठे प्रतापनगर, तानापूर, गोपाळपेठ, सखारामवाडी, हरि-पाली अित्यादि गांवनांवांनी दिसत नाहीत !

मराठी राजकारणी लोकांनी जो परस्परांशीं पत्रव्यवहार केला तो स्वाभा-

विकपणें मराठींतून, परन्तु मुसल्मानी राजवटींत शेकडा तीस चाळीस अरबी फार्सी शब्द घुसल्यामुळे दूषित आणि अशुद्ध झालेल्या मराठींतूनच केला. मराठीचें राष्ट्रीय महत्त्व ते ओळखते आणि त्यांना तिचा तसा निर्भेळ अभिमान असता तर विद्वानांची समिति नेमवून तिच्या द्वारा त्यांनी मराठीच्या शुद्धि-सङ्घटनेचें कार्य केलें असतें. त्या वेळच्या ऐतिहासिक पत्रव्यवहारांतून मराठीचें व्याकरणबद्ध, एकसूत्री, सुसङ्घटित, शिष्ट असें निश्चित स्वरूप आढळत नाही.

अिङ्ग्रजी राजवटींत तर काय पाश्चात्य प्रभावी विद्यांचें आणि कलांचें प्राबल्य माजूं लागलें. त्यांच्या विद्येसमागमें ज्या विविध वस्तूंची आयात होअूं लागली, त्यांचीं विविध अिङ्ग्रजी नांवें समाजाच्या निरनिराळ्या वर्गांच्या बोलींत घुसूं लागली. शिक्षणप्रसाराच्या स्पृहणीय धोरणामुळे संस्कृताचा अभ्यास प्रसृत होअून मराठी लेखनाची भाषा अेकसूत्री, प्रगल्भ नि निश्चित होण्यास साह्य झालें हें खरें; पण विद्वानांच्या मराठी बोलींत अिङ्ग्रजी शब्दांचा भरणा होअूं लागला. वेळींच जागें होअून या परचक्रापासून मराठीचें संरक्षण करण्याचें कार्य विद्वान् लोकांनी अद्याप हातीं घेतलें नाही. सुशिक्षितांच्या द्वारा अशिक्षित लोकांच्या बोलींतहि टैम, सिक सारखे अिङ्ग्रजी शब्द घुसून प्रतिष्ठितपणें वावरूं लागले आहेत.

अिङ्ग्रजी राजवटींतहि मुसल्मानांनी भाषाविषयक धोरण कोणतें ठेविलें हें नि मराठी लोकांनी कोणतें ठेविलें आहे याची तुलना करणें अुद्बोधक होणार आहे. मराठी हिन्दु आणि मुसल्मान दोघेहि वर्ग परकीय सत्ते-खालीच आहेत. मध्यन्तरीच्या काळांत अल्पसङ्ख्याकांच्या फार्सी भाषेचा लोप होअून बहुजनसमाजाला व्यवहारोपयोगी अशी हिन्दी-फार्सीमिश्रित भाषा गोटांत म्हणजे 'अुर्दू'मध्ये निर्माण झाली आणि तिला अुर्दू हें नांव पडलें. या बोलीला भाषेचें प्रगल्भ स्वरूप प्राप्त करून देतांना मुसल्मानांची दृष्टि जर हिन्दुस्थानाबाहेरील अरबी-फार्सी संस्कृतीकडे नसती आणि बहुसङ्ख्य लोकांशीं समरसण्याची जर त्यांची वृत्ति असती तर अुर्दूची वाढ

बनारसी हिन्दीसारखीच झाली असती. काही फार्सी शब्द धर्मभेदामुळे अपरिहार्यपणें तिच्यांत राहिले असते आणि ते कोणाच्याहि डोळ्यांत खुपले नसते. परन्तु मुसल्मानांनी तिला आपली मुसल्मानी भाषा, धर्मभाषा मानण्याची चळवळ केल्यामुळे आणि मुसल्मान लोक जात्याच स्वकीय-सङ्ग्रही आणि साम्यैकदृक् असल्याकारणाने प्रगल्भ अुर्दू भाषा ही जवळजवळ फार्सी भाषाच झाली; आणि देवनागरी लिपींतून लिहावयाची अशी सोपी हिन्दुस्थानी भाषा राष्ट्रीय करण्याचा जो कोठे कोठे तुरळक प्रयत्न झाला तो निष्फळ झाला. बङ्गाल हा असा अेकच प्रान्त आहे की जेथे बहुसङ्ख्य मुसल्मान हे सुसंस्कृत बङ्गाली भाषा बोलतात, नि बङ्गाली देशी लिपी लिहितात. अितरत्र स्थानिक भाषा ही अल्पसङ्ख्य मुसल्मानांची मातृभाषा असली वा ती उत्तम मुखोद्गत असली तरी अुर्दू बोलण्यालिहिण्याकडे त्यांची प्रवृत्ति यशस्वी रीतीने करून देण्यांत येत असल्यामुळे स्थानिक लोकांशीं समरस न होण्यांत धन्यता मानणाऱ्याचे ठिकठिकाणीं वर्ग निर्माण होत आहेत; आणि अशा या अुर्दूस, तींत काही थोडे देशी हिन्दुस्थानी शब्द आहेत अेवढयावरून राष्ट्रभाषा म्हणून सम्बोधण्याचें धाडस सर अक्बर हैदरी-सारखे विद्वान् करीत आहेत.

ठाकरसी महिला-विद्यापीठाच्या पदवीदानप्रसङ्गीं १९२८ या वर्षी अध्यक्ष या नात्याने केलेल्या भाषणांत डॉ. सर रास महमूद यांनी, अुर्दू ही निजामच्या राज्यांत राजभाषा असली तरी ती तेथील अत्यल्पसङ्ख्य अशा मुसल्मानांचीच मातृभाषा आहे, बहुसङ्ख्य हिन्दूंची भाषा प्रान्तपरत्वें मराठी, कानडी वा तेलगू आहे या महत्त्वाच्या गोष्टीकडे श्रोत्यांची डोळे-झाक करवून अुस्मानिया विद्यापीठ, ज्यावर प्रजेच्या लाखो रुपयांचा व्यय होत आहे तें, देशी भाषेंतूनच अुच्च शिक्षण देण्याचा राष्ट्रीय प्रयत्न करून अिङ्ग्रज सरकारास योग्य दिशा दाखवीत आहे असें धाष्टर्याने साङ्गितलें ! जी राजभाषा असेल तीच जर देशी भाषा मानायची तर मुम्बअीकलकत्ता येथील विद्यापीठें सुद्धा कोठे राष्ट्रीय नाहीत ! अिङ्ग्लण्ड आणि हिन्दुस्थान यांत

भिन्न भाव मानिला नाही म्हणजे झालें!

याच्या अुलट मराठी लोकांचें वर्तन कसें आहे हें पाहण्याजोगें आहे. श्रीमन्त सयाजीराव गायकवाड यांनी घरखात्याव्यतिरिक्त अितर राजव्यवहाराची भाषा, बहुजनसमाजाची जी मायबोली ती म्हणजे गुजराथी केली आणि आता तिच्या ठिकाणीं अल्पायासाने जी शिकतां येते व विनायास समजते, त्या हिन्दीची स्थापना करून आपली राष्ट्रीय दृष्टिच प्रकट केली आहे. मराठी ही महाराष्ट्रांतील बहुसङ्ख्य अशा हिन्दूंची मातृभाषा असली तरी तीहि धर्मभाषा मानली जात नाही. नारायण वामन टिळक ख्रिस्ती होते; त्यांची कविता महाराष्ट्र प्रेमाने हृदयाशीं धरितो. दत्तात्रेय भिकाजी रणदिवे हे जैन असून त्यांनी मराठीची सेवा केली आणि त्या सेवेकरिता मराठी जैनेतरसमाजहि त्यांचा कृतज्ञ आहे. सुमन्त हे प्रसिद्ध मराठी कवि लिङ्गाअीत आहेत. याच्या अुलट देअूसकर, सप्रे, कालेलकर आणि बेन्द्रे या गृहस्थांनी आपली मातृभाषा मराठी असूनहि वसतिस्थानपरत्वें अनुक्रमें बङ्गाली, हिन्दी, गुजराथी आणि कानडी भाषांची महनीय सेवा केली आहे; आणि या गोष्टीचेंहि महाराष्ट्राने कौतुकच केलें आहे. आधुनिक काळांत सुसङ्घटित संहतीविना तरणोपाय नाही हें कळूनहि न वळल्यामुळे कोकणीला सवतें पण स्वान्तत्र्य मिळवून देण्यासाठी तळमळणारे श्री. शणै गोयबाब आणि जिल्हानिहाय अम्मळ भिन्न भिन्न अशा शिष्ट मराठी भाषा झाल्या तरी चिन्ता नाही म्हणणारे श्री. पावशे हेहि महाराष्ट्रीयच आहेत!

अखिल महाराष्ट्राला मराठींतून अुच्च शिक्षण देण्यासाठी पुण्यास अेक विद्यापीठ असावें अशी कल्पना निघतांक्षणींच त्या कल्पनेला विरोध करून आपल्या सङ्कुचित नगराभिमानाचें प्रदर्शन करणारेहि सुशिक्षित महाराष्ट्रीयच आहेत! आणि खोल विचार न करितां अितर भाषांच्या चळवळीकडे न पाहतां, मागे अुल्लेखिलेल्या भाषणांत "आपल्या पूर्वजांनी ज्या शब्दांना दूषण मानलें नाही त्या शब्दांवर आपण बहिष्कार टाकण्याचें कारण काय?" अशी पृच्छा करणारे श्री० नरसोपंत केळकर हे तर महाराष्ट्रीय जनतेचे 'केसरी'च आहेत!

कित्येक परभाषेंतील शब्दांनी मराठी प्रतिशब्दांना मागे रेटून स्वतःला मानाचें स्थान बळकाविलें आहे; कित्येक परकीय शब्दांवाचून आमचें क्षण-भरही भागणार नाही असा अनवस्थाप्रसङ्ग ओढवला आहे; आमच्या नडी आम्ही आपल्या परिश्रमांनी दूर न करितां दुसऱ्यांच्याकडून जे शब्द सुच-विले जातील तेच घेऊन त्यावर निर्वाह करण्याची जी बौद्धिक आळसाची खोड आम्हांला जडली आहे तिच्यामुळे नवे नवे शब्द भाषेंतून निर्माण करण्याची जी शक्ति ती नष्ट होऊं पाहत आहे, आणि स्वभाषेच्या स्वाभा-विक वाढीस अपायकारक अशा या स्थितीची आम्हांस जाणीव करून दिली तरी ती होऊं शकत नाही, अितकी आमच्यांत दासवृत्ति बाणली आहे. या चार कारणांकरिता परकीय शब्दांच्यावर बहिष्कार घालावयाचा आहे. आमच्या पूर्वजांना स्वभाषाभिमान नव्हता म्हणून आमच्या अङ्गींहि तो नसावा असें थोडेंच आहे !

फार्सी शब्दांचा अन्तःप्रवेश जेथे आमच्या प्रत्ययांना आणि अव्ययांना खो देण्यापर्यन्त झाला आहे तेथे आम्ही त्यांना 'मराठी व्याकरणाचे प्रत्यय लावून त्यांच्यावर आपल्या संस्कृतीचे संस्कार' करण्याची भाषा कशाला बोलावी ! 'ला' ने 'स' या प्रत्ययास कोकणांतील दोन जिल्हे वगळून अितर सर्व मराठी जिल्ह्यांच्या बोलींतून हाकून लावलें आहे. 'मस' 'तूस' हीं रूपें आम्हांला प्राकृत अशिष्ट वाटतात. 'शिवाय'ने विना, विणें, वीण यांची विल्हेवाट लाविली असून 'बद्दल', 'ऐवजीं' हीं अव्ययें तर अपरिहार्य होऊन बसलीं आहेत.

फार्सी 'पहिल्वाना'ने मराठी मल्लाला मागे रेटल्यामुळेच कुस्ती, पहि-ल्वान अित्यादि शब्दांकडे बोट दाखवून मराठ्यांना मल्लविद्या ही फार्सी मुस-ल्मानांनीच शिकविली असे फुशारकीचे अुद्गार मुसल्मान अधिकारी काढूं लागले आहेत ! 'बरोबर'ने तर सङ्गती, सङ्गें, सवें, समागमें याना चीत केलें आहे. सङ्गें कुणबाऊ बोलींत अजून रूढ आहे, प्राचीन वाङ्मयांत रूढ आहे, पण आजच्या प्रतिष्ठितांच्या बोलींत तो शब्द अवाच्य ठरतो !

आणि फार्सी 'बरोबर' हा सङ्गमनीय, बरोबर म्हणजे निर्दोष ठरतो. 'वतन' या शब्दाला, विचार केला तर 'कुळवाड' वा 'कुळवाडी' हा शब्द काय सुचणार नाही ! पण आपल्या कुळ-वाडीला कोणी जवळ करावें ! आणि तितके स्वावलम्बी परिश्रम कोण करितो ! मुसलमान लोक 'इन्किलाब् झिन्दाबाद्' म्हणून गेल्या दण्डकभङ्गाच्या चळवळींत ओरडत; त्यांनी महाराष्ट्रांत 'चिरञ्जीव क्रान्ति' ! असें कां ओरडूं नये ! पण मराठी लोक मात्र 'बाबू गेनू झिन्दाबाद' असें ओरडत त्याची आम्हांला लाज वाटत नाही. पण लाज वाटते 'चिरञ्जीवाची !' मराठींत एल प्रत्ययाने तेलाचा बोध होतो; जसें जवसेल, तिळेल, खोबरेल. या धर्तीवर राकेलाला (Rock oil) खाणेल वा भुईतेल हा शब्द आम्हांला बनवितां आला असता, तरी आम्ही तो बनविला नाही. मुलाच्या अङ्गाला अभ्रकचूर्ण आम्ही ज्या वस्तूने लावितों त्याला पफ् म्हणून मोकळे होतों; पण त्याचा आकार नि तन्तुमयता पाहतां आम्हांला 'शिरीप' हा शब्द कां सुचूं नये ! 'खुशाल' शब्दानें क्षेम-कुशलांना मागे सारिलें; आणि सुखरूप हा शब्द तरी 'खुश्हाल'चें निवळ भाषान्तर दिसतो. सुखरूपचा सञ्चार आम्ही अगदी मर्यादित केला आहे. 'सुखरूप येऊन पोचलों' असें म्हणतों, पण आम्ही सुखरूप आहों, आपली सुखरूपता कळवावी असें आम्ही म्हणत नाही. 'नक्राश्रु' हें तर Crocodile tears चें निवळ भाषान्तर आहे. नक्र हा आपलें भक्ष्य गट्ट करण्यापूर्वी मानभावीपणाने वा ढोङ्गीपणाने अश्रु गाळितो ही कल्पना हिन्दुस्थानांत मगर विद्यमान असून हिन्दुस्थानातील नाही, तर जेथे मगर नाहीत त्या देशाच्या भाषेंतील आहे, आणि पुन्हा निवळ कल्पनाच आहे ! अशा स्थितींत 'कृतकाश्रु' न म्हणतां आम्ही 'नक्राश्रु' म्हणावें हें दासवृत्तीचें लक्षण नव्हे तर काय !

साहेब या शब्दाचा प्रभाव तर काही न्याराच दिसतो. 'राव' हें महाराष्ट्रीयांचें विशिष्ट बिरुद ! तुळजापूरचा भोप्या राजाश्रयाने पण्डितराव, जोशीराव यांच्याप्रमाणे भोपेराव होतो; पण आता या 'रावा'लाहि साहेबाचा पाठिम्बा मिळाल्याविना तो प्रतिष्ठित होत नाही. 'महाराजा'ला

सुद्धा बहुमानासाठी साहेबाचा टेकू लागूं लागला! भाअूजी, नानाजी यांतील बहुमानदर्शक 'जी'ची तर, नागपुराकडे नव्हे, पण पुणेंमुम्बअीकडे वाताहतच झाली. ही स्थिति उद्वेगजनक आहे. आम्ही रावसाहेब, रावबहादुर या पदव्या मिरविण्यांत भूषण मानतों; मुसल्मान लोक खान-प्रभु, खान-शूर अशा पदव्या स्वीकारतील काय? निजामाच्या हैदराबादेंत अिङ्ग्रजी नांवांच्या पाट्या फारच दुर्मिळ दिसतात. जिकडे तिकडे सार्वजनिक मन्दिरावर अुर्दू नांवांच्या पाट्या आहेत आणि येथे आमच्या संस्थानांत पहावें, तों—स्पष्टोक्तीची क्षमा असावी—ज्यांत राजाज्ञा प्रसिद्ध होतात त्या पत्राला State Gazette (स्टेट गझेट्) म्हटलें जातें! बडोद्यास या पत्राला 'आज्ञापत्रिका' असें नांव आहे, तें युक्त आहे, ग्राह्य आहे.

आमच्या अुदासीन आळशी परावलम्बी वृत्तीमुळे आमची भाषा क्षीण होत आहे आणि सापेक्षतेने पाहता इतर भाषांचें बळ वाढत आहे. 'मला काय त्याचें!' ही भावना सर्वनाशाचें मूळ आहे. आमच्या मराठी शब्दांना ते कुणबाअू असले तरी आम्हीं आधी जवळ केलें पाहिजे. ते आमचे आहेत. परकीय भाषांतील शब्द हे काहीहि झालें तरी परकीच; त्यांच्यामुळे आमचें प्रत्यक्षाप्रत्यक्ष अनहितच होणार. रोगाची जाणीवच अजून कोणास होत नाही. आमच्या अडचणी आम्हींच दीर्घ परिश्रम करून भागवायला शिकलें पाहिजे. या स्वावलम्बी श्रमशीलतेंतच भावी अुत्कर्षाचें बीज आहे. आमची वृत्ति पालटायला हवी. आमची वृत्ति पार पालटली म्हणजे मग शेदोनशे परभाषांतील शब्द मराठींत राहिले काय न राहिले काय, ते मराठीचें काही वाकडें करूं शकणार नाहीत. तोंपर्यन्त परकीय भाषांतील शब्दांवर बहिष्कार हा अत्यवश्य आहे. परकी शब्दांचा बहिष्कार म्हणजेच स्वकीयांचा पुरस्कार नि अुद्धार!

# ३ मराठी शब्दांचा पुरस्कार[१]

महाराष्ट्रशारदा मासिकाच्या ऑक्टोबर मासाच्या अङ्कांत सम्पादक-महाशयांनी विरोध करण्यासाठी का होअीना पण सात स्फुटें लिहून 'भाषा-शुद्धी'च्या चळवळीचा परामर्श घेतला याकरिता मी त्यांचा फार आभारी आहें. परन्तु टीका करण्यापूर्वी त्यांनी माझी भूमिका नीट समजावून दिली नाही. माझा युक्तिवाद त्यांना न पटो, परन्तु मला युक्तिवादच करायचा आहे. अिकडली तिकडली अुदाहरणें देअून लोकांवर तात्पुरती म्हणा वा शाश्वत म्हणा छाप ठेवून द्यावयाची आहे असें मुळीच नाही.

कोल्हापूरच्या सम्मेलनांतला अेक ठराव अैकून मला भाषाशुद्धीची स्फूर्ति झाली हें म्हणणें चुकीचें आहे. दहा वर्षांपूर्वी १९२५ च्या ऑक्टोबर मासांत विविधज्ञानविस्तारांत सावरकरांच्या चळवळीवर अेक विस्तृत लेख लिहून ती अधिक पायाशुद्ध आणि व्यापक केली पाहिजे हेंच मीं प्रतिपादिलें होतें. त्या वेळच्या आणि आताच्या माझ्या विचारांत तात्त्विक भेद कोठेच नाही. तेव्हा मला असें वाटलें होतें की फार्सी शब्द मराठींत अल्पसङ्ख्य आहेत ते बहुसङ्ख्य होण्याचा सम्भव नाही आणि त्यांनी मराठीचे प्रतिशब्द नष्ट केलेले नाहीत. या करिता त्यांच्याविरुद्ध चढाअी न करितां ती अुत्तरोत्तर प्रबल आणि बहुसङ्ख्य होणाऱ्या अिङ्ग्रजी शब्दांच्या विरुद्ध केली पाहिजे. आता अनुभवाने मला असें पटलें आहे की या अल्पसङ्ख्य फार्सी शब्दांनी सुद्धा मराठी शब्दांना मृत्युपन्थाला लाविलें आहे. ही गोष्ट हस्तचापल्याची नाही. ही साक्षात् सिद्ध करून देतां येअील अशी गोष्ट आहे.

---

१ हा अुत्तररूप लेख महाराष्ट्रशारदा मासिकाच्या नोवेम्बर १९३५ च्या अङ्कांत आला होता.

मराठी शब्दांना येत चाललेली ही प्रेतकळा टळावी म्हणूनच मी या स्वकीय शब्दांच्या पुरस्कराच्या चळवळींत पडलों आहें.

मला परकीयांच्या भाषा शिकायला नकोत, त्यांच्याशीं दळणवळण नको, नवमतांचा मला विटाळ वाटतो असें मुळीच नव्हे. परन्तु नवनव्या विद्या शिकलों, नवनव्या कला आत्मसात् करून घेतल्या, नवीन संस्कृतिहि स्वीकारिली, तरी त्यांसरशी परभाषेंतील शब्दहि घेतलेच पाहिजेत असे आहे का? भाषा कितीहि ओजस्वी आणि स्वाभिमानी असली तरी या मार्गांनी काही थोडे शब्द त्या भाषेंत येतील हें मलाहि कळतें. परन्तु मराठी ही आज परवश लोकांची भाषा आहे. मराठीचें दुर्दैवच असें आहे की तिला स्वतन्त्र वैभवाचा काळ फारच थोडा लाभला. तेव्हा स्वतन्त्र राष्ट्रांच्या भाषांशीं तिची तुलना करणें चुकीचें आहे. स्वतन्त्र राष्ट्रांतील लोकांच्या अङ्गीं स्वाभिमान आणि स्वत्वरक्षणाची अिच्छा हीं जशीं अुपजत आणि अुत्कट असतात तशीं तीं आमच्या अङ्गीं आहेत काय? आम्हांला या गोष्टी शिकाव्या लागतात. आपल्या म्हणण्याचा विपर्यास करण्यांत येत आहे, आपली टवाळी होत आहे, हें पाहूनहि या गोष्टी शिकविणाऱ्यांना शिकविण्याचें व्रत चालू ठेवावें लागतें.

मराठी भाषेंत परभाषांतील शब्द कां शिरतात? नवीन नवीन गोष्टी व्यक्त करायला भाषेंत शब्द नाहीत, मराठी भाषा निर्धन वा वान्झोटी आहे म्हणून नव्हे, तर आम्हांला परकी शब्द वापरण्यांत नवी टूम आणि एक प्रकारची प्रतिष्ठा वाटते म्हणून हे परकी शब्द मराठींत घुसले आहेत. आरम्भीं जेव्हा आम्ही हे शब्द वापरतों तेव्हा ते थोडेच सर्वांच्या परिचयाचे असतात? परन्तु ते वापरण्यांत विद्या वा संस्कृति हिचें पाणी दिसत असल्याने लोकांना ते समजत नाहीत याची क्षिति आम्ही बाळगीत नाही. आम्ही पडलों सुशिक्षित, तेव्हा अितर लोक शक्य तो परिचय करून घेअून सुशिक्षितपणाचें लक्षण म्हणून ते शब्द वापरूं लागतात. आमचे शब्द आम्ही थोडे वेळां वापरूं लागल्यामुळे आणि ते वापरण्यांत हीनत्व दिसतें

या शङ्केमुळे आमचे शब्द मृत्युपन्थास लागतात; वा टिकले तर अडाणी गांवढळांच्या बोलींत जीव धरून राहतात, आणि मग काही थोडे लोक या शब्दांचा पुरस्कार करूं लागले की त्यांच्याविरुद्ध काहूर अुठूं लागतें ! प्रभूला चोराविरुद्ध आपलें प्रभुत्व सिद्ध करावें लागतें ! दळणवळणाची अपरिहार्यता वा मराठीची असमर्थता ही या क्रान्तीच्या वा अुत्क्रान्तीच्या मुळाशीं नसून या अुत्क्रमणाचा दोष सर्वस्वी आमच्या 'शेळपट परधार्जिण्या' अस्वाभाविक मनोवृत्तीकडे आहे.

महाराष्ट्र शारदा मासिकाच्या अुपर्युक्त सम्पादकीय स्फुटांतीलच पुढील वाक्यें पहाः—

(१) **कसाब** गाय मारीत असलेला पाहून शिवाजीमहाराजांना अुद्वेग वाटला.

(२) **कायमचें वजन** मारतां येतें.

(३) पुढे ग्रीकाची **स्वारी** झाली.

(४) शास्त्रादिकांची **अदलाबदल** करून ते थाम्बले नाहीत, तर बेटी-व्यवहारापर्यन्त देखील त्यांची **मजल** गेली होती.

(५) तिची नव्या नव्या शब्दांना आत्मसात् करण्याची **जबर** वृत्ति होय.

(६) श्रीमन्त भाषांतून **गरीब** भाषांत शब्द गेले तर नवल नाही.

(७) **रोज** नवीन नवीन विषय **माहीत** होत आहेत.

आता या सात वाक्यांत मिळून जे अकरा शब्द मोठे छापले आहेत त्या शब्दांनी व्यक्त होणाऱ्या गोष्टी का परदेशांतून परकीयांच्या पराक्रमा-मुळे आल्या ? का या व्यक्त करायला 'मराठी भाषा अगदीच निर्धन आहे अशी भीति वाटली ? महाराष्ट्रांत का खाटीक नव्हते, का मराठींत खाटिक हा शब्द नाही ? मग खाटिक या शब्दापेक्षा कसाब या शब्दाचीच अुपस्थिति आधी आणि वारंवार होत असली तर तो दोष आपल्या मनो-वृत्तीचा का गुण 'कसाबा'चा ? बेटीव्यवहारापर्यन्त देखील मजल गेली होती असें न म्हणतां बेटीव्यवहारापर्यन्त सुद्धा धाव गेली होती असें म्हटलें

असतें तर 'सरड्याची धाव कुम्पणापर्यन्त' या म्हणींतच जीव धरून बस-लेल्या 'धाव' शब्दाचा योग्य अुद्धार झाला नसता काय ? 'कायमचें वजन मारतां येतें' या ठिकाणीं 'टिकाअू छाप पाडतां येते' असें सुचत कां नाही ? 'श्रीकांची स्वारी झाली' या स्थानीं 'श्रीकांचें परचक्र आलें' असें कां नाही ? 'जबर वृत्ती'च्या ठिकाणीं 'प्रबल वृत्ति' शोभणार नाही का ? 'माहीत'च्या ठिकाणीं ठाअूक, विदित हे शब्द कां आठवत नाहीत ?

स्वकीय शब्दांच्या पुरस्काराची चळवळ करणारे लोक स्थितिनिष्ठ कूप मण्डूक वृत्तीचे असावेत असा अव-समज करून घेण्याचें काही अेक कारण नाही. अिङ्ग्रजी विद्या शिकलों म्हणजे अिङ्ग्रजी वेषविशेष केला पाहिजे आणि अिङ्ग्रजी वेष करायचा म्हणजे कापडहि मॅन्चेस्टरचेंच पाहिजे असें नाही. आगगाडी अिङ्ग्लण्डांतून आली असेल; पण आगगाडी हा शब्द तर महाराष्ट्रांत बनवितां आला ना ? अशा रीतीने प्रयत्न करून नव्या नव्या गोष्टी व्यक्त करायला लागणारे नवे शब्दहि मराठी घटकांपासून कां सिद्ध कर-ण्यांत येअूं नयेत ? मराठी भाषा अगदीच निर्धन आहे ना ? मग तिच्या आहे त्या थोड्या धनावर माती कां लोटतां ? आणि ती माती लोटणाऱ्यांचें समर्थन कां करितां ? आमची स्थिति आळशी शेतधन्यासारखी झाली आहे. वडिलोपार्जित सम्पत्तीचा झपाट्याने ऱ्हास होत चालला आहे. दुर्ल-क्षामुळे शेतवाडी निकस होत चालली आहे. अशा वेळीं स्वावलम्बी होअून कष्ट करण्याने काही काळानन्तर तरी पूर्वस्थिति प्राप्त होअील का रीण काढल्याने आणि विलासभपका तसाच चालू ठेवल्याने तें वैभव लाभेल ?

अिङ्ग्लिश भाषेमध्ये खटपट, बन्दोबस्त, लश्कर, लाठी अित्यादि शब्द आले आहेत असें म्हटलें तरी या शब्दांना अभिजात अिङ्ग्रजींत स्थान नाही हें आपण विसरतों. हे शब्द सर्वमान्यता मुळीच पावलेले नाहीत. पुन्हा अितर भाषांतील शब्द घेण्याच्या धोरणामुळे अिङ्ग्रजी भाषेची नवीन शब्द निर्माण करण्याची प्रवृत्ति आणि शक्ति हीं नष्ट झालीं आहेत, हें जर्मन भाषेच्या तुलनेने तत्काळ स्पष्ट होअील. परन्तु त्या गोष्टीची खन्त आम्ही

करण्याचें कारण नाही. अिङ्ग्रजी भाषेंत सुद्धा सर्व शब्दांना सारख्या पायरीने वागविण्यांत येतें असें नाही. ग्रीक, लॅटिन भाषांतून आलेले शब्द वापरण्यापेक्षा अिङ्ग्लिश अँङ्ग्लो सॅक्सन शब्द योजणें श्रेयस्कर मानण्यांत येतेंच.

शेवटीं साङ्गायचें तें हें—स्वकीय शब्दांचा अुद्धार करण्याची चळवळ ही आत्मघातकी नाही. स्वकीय शब्दांकडे दुर्लक्ष करून परकीय शब्द मिरविण्याच्या आमच्या आत्मघातकी मनोवृत्तीमुळे जे मराठी शब्द मृत्युपन्थाला लागले आहेत ते तसे लागूं नयेत म्हणून ते परकीय शब्दांहून जवळचे आणि श्रेयस्कर आहेत हें लोकांना आग्रहाने साङ्गावें लागत आहे. मराठी शब्द प्रयत्न केल्यास आठवतात, अेवढ्यावरून ते मरणोन्मुख नाहीत असें मानणें चुकीचें होअील. परकीय शब्दांची अुपस्थिति किती सहज होते आणि त्यांचा अुपयोग किती वेळां होतो, त्यांच्या मानाने स्वकीय प्रतिशब्दांची अुपस्थिति किती वेळां आणि किती कष्टाने होते आणि त्यांचा अुपयोग किती क्वचित् करण्यांत येतो याचें प्रत्यन्तर प्रत्येकाने अवश्य पहावें. प्रत्येक मनुष्य आपल्या डोळ्यांचा नीट अुपयोग करील तर दिग्दर्शन करण्याचीहि आवश्यकता अुरणार नाही.

शेवटीं विनन्ति हीच. हवी तितकी कडक टीका करा; परन्तु विपर्यास करून वाचकांची दिशाभूल करूं नका. आम्हांला कोणाचा बुद्धिभेद करावयाचा नाही. पडलेली भुरळ तेवढी दूर करावयाची आहे.

# ४ सावरकरी भाषाशुद्धीची चिकित्सा[१]

रावमहाशय विनायक दामोदर सावरकर हे मोठे कर्ते सुधारक आहेत. ज्या थोड्या ध्येयनिष्ठ, कष्टाळू नि प्रभावी व्यक्तींच्या कृतीमुळे महाराष्ट्र अुत्तरोत्तर अुज्ज्वल, स्वावलम्बी नि निर्भीड होत आहे त्यांच्यांत यांची गणना होते. जें ते प्रतिपादितात तें ते आधी स्वत: आचरणांत आणितात. दहा अकरा वर्षांपूर्वी केसरी वर्तमानपत्रांत अेक लेखमाला लिहून त्यांनी मराठी भाषेच्या शुद्धीकरणाचा प्रश्न प्रथम महाराष्ट्रीयांच्या पुढे माण्डला. सावरकर या व्यक्तीच्या माहात्म्यामुळे आणि त्यांच्या लेखणीच्या प्रभावामुळे या प्रश्नाची थोडीबहुत चर्चा झाली. परन्तु त्यांच्या अुपक्रमाला विशेष विरोध होण्यापेक्षा सुखासीन सवय-बद्ध लोकांकडून त्याचा अुपहासच अधिक झाला. खिस्ताब्द १९२५ च्या ऑक्टोबर मासाच्या विविधज्ञान-विस्ताराच्या अङ्कांत मीं अेक लेख लिहून ही अिष्ट चळवळ प्रेमाधिष्ठित आणि व्यापक केली पाहिजे असें प्रतिपादिलें. नन्तर अेक वर्षाने सावरकर यांनी आपली पूर्वीची लेखमाला सङ्कलित करून आणि तींत थोडी भर घालून 'मराठी भाषेचें शुद्धीकरण' या नांवाने अेक पुस्तिका प्रकाशित केली. तरी महाराष्ट्रीयांच्या डोळ्यांवरची झापड अुडेना. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी १९२७ मध्ये पुणें येथे भरलेल्या महाराष्ट्रसाहित्य-सम्मेलनांत जें अध्यक्षीय भाषण केलें त्यांत सावरकरी भाषाशुद्धीची, तात्यारावांची थट्टाच होती. गद्यांतून अरबीफार्सी शब्दांची अुचलबाङ्गडी करावी असें कोणास वाटत नाही; परन्तु तेच शद्ब काव्यांत, पद्याच्या भाषेंत आढळले की डोळ्यांत खुपूं लागतात, हृदयाला बोचूं लागतात आणि

---

१ हा लेख प्रतिभा पाक्षिकाच्या १५जानेवारी १९३६ च्या सावरकर विशेषाङ्कांत आला होता.

भाषेला विद्रूप करण्यांत येत आहे अशी हाकाटी होते. १९३२ च्या डिसेम्बर मासांत कोल्हापूर येथे साहित्यसम्मेलनाच्या विषयनियामक समितीच्या बैठकींत अशा हाकाटीला आरम्भ होतांच जो प्रसङ्ग घडला त्याने माझें लक्ष या प्रश्नाकडे अधिक निकडीने वेधिलें गेलें तो प्रसङ्ग असा—

कोणी अेक मुसल्मान गृहस्थ, 'अरबी–फार्सी ग्रन्थांचीं भाषान्तरें मराठींत करण्यांत यावींत' अशा आशयाचा आपला ठराव मान्य करून घेण्यासाठी सदस्य म्हणून महाराष्ट्रसाहित्यसम्मेलनाला अुपस्थित झाले होते. विषयनियामक समितींत हा ठराव पुढे यायला विलम्ब होत आहे असें दिसतांच त्यांनी अुठून निक्षून साङ्गितलें की "मी या ठरावासाठी येथे आलों आहें. हा ठराव मान्य करणार नसाल तर तसें साङ्गा. मी अुदअीक आपल्या घरीं परत जाअीन." या भाषणावरून त्यांचें प्रेम कशावर होतें हें अुघड दिसतें. ज्ञान हें कोठीलहि असलें तरी पवित्र नि ग्राह्यच असल्याने अरबी-फार्सीच्या जोडीस कानडी, तेलगू अित्यादि भाषांना बसवून तो सुधारलेला ठराव मान्य करून घेण्यांत आला. नन्तर कोणीतरी, मराठींत विदेशी, विजातीय शब्द वापरल्याने भाषेची सुभगता नष्ट होते, याकरिता असे शब्द वापरण्यांत येअूं नयेत असा ठराव पुढे आणला. या ठरावाचा मोहरा (रोख नव्हे) माझ्यावर होता हें दिसतच होतें, आणि आता मनोरञ्जक नि अुद्बोधक टीका अैकायला मिळेल या आनन्दांत मी होतों तोंच अुपरिनिर्दिष्ट मुसल्मान गृहस्थ अुभे राहिले आणि त्यांनी समज़ दिली की, "मराठींतून अरबी-फार्सी शब्दांची हकालपट्टी करण्यांत यावी असा जर या ठरावाचा अर्थ असेल तर साम्भाळा! हिन्दुमुसल्मानांचें सख्य नष्ट होअील," हे शब्द अेकून सभेंची धर्मराजी शान्ति ढळली नाही; आणि वेळेच्या अभावीं ठराव गाळून टाकण्यांत आला. नन्तर विषयनियामक मण्डळाचे सदस्य निवासस्थानीं जाअून झोपले असतील; पण मध्यरात्र अुलटून गेली असूनहि मला ती समज झोप येअूं देअीना. स्वकीयांच्यावर मी अधिक प्रेम केलें तर यांच्या पोटांत कां दुखावें! आणि यांनी झुन्जासक

अुठावें ! हे आम्हांला स्वकीय मानतात काय ! माझ्या कुटुम्बांतील माणसांना पोटभर खाअूं घालण्याची, त्यांना औषधपाणी देअून स्वास्थ्यांत ठेवण्याची का मला चोरी असावी !

काही दिवसांपूर्वी अेका सार्वजनिक सभेंत अेका सहृदय रसिक मुसल्मान अधिकाऱ्याने पुढील युक्तिवाद लढविला. हे सद्गृहस्थ महाराष्ट्रांतील आहेत, चाङ्गलें मराठी जाणतात नि बोलतात. ते म्हणाले, ''आमच्या अरबी-फार्सी शब्दांविषयी आपण अितकी असहिष्णुता दाखवितां यावरून आपण आम्हांला किती सामोपचाराने नान्दवाल हें दिसतेंच आहे. आम्ही मुसल्मान असलों तरी हिन्दुस्थानांतीलच आहों ना !'' मी या गोजिरवाण्या युक्तिवादावर तत्काल तोड केली. मी म्हटलें, ''तुम्ही हिन्दुस्थानांतील आहां असें म्हणतां. भोगभूमि म्हणूनच हा देश तुम्हांला प्रिय असेल पण याच देशांतील बहुसङ्ख्य मुसल्मानेतर लोकांविषयी तुम्हांला कधी पोटतिडीक असते कां ! तुमची दृष्टि पूर्वीपासून बाहेरच कां विहरते ! व्रज आणि फार्सी या भाषा बोलणाऱ्यांचें विशेष दळणवळण गोटांत झाल्यामुळे अुर्दू ही नवीन गोट-बोली स्वाभाविकपणें निर्माण झाली हें खरें. प्रथमतः ही व्यावहारिक बोली म्हणून अस्तित्वांत आली. पुढे हिच्यांत वाङ्मय निर्माण करून तिला प्रगल्भ आणि सुसंस्कृत करितांना हिन्दुस्थानच्या प्रगल्भ भाषांतून संस्कृतीचा शब्दसङ्ग्रह सिद्ध असून बहुसङ्ख्य लोकांच्या परिचयाचा तो आहे ही गोष्ट ध्यानांत घेअून, अिराणअरबस्थानाकडे धाव न घेतां या स्वदेशी शब्दसम्पत्तीचा सहानुभूतिपूर्वक परामर्श तुम्ही घेतला असता तर हिन्दुस्थानांतील राष्ट्रभाषेचा प्रश्न कधीच सुटला असता. परन्तु परकेपणा तुम्ही ठेविलात, दुजा भाव तुम्ही दाखवितां. तुम्ही महाराष्ट्रांत असूनहि मराठीला मातृभाषा न मानितां अुर्दूला मातृभाषा मानिता. तुम्ही तुमची सवती सत्ता स्थापिल्यावर आम्ही आमच्या स्वत्वसंरक्षणाच्या मार्माला लागलों तर तुम्हांला साशङ्क होण्याचें काय प्रयोजन आहे ?''

मराठी भाषेचें शुद्धीकरण हें सावरकरांना हिन्दुसङ्घटनेच्या विविध

अुपाङ्गांतील अेक अुपाङ्ग वाटतें तसें तें मला वाटत नाही. हिन्दूंची सङ्घटना मलाहि हवी आहे, परन्तु तिच्यासाठी भाषेंतून मुसल्मानी शब्दांची हकालपट्टी करण्याची सुतराम् आवश्यकता नाही. स्वार्थत्यागी प्रेम केल्याने, ममत्वाची व्याप्ति वाढविल्याने, धर्माचा खोल विचार केल्यानेच ही सङ्घटना सिद्ध होअील. सावरकर म्हणतात, "मराठी भाषेच्या शुद्धीकरणाची खटपट आम्ही करावी म्हणून म्हणतों तें शुद्धीकरण विशेषतः या मुसल्मानी शब्दांपासून होय" (पृ १). ते पुढे म्हणतात, "शुद्धीकरणाचा अर्थ मराठींतून कानडीपासून संस्कृतापर्यन्त सर्वच भाषांतील शब्द काढणें असा जे समजतात त्यांना या शुद्धीकरणाच्या चळवळीचें अन्तरङ्ग आणि अर्थ कळलाच नाही असें म्हणावें लागतें. हिन्दुभाषासङ्घ सोडून अहिन्दु भाषांतील शब्द—ते जुने असोत वा नवे असोत—विनाकारण आणि शक्य तोंवर आपल्या भाषेंत डोअीजड होअूं देअूं नयेत ही शुद्धीकरणाची सङ्क्षिप्त व्याख्या आहे." सावरकर यांना शुद्धीकरणाची स्फूर्ति बङ्गाली आणि हिन्दी या भाषांत झालेल्या चळवळींवरून मिळालेली दिसते; आणि 'महाराष्ट्राने मागे राहतां कामा नये' असा त्यांचा आग्रह आहे.

सावरकर यांची चळवळ हिन्दुसङ्घटनेसाठी हिन्दुधर्माभिमानावर अुभारलेली आहे; आणि ते त्या चळवळीला मराठी भाषेचें शुद्धीकरण म्हणतात. माझी खटपट स्वत्वसंरक्षणासाठी असून ती स्वभाषाभिमानावर अुभारलेली आहे; म्हणून मी माझ्या अुद्योगाला स्वकीयांचा पुरस्कार आणि अुद्धार म्हणतों. भाषांचे हिन्दु आणि अहिन्दु असे वर्ग मी करीत नाही तर मराठी आणि अमराठी असे दोन वर्ग कल्पितों. मला "मुसल्मानी शब्दांची घाण" येत नाही. सावरकर यांना "अुर्दू शब्दाचा मुसल्मानी स्पर्श प्राणघातक" वाटतो तर मला सर्वच विदेशी शब्दांचा स्वीकार हा प्राणघातक वाटतो. हिन्दुसङ्घटनेविषयी वाटणारी तळमळ आणि हिन्दीबङ्गाल्यांनी केलेली चळवळ यांचा गन्ध लागूं न देतांहि स्वत्वसंरक्षणाचा अुद्योग आरम्भितां आणि चालू ठेवितां येअील. स्वकीयांच्या पुरस्काराच्या नि

अुद्धाराच्या मुळाशीं स्वकीयांवरील प्रेम आहे; आणि स्वावलम्बनाचा मार्ग कष्टमय असला तरी समर्थ जीवनाचा मार्ग तोच आहे म्हणून त्या मार्गाने मला जावयाचें आहे.

मराठी भाषेचें स्वरूप कसें असावें हें केवळ हिन्दूंनीच ठरवावयाचें नाही. मराठी ही ज्यांना मातृभाषा वाटते; तिच्या वाङ्मयाविषयी, अितिहासाविषयी आणि परम्परेविषयी ज्यांना साभिमान आपुलीक नि पोटतिडीक आहे त्या सर्वांनी सहकार्याने हा प्रश्न सोडवावयाचा आहे. आता अशा लोकांत हिन्दु बहुसङ्ख्य आहेत हें निर्विवाद आहे. परन्तु अितर धर्मांतील वा प्रान्तांतील लोकांना मराठीला मातृभाषा मानून, तिच्याविषयी साभिमान ममत्व बाळगून, तिची सेवा करायला यत्किञ्चित् आडकाठी नाही.

मराठी असे आमुची मायबोली जरी भिन्न धर्मानुयायी असूं
पुरी बाणली बन्धुता अन्तरङ्गीं हिच्या अेक ताटांत आम्ही बसूं.

असें माझें राष्ट्रीय ध्येय आहे. परन्तु ज्यांना महाराष्ट्रांत राहूनहि मराठी ही मातृभाषा वाटत नाही, ज्यांचे डोळे महाराष्ट्राबाहेरच नव्हे तर हिन्दुस्थानाबाहेर सदा लागलेले असतात अशा लोकांना मराठी भाषेचें स्वरूप कसें असावें या प्रश्नावर मत देण्याचा वा बोलण्याचा अधिकार मुळीचनाही हें मात्र निर्भीडपणें आणि निक्षून महाराष्ट्रभर पुकारण्याची वेळ आली आहे.

भाषैक्याचें ध्येय सावरकरांच्या प्रमाणेच माझ्याहि पुढे आहे; आणि हिन्दुस्थानांतील भाषा या आर्यवंशोद्भव असोत वा द्राविडवंशोद्भव असोत, त्यांच्या संस्कृतीच्या भाषेंत संस्कृतच शब्द असल्याने, प्रान्तिक दळणवळणाच्या सोयीच्या दृष्टीने, संस्कृत शब्दांचा परिमित अुपयोग व्हावा हें अुजू आणि अिष्ट आहे. तथापि संस्कृत शब्दांचा अुपयोग हा मुद्धा प्रादेशिक शब्दसम्पत्तीच्या मुळावर येणार नाही याविषयी काळजी घेतलीच पाहिजे.

मराठी शब्दांच्या पुरस्कारांत अ-मराठी शब्दांचा बहिष्कार ओघानेच येतो यावरून अ-मराठी शब्दांच्यावर वा अमराठी भाषांच्यावर माझा रोष आहे असें सकृद्दर्शनीं वाटण्याचा सम्भव आहे. परन्तु अ-मराठी भाषांच्या-

वर रोष करण्याचें मुळीच कारण नाही. मराठी लोकांनी त्यांचा अवश्य अभ्यास करावा, त्यांच्यांतील ग्रन्थ भाषान्तरावेत, आणि शक्य असल्यास मराठी ग्रन्थांचीं भाषान्तरें त्या अमराठी भाषांत अवश्य करावींत. राग खरो-खर कशाचा येत असला तर तो अितरांचा[1] नव्हे आमचाच,—आमच्या-च स्वाभिमानशून्य परधार्जिण्या मनोवृत्तीचा येतो. आम्हीच आळसाने, औदासीन्याने वा कुतूहलाने अमराठी शब्दांचें स्वागत करितों. त्या शब्दांच्या योजनेने शिष्टपणा मिरवितों. त्या शब्दांची अुपस्थिति सहज आणि वारंवार होअूं लागते. स्वाभिमानशून्यतेमुळे, असावधपणामुळे नि अनभ्यासामुळे मराठींतील जुने शब्द मागे पडतात, स्मरणांतून जातात, नष्ट होतात आणि भाषेचें मराठपण तितकें खङ्गतें. अ-मराठी शब्द डोअीजड होतात, अपरि-हार्य वाटूं लागतात. जेव्हा नवीन अेखादी गोष्ट भाषेच्या द्वारा व्यक्त करा-यची असते तेव्हा स्वभाषेंतील घटकांपासून नवे शब्द निर्मिले जावेत हें स्वाभाविक आणि स्पृहणीय होय. अभ्यासाने असे नवे शब्द सहज निर्मितां येतात. पण आळस वाढला, आयते शब्द मिळूं लागले, अडचण भासेना-शी झाली की अभ्यास राहत नाही आणि अनभ्यासाने भाषेची नवनवे शब्द निर्माण करण्याची शक्ति क्षीण होते. अ-मराठी शब्दांचे लाड पुरविल्याने मराठी शब्द मृत्युपन्थास लागतात आणि मराठीची सर्गशक्ति क्षीण होते अशी दुहेरी नि पुन्हा भरून न येणारी हानि होते. म्हणून स्वावलम्बी व्हा आणि स्वकीय शब्दांचा पुरस्कार करा असें लोकांच्या कानींकपाळीं ओर-डून साङ्गावें लागत आहे.

---

१ परकी शब्द वाअीट अर्थाच्या अभिव्यक्तीसाठी अुपयोगितां येतात आणि या शब्दांच्या अुपयोगावरून ते शब्द मूळ ज्या भाषेंतील आहेत ती भाषा बोलणाऱ्याविषयी अनादर जागृत राहतो म्हणून त्या शब्दांवर बहिष्कार घालूं नये अशी विक्षिप्त विचारसरणी श्री. गो. कृ. मोडक यांनी ता. १२ नोवेम्बर १९३७ च्या ज्ञानप्रकाशांतील ‘तात्या-राव सावरकर व मराठीचें शुद्धीकरण’ या आपल्या लेखांत व्यक्त केली आहे ! ती मला मुळीच मान्य नाही हें मी ता. ७ जानेवारी १९३८ च्या ज्ञानप्रकाशांत प्रसिद्ध झालेल्या माझ्या विस्तृत अुत्तरांत स्पष्टपणें साङ्गितलें आहे.

आमची मनोवृत्ति खरोखरीच विलक्षण परधार्जिणी आहे. स्वकीयांच्या मताची आम्ही क्षिति करीत नाही; परन्तु परकीयांच्या (स्वाभाविकपणेंच स्वार्थी) चाळूगल्या मतासाठी हवें तें करण्यास सिद्ध होतों आणि पुन्हा तें प्रशंसापत्र स्वकीयांच्या नाकावर टिच्चून मिरविण्यांत आयुष्याची अितिकर्तव्यता मानतों. स्वकीयांची सर्वसामान्य भरभराट होण्याने व्यक्तीलाहि आपोआप लाभ होतो त्याचें महत्त्व आम्हांस पटत नाही. अितर स्वकीयांना काही प्राप्ति न होतां व्यक्तीलाच ती झाली तरच तिला त्या प्राप्तीचें महत्त्व वाटतें; आणि अशा रीतीने व्यक्तिशः स्वतःचा लाभ करून घेण्याकरिता परक्यांशी सन्धान बान्धून स्वकीयाचें साङ्घिक अहित करण्यांत आम्हांला मुळीच अधर्म दिसत नाही. स्वकीयाचें हित साधण्याची, त्यांचें समर्थन करण्याची आम्हाला भीति नि लाज वाटते. स्वकीयांस सहानुभूति न दाखविण्यात आणि परकीयांच्याविषयी ती दाखविण्यांत आम्ही वसुधैव कुटुम्बकम् असें परमोच्च तत्त्व पाळीत आहों अशी आमची खुळी समजूत झालेली असते. स्वकीयांच्या निरनिराळ्या वर्गांत साम्येंहि असतात आणि भेदहि असतात. परन्तु आम्ही भेदांचेंच स्तोम माजवितों आणि अितरांनी आम्हांला तुम्ही भिन्न भिन्न आहांत असें म्हटलें की माना डोलावितों! अितरांनी ठरविलेली गोष्ट आम्हांला कधीहि शङ्कास्पद वाटत नाही. बेळगांव जिल्हा सर्वस्वीं कानडी आहे असें कोणी दडपून म्हटलें की आम्ही निमूटपणें डोळे मिटून होकार देतो; आणि ज्यांची मायबोली मराठी आहे अशा चन्दगड-खानापूरकडील शेतकऱ्यांच्या, कष्टाळू भूपुत्रांच्या खेड्यांविषयीची आपुलीक सोडून देतों. स्वकीयांच्या चळवळीविषयी आम्ही नानाप्रकारच्या शङ्का कुशङ्का काढून तटस्थ राहूं अिच्छिणाऱ्या आपल्या मनाची समजूत पाडतों. जेथे कोणत्याहि मराठी मनुष्याला प्रतिबन्ध नाही अशा महाराष्ट्रसाहित्यसम्मेलनाने जी शुद्धलेखनसमिति नेमली, जिने तडजोडीने आणि परिश्रमपूर्वक प्रश्न निर्णयात काढिले, आणि जिच्या निर्णयाला मान्यता ठिकठिकाणीं भरलेल्या महाराष्ट्रसाहित्यसम्मेलनाच्या

अधिवेशनांत देण्यांत आली त्या समितीची कृतीची काहीच बूज न करण्यांत पर्यायाने आम्ही मराठ-राष्ट्राची अप्रतिष्ठा करीत आहों याची जाणीव आमच्या संवयबद्ध लेखकांना, सम्पादकांना, मासिकाच्या चालकांना आणि विद्यापीठांतील अधिकारारूढ व्यक्तींनाहि यत्किञ्चित् नाही. पण परकीयांच्या चळवळीकडे मात्र आम्ही 'मला काय त्याचें!' असा प्रश्न करणाऱ्या अुदासीन वृत्तीने पाहतों. अम्बेजोगाअी या आम्हांला वन्द्य असणाऱ्या क्षेत्राचें नांव मोमिनाबाद असें फिरवून ठेवण्यांत आलें तरी आमचें स्वास्थ्य बिघडत नाही; परन्तु ज्या आमच्या देवगिरीची बळें दौलताबाद करण्यांत आली त्या दौलताबादेचीं पुन्हा देवगिरी कधी होअील का अशी आशा सुद्धा अेखाद्याने प्रकट केली तर आम्ही शान्तिपाठी महात्मे तत्काल घाबरून त्याला वाळींत टाकायला मागेपुढे पहात नाही. येथे शाब्दिक प्रश्नांचाच विचार कर्तव्य आहे. त्यांत सुद्धा आमची वृत्ति अितकी स्वत्वपराङ्मुख नि परधार्जिणी दिसते; आणि या प्रकरणीं आमचा सुशिक्षित समाजच—म्हणजे ज्ञानासाठी नव्हे, तर पोटासाठी दोन विदेशी अक्षरें शिकलेला समाज—हाच अत्यन्त अपराधी आहे.

ब्रिटिश साम्राज्यांतच आम्हांला म्हणजे ब्रिटिश हिन्दुस्थानी प्रजाजनांना काही प्रदेशांत जाअून वसाहत करण्यास आडकाठी आहे.यांत आम्हांस अन्याय काही वाटत नाही. ही आडकाठी कां, तर आमच्या स्पर्धेमुळे त्या लोकांची स्थिति खालावण्याचें भय आहे म्हणून. त्या त्या वसाहतीच्या सत्ताधीशांचें स्वकीयांच्यावर प्रेम आहे, ते केवळ त्यांना स्पर्धेत हटूं नका असा तोण्डी अुपदेश करीत नाहीत तर स्पर्धेची पाळीच येअू नये म्हणून आम्हां परकीयांना जवळ येअूं देत नाहीत. त्यांचें स्वकीयाच्या ठायीं हें जसें प्रेम आहे तसें आम्ही आमच्या भाषेंतील स्वकीय शब्दांच्यावर ठेविलें तर पाप कसें होअील ! अेखादा हिन्दी मनुष्य अेखाद्या वसाहतींत काही दिवस राहिला तरी जर तो तेथील 'स्वकीय' मानला जात नाही तर मराठी भाषेंत पूर्वजांच्या मूर्खपणामुळे घुसून, मराठी शब्दांशीं स्पर्धा करून त्यांना मृत्युपन्थास

लावणारे परकी शब्द हे मराठी कसे ! मराठीचा मराठपणा अुणावणारे हे शब्द मराठी कसे ! आमच्या सुखसोयीसाठीच जणू काय जन्मास आलेल्या या शब्दांचें साहाय्य घ्यायचें नाही असा निश्चय केला की नडवणूक होते; आणि मनाची नडवणूक झाली की मगच मन विचार करायला, शोधायला लागतें; आणि लौकर वा अुशीराने पण मराठी योग्य शब्द आठवूं लागतात.

आम्ही खरोखरच पढतमूर्ख आहों. अिङ्ग्लण्डचें धोरण खुल्या व्यापाराचें होतें तेव्हा आम्ही खुल्या व्यापाराची महती गाऊं लागलों; आमच्यांतील जे कोणी स्वसंरक्षक धोरणाचा पुरस्कार करीत त्यांना आम्ही वेड्यांत काढीत असूं. पण अिङ्गलण्डचें हें खुल्या व्यापाराचें धोरण सनातन होतें का ! तें शाश्वत राहिलें का ! खुल्या व्यापारापासून अिङ्ग्रजी लोकांचें हित साधत नाही असें दिसतांच ब्रिटिश वस्तु घ्या, साम्राज्यान्तर्गत सौलती ठरवा असे नवे तत्त्व-घोष अुठूं लागले ! भाषेच्या गोष्टींतहि केवळ गोण्डस दिसणाऱ्या तत्त्वावर भाळणें अिष्ट नाही. भाषेचें मराठीपण राहून तिचा साक्षात् अभ्युदय ज्याने होअील अशा धोरणाने आम्ही चाललें पाहिजे. अिङ्ग्रजी भाषेचें अुदाहरण घेणें चुकीचें आहे. ती आज गेलीं सातआठशें वर्षें तरी स्वतन्त्र अशा राष्ट्राची भाषा आहे. त्या राष्ट्राच्या दिग्विजयासङ्गती तिने चारहि खण्डांत सञ्चार केला आहे. जेत्याला मिळणाऱ्या खण्डणीप्रमाणे जगाच्या भाषांतील काही शब्द तिने घेतले आहेत; हें तिच्या प्रभुत्वाचें द्योतक आहे. मराठी भाषें-तील परकी शब्दांच्याविषयी आम्हांला असें म्हणतां येत नाही. पुन्हा अिङ्ग्रजी भाषेंत निरनिराळ्या भाषेंतील शब्द येअूं दिल्याने नव्या नव्या गोष्टी व्यक्त करण्याकरिता नवे नवे शब्द निर्माण करण्याची तिची शक्ति क्षय पावली आहे हें जर्मन भाषेशीं तुलना करून पाहिली असतां सहज कळण्या-सारखें आहे. आता अिङ्ग्रज लोकांना हा तोटा वाटत नसेल म्हणून तसा तोटा आपल्या भाषेचा झाल्यास तो आपल्याला वाटूं नये असें थोडेंच आहे ! विदेशी शब्दांच्यावर निर्वाह न करितां स्वतः कष्टून, नवे शब्द निर्माण करून त्यांच्यावर निर्वाह कां करायचा तर परावलम्बनाने तात्कालिक सोय

होत असली तरी तें शेवटीं सर्वनाशास कारणीभूत होतें म्हणून. स्वावलम्बनाची तपश्चर्या कितीहि खडतर असली तरी ती सामर्थ्य आणि आयुष्य या दोहींची वृद्धि करते. यासाठीच स्वान्तत्र्याला डोळ्यांत तेल घालून जपणारीं राष्ट्रें स्वसंरक्षणाच्या साधनसामग्रीच्या प्रकरणीं स्वावलम्बनच आचरितात; मग तें स्वावलम्बन आर्थिक दृष्ट्या कितीही महाग पडो.

अेखाद्या विदेशी शब्दाला मराठींत प्रतिशब्द आढळूं शकतो अेवढ्यावरून तो मराठी शब्द मागे पडला नाही हें सिद्ध होत नाही. परन्तु तें तसें सिद्ध होतें हें गृहीत धरण्याची घोडचूक मीं माझ्या दहा वर्षांपूर्वील लेखांत केली आहे[१]. कम्बर याला मराठी शब्द कड वा माज हा आहे; परन्तु अेवढ्याने असें म्हणतां येणार नाही की कम्बर या विदेशी शब्दाच्या आगमनाने कड वा माज हा शब्द मागे पडला नाही आणि म्हणून मराठीचा काही तोटा झालेला नाही. शब्दाचें जिवन्तपण त्यांच्या पौनःपुन्यावर अवलम्बून असतें. कर्ज या विदेशी शब्दाला ऋण हा प्राचीन संस्कृत आणि रीण हा मराठी शब्द आहे. परन्तु अेवढ्यावरून त्यांचें आयुर्बल सारखें म्हणतां येणार नाही. ऋण शब्द वापरणारा सहस्रांत अेक असेल, आणि त्यालाहि त्या शब्दाची अुपस्थिति शम्भरांत अेक वेळ होत असेल. अशी स्थिति असल्यास या कर्ज-ऋणांच्या पौनःपुन्याचें प्रमाण लक्षाला अेक असें पडेल! तेव्हा मराठींत विदेशी शब्दांना प्रतिशब्द आहेत कीं नाहीत अेवढीच अेक गोष्ट ध्यानांत न घेतां त्या स्वकीय प्रतिशब्दांपैकी किती स्मरतात, आणि स्मरतात ते अितर विदेशी शब्दांच्या मानाने कितीदा योजण्यांत येतात हें प्रत्येकाने आपल्या मनाशीं ताडून पाहिलें पाहिजे. हें काम फारच अुद्बोधक होअील. बरोबर याला सङ्गें आणि सङ्गती असे दोन प्रतिशब्द आहेत, परन्तु ते अशिक्षितांच्या बोलींत आहेत, आणि अशिक्षित लोक उत्तरोत्तर सुशिक्षितांच्याच भाषेचें अनुकरण करणार हें स्वाभाविक आणि निश्चित असल्यामुळे 'बरोबर'च्या स्वीकाराने सङ्गे नि सङ्गती हे दोन मराठी

१ मागे पृ. ९-१० वराल टीप पहा.

शब्द मृत्युपन्थास लागले असें समजण्यास काही प्रत्यवाय नाही.

हा स्वकीय शब्दांच्या पुरस्काराचा प्रश्न किती बिकट नि किती निकडीचा आहे पहा. स्वतः सावरकर हें कार्य मोठ्या दक्षतेने करीत आहेत ना! पण ते सुद्धा, हे अनायासें सुचणारे शब्द परकी आहेत अशी शङ्का आधी येणार तेव्हा मग त्यांना बहिष्कृत करून त्यांच्या ठिकाणीं मराठी शब्द प्रयासाने शोधून घालणार ना! त्यांच्या मराठी भाषेचें शुद्धीकरण याच पुस्तिकेंत पुढील विदेशी शब्द चुकून योजिले गेले आहेत. (आंकडे पृष्ठांचे आहेत.)

महिन्यांत (मासांत), अङ्गमेहनत (देह-कष्ट), व (नि) १; फैलाव (?) (प्रसार) २; चाकरी (सेवा), बबर्जी (सैंपाकी), साहेब (अिङ्ग्रज), नोकरचाकर (दास-सेवक), हजारों (सहस्रावधि) ४; निजाम-शाहींतील (निजाम-राज्यांतील), ५; हल्ल्यांतून (माऱ्यांतून) ६; शिरजोर (डोअिजड) ८; चूप बसून (गप्प बसून) १०; पेशवाअींत (पन्तप्रधानांच्या राजवटींत) ११; तोफ (भाण्डें) १२; शाहिरी (गोन्धळी, लावण्या-पोवाडयाची) १३; खर्च करांत (व्ययित करीत) १४; कैर्चींत (पकडींत, साण्डशींत) १५; सुरू (आरम्भ, चालू) ७१; कमी (हीन) लेखणें १८; खुशाल (सुखेनैव, निःशङ्कपणें) २४; जय्यत तयारी (कडेकोट सिद्धता) २५; फन्दी (छन्दी) २५; सही (स्वाक्षरी) २६; कमीपणाचें (हीनत्वाचें), २७; देखील (सुद्धा) २९; तम्बू (राहुटी) ३४; बाजूस (कडेस) सारून ३९; विलायत (परदेश, अिङ्ग्लण्ड) ४१; सावधगिरी (सावधानता) ४२; सक्त (कडक) नियम ४३; बजावणें (निक्षून साङ्गणें) ४३; बाजारीं (पेठेंत, गुजरींत) ४५; कसोशीने (साक्षेपाने, परिश्रमपूर्वक) ४७; हरकत (आडकाठी) ५१; कमींत कमी (किमान पक्षीं) ५७; आमच्या बरोबर (आमच्या सङ्गतीं वा सङ्गें) ६२; पेच सुटला (सङ्कट टळलें) ६९; जमेस धरणें (भरीस घालणें) ७३; जादा (अधिक) ८७; आराम (विश्रान्ति) ८८; (टीपेंत) जरा (अम्मळ) ९०; कसत (साङ्घिक हालचाल) ९१;

बिदाय, बिदागी (बोळवणूक, बोळवणी) १३; मानहानीचा दावा (अभियोग) १४; दाखल (प्रविष्ट) १५; देखील (सुद्धा) १६; हौस (छन्द) १८; चलाख, चलाखी, (चपल, चापल्य) १८; वाहवा (ओहो !).

सावरकरांच्याहि लेखांत अितके शब्द येतात यावरून हा प्रयत्न अशक्य आहे असें समजावयाचें नसून हा प्रयत्न निकडीने आणि निकराने केला पाहिजे असा विचार करायला हवा. सावरकर म्हणतात, "तोण्डांत, हाडामासांतून रुळलेल्या शब्दांना परकी म्हणून सोडण्याचा प्रयत्न करितांना, बोलतांना व (!) लिहितांना प्रत्येकास फार व (!) पदोपदीं त्रास होअील हें आम्ही स्वतःचे अनुभवावरून जाणून आहों. परन्तु या त्रासाने हे शब्द टाळण्याचा आपला निर्धार मात्र अधिक दुणावला पाहिजे. त्रासाचा दोष, ज्यांनी आपल्या भाषेंतील ही घाण अुघडी करून दाखविली त्यांचा नसून ज्यांनी ती काढतां काढिली जाअूं नये अितकी वाढूं दिली त्यांचा–आपणा सर्वांचा–आहे. म्हणून त्या त्रासामुळे वैतागून "जाअूं द्या ! हे शब्द बहिष्कृत करणें मूर्खपणा आहे. हा अभिमानाचा अतिरेक आहे !' असें न म्हणतां प्रत्येकाने आपल्याशी असेंच म्हटलें पाहिजे की 'काय बुवा ! खरेंच, ही केवढी लज्जेची गोष्ट ! 'हजर' शब्दास आपल्याला आपला प्रतिशब्द देखील (! सुद्धा) देतां येअूं नये अितकें या म्लेञ्छ शब्दानें आम्हांस परवश करून टाकिलें अं !"

कित्येक शब्द खरोखर परकी असतांना सावरकरांना ते स्वकीय वाटावेत हें आश्चर्य आहे. करार (ठराव), जादा (अधिक, विशेष), बातमी (अन्तःस्थ समाचार), माहीत, माहिती (विदित, ज्ञात), वगैरे (आणि अितर) हे शब्द अरबी आहेत म्हणजे ते आर्यकुलभाषोद्भव सुद्धा नाहीत. आराम, खाना, गरम, दान, बाजू, बे, स्वारी हे शब्द मूळचे आर्यकुल भाषोद्भव असले तरी ते मराठींत संस्कृत-प्राकृताच्या द्वारा नव्हेत तर फार्सीच्या द्वारा आलेले आहेत. या प्रकरणीं कल्पित व्युत्पत्तीवरें भिस्त ठेवून

१ श्री. गो. कृ. मोडक यांनी बाजीराव, साहेब नि सर्दार हे शब्द अनुक्रमें

स्वतःचें समाधान करून घेणें मुळीच समञ्जसपणाचें होणार नाही.

"नवीन प्रकारच्या विशिष्ट वस्तु, प्राणी वा पदार्थ यांचीं तत्तद्देशीय नांवें भाषेंत रूढ झाल्यास चिन्ता नाही. अशा शब्दांनी मात्र भाषेची सम्पत्ति खरोखरच वाढते" असें सावरकर म्हणतात (पृ५११). अशा शब्दांनी प्राचीन मराठी शब्द मागे पडत नाहीत हें खरें परन्तु त्यांचा स्वीकार करण्याने तेवढे नवीन मराठी शब्द निर्माण करण्याची सन्धि नष्ट होते त्याची काय वाट ! या प्रकरणीं सुद्धा नवीन शब्द निर्माण करून घेण्याची प्रवृत्ति ठेविल्यास भाषेचें सामर्थ्य तितकें वाढेल कीं नाही ! आगगाड्या, तारायन्त्रें परदेशांतूनच आलीं ना ? त्यांना सुटसुटीत मराठी शब्द आपण करून घेतलेच कीं नाही. मग राकेलाला खाणेल वा भुईतेल, Asbestos ला खाण—कापूस, तोण्डाला पाण्ढरी ज्या तन्तुमय वस्तूने लावितात तिला (powder-Puff) शिरीष, थर्मामिटरला ताप-नळी, रूळरथ्यांच्या मीलनस्थानाला सङ्गम म्हणायला काय अडचण आहे ! बोलींतील वस्तुवाचक शब्दांत त्या वस्तूचें लक्षण आलेंच पाहिजे असें नाही. त्या वस्तूचा बोध झाला म्हणजे पुरे आहे. थर्मामिटर हा शब्द मराठींत वापरतांना मिटर या शब्दावयवांत मापनाची कल्पना व्यक्त केलेली आहे हें कोणाला विदित असतें ! आगगाडी वाफेने चालते पण आगगाडी हा शब्द मराठी असून धकतोच कीं नाही ! पाणबुडी होडी 'समुद्रजलान्तःसञ्चारिणी' असते, ती पाण्यांत केवळ बुडीच घेत नाही; तथापि तो शब्द योग्य वस्तूचा बोध करतो कीं नाही ! ड्रेडनॉट म्हणण्यापेक्षा बेडर तारूं (जहाज नव्हे) म्हणणें केव्हाहि स्पृहणीह होय. अेवढ्य काय, नवीन वस्तूंचा बोध करून देण्याकरिता सुद्धा परकी शब्दांचें ऋणग्रहण अपरिहार्य नाही. मराठी शब्दसिद्धीचा सूक्ष्म अभ्यास करून मराठी उपसर्गप्रत्ययांच्या साहाय्याने आणि मध्यमपदलोपी समास साधण्याने नवीन शब्द निर्माण करणें साध्य आहे,

---

बाजि-राव, शास्तिवान् नि श्रीधर यांपासून व्युत्पादिले आहेत ! अशा व्युत्पत्तीने अॅनीबेझण्ट ही सुद्धा अनुभावी सन्त म्हणून ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण ठरावयाची !

अिष्ट आहे, अवश्य आहे. अमुक गोष्ट मराठी भाषेला व्यक्त करणें अशक्य आहे अशी लाजिरवाणी प्रतिपत्ति मी केंव्हाहि करणार नाही. जें अेका राष्ट्रास शक्य आहे तें दुसऱ्या राष्ट्रासहि शक्य आहे. जें एका भाषेंत सिद्ध आहे तें दुसऱ्या भाषेंत साध्य आहे याविषयीं शङ्काच नाही. मात्र दृढ निश्चय पाहिजे आणि मराठी भाषासिद्धीचा, प्रादेशिक बोलींचा नि प्राचीन वाङ्मयाचा मार्मिक अभ्यास पाहिजे.

विदेशी शब्दांचें मराठींत घटकशः भाषांतर करणें हें सुद्धा मनोदास्याचेंच लक्षण आहे. सुवर्णमध्यम, नक्राश्रु अित्यादि निवळ मराठी जाणणाऱ्यांना न समजणारे शब्द हे या कोटींत येतात. सुवर्णमध्यमाला [१]परिमिति वा परिमितिरेषा म्हटलें तर तें अधिक मराठी नि सुबोध होअील. नक्राश्रूपेक्षा कृतकाश्रु हा शब्द अधिक अुचित आहे.

सावरकर म्हणतात कीं "मुसल्मानी व्यवहृत शब्द कवितेस मानवत नाहीत" (ृ १०). हेंच मत कृष्णशास्त्री चिपळूणकरादिकांचेंहि होतें. परन्तु पद्याची भाषा ही गद्याच्या भाषेहून निराळी असण्याचें प्रयोजनच नाही. मुसल्मानी शब्द जर गद्याला मानवतात तर पद्याला ते मानवलेच पाहिजेत हें सिद्ध करून, पद्याच्या भाषेच्या मागचा ससेमिरा नाहीसा करण्यासाठीच मागे मी गद्यांत प्रचलित असलेल्या फार्सी शब्दांचा पद्यांतून निकराचा मारा केला. या माऱ्याचा अुपयोग निस्संशय झाला. पद्याची भाषा ही संस्कृत पाण्डित्याच्या गळेचेपींतून मुक्त झाली. आता विदेशी शब्दांचा अुपयोग हा स्वभाषेचा क्षय करणारा आहे हें अनुभवाने पटल्यावर पद्यांतून नव्हे तर गद्यांतूनहि, विशेषतः गद्यांतूनच, विदेशी शब्दांचें अुच्चाटन करण्यासाठी मी काचा कसला आहे. काव्याचे वाचक गद्याच्या वाचकांच्या मानाने फार थोडे असतात; त्यांतून काव्यांत आढळणारे वाक्प्रयोग कित्येकदा गद्यांत वापरावयाचे नसतात अशी सामान्य समजूत असते. त्यामुळे

---

१ सुवर्णमध्याला कालिदासाने 'न खरो न च भूयसा मृदुः' या श्लोकांत वापरलेला 'मध्यमक्रम' हा शब्द किती सार्थ आणि सुबोध आहे !

चुकून काही शब्द पद्यांत राहिले तर त्यामुळे फारशी हानि होणार नाही. परन्तु लेखी गद्यांतून आणि तोण्डी बोलींतून विदेशी शब्दांचा अुपयोग चुकूनहि होअूं नये याविषयी घ्यावी तितकी सावधानता थोडीच होओील.

शब्दसम्पत्तिवादी लोकांना सावरकर यांनी फारच समर्पक अुत्तर दिलें आहे. "घराची मर्यादा वाढविण्याकरिता सर्व भिन्ती पाडून टाकून तें खूप (फार) विस्तृत होत आहे म्हणून स्वतःचें अभिनन्दन करून घेणाऱ्या वेड्या धन्यासारखेंच, भरमसाट अुर्दू वा अिङ्ग्रजी शब्द घुसडणाऱ्या शब्द-सम्पत्तिवर्धकांचें समाधान फारच हास्यास्पद आहे[1]."

नवीन शब्द योजिताना हिन्दीबङ्गालींनी पुरस्कारिलेले संस्कृत शब्द घेणें हें भाषैक्याच्या दृष्टीने अिष्ट आहे. तेव्हा फिर्याद, दावा या अर्थी अभि-योग शब्द वापरणें युक्त आहे. परन्तु अधिक समर्पक असे संस्कृत शब्द आपल्यालाहि आढळण्याचा सम्भव आहे. तसे ते आढळल्यास वा निर्माण करितां आल्यास हिन्दी–बङ्गालींनी ते अुचलणें हें त्यांचें तितकेंच कर्तव्य आहे. बहुजनसमाजाच्या दृष्टीने पहातां शेजारील भाषांतील आपल्या भाषेच्या प्रकृतीशीं जुळणारे असे शब्द आधी घेणें श्रेयस्कर आहे. शिफारस अर्थी प्रशस्तिपत्र हा शब्द घेण्यापेक्षा वा त्याच्या समागमेंच, गुजरार्थीतील भलामण (मराठी रूप भलावण, वा भलाम्हण) घेण्यांत यावा, कुलुपाला ताळें म्हणावें.

तसेंच प्रादेशिक बोलींतील शब्द शिष्ट भाषेंत अवश्य घ्यावेत. त्या

---

१ आम्ही पराक्रमाने फार्सी शब्द पचविले आहेत अशी जी घोषणा प्रा. पोतदारांसारखे 'जुनाट पुरुष' करीत असतात तीहि हास्यास्पदच आहे. आम्ही विला-यती कापड झिजवून फाडून टाकितों, विलायती भिस्कुटें चाअून पचवून टाकितों अशी प्रौढी विलायती टुमीने खुळावलेले लोक मागे मारीत असत तिची या ठिकाणी आठवण होते. स्वकीय लोक उद्योगधन्द्यावाचून तडफडत असतांना परकीय गोऱ्यांना वृत्त्या देअून अथवा धाव्या लागून जेव्हा काही श्रीमन्त आम्ही त्यांना राबविते अशी वर प्रतिष्ठा मिरवितात तेव्हा 'क्षारं क्षते प्राक्षिपन्' अशी स्थिति होते.

शब्दांच्या अन्वर्थकतेकडे वा अुपयुक्ततेकडे न पाहता ते केवळ अशिक्षितांच्या तोण्डचे आहेत अेवढ्यासाठी त्याना दूर ठेवणें हें आत्मघातकीपणाचें आहे. अशिक्षिताच्या भाषेंत निर्मळ, दर्पण, पाषाण असे कित्येक शुद्ध संस्कृत, वा मावळा, मावळण (मातुल) अित्यादि प्राकृताशी अगदी जवळ असे कित्येक शब्द येतात.योग्य वेळेच्या आधी अेवढा अर्थ कुणबाअू 'येरवाळीं' शब्दाने व्यक्त होतो; तो का शिष्ट मानून घेअूं नये ! पुष्कळ आणि समागमें या अर्थी खूप आणि बरोबर हे विदेशी शब्द चालतात तर आणि लअी, सङ्गें, सङ्गती, सवे हे कुणबाअू शब्द कां घकूं नयेत !

मात्र प्रादेशिक शब्द घेताना स्थानिक अभिमानाला बळी पडून रूपभेदेंच भिन्न असणारे शद्ब घेअूं नयेत. अुदाहरणार्थ बळे, माचा, ठेचा हे तीन शद्ब रूढ असताना बये, मावचा, ठेसा हे तीन वऱ्हाडी शब्द घेण्याने लाभ तर काही होत नाहीच, अुलट घोटाळा व्हायला सवड मिळते.

हें सारें खरें, पण लोक विचारतात ही चळवळ यशस्वी होअील काय ! अेकट्यादुकट्याने काय होणार ! अेकट्याच्या हातून कार्य हें केव्हाहि अत्यल्पच होणार ! परन्तु व्यक्तीने अङ्गीकारलेलें कार्य जर निवळ स्वार्थाचें नसेल, सार्वजनिक हिताचें असेल, तर ते हळुहळू लोकाना पटेल आणि अेकाचे अनेक कार्यकर्ते होतील. काळ आला म्हणजे गोष्टी आपोआप घडून येतात असें वरवर पाहता दिसतें. परन्तु या काळाला पुढे खेचून आणायला कित्येक अज्ञात व्यक्तींचे परिश्रम कारणीभूत झालले असतात. कार्यकर्ते अेकाचे अनेक होतील ही आशा सुद्धा निष्फळ ठरायची असली तरी ज्या कार्यात सङ्कुचित स्वार्थ नाही, जें सार्वजनिक हिताचें आहे असा मनाचा निश्चय झाला आहे तें कार्य म्हणजे अेक धर्म्य कर्तव्य होय. तें कडेला सारून मनाला शान्ति मिळणार नाही !

# ५ भाषाशुद्धीचें रहस्य[१]

'खरी भाषाशुद्धि आणि तिचे खरे वैरी अर्थात् सावरकर आणि पटवर्धन' या मथळ्याचे दोन लेख 'सह्याद्रि' मासिकांत लिहून रावमहाशय श्रीकृष्ण केशव क्षीरसागर यांनी जिकडे तिकडे आनन्दीआनन्द करून टाकिला आहे! महाराष्ट्र मोहनिद्रेंतच पडावा आणि त्या अवधींत आपण आपला स्वार्थ पूर्णपणें साधून निर्घोर व्हावें अशी प्रबळ अिच्छा ज्यांच्या अन्तःकरणांत खोल दडलेली आहे अशा लोकांचे डोळे, क्षीरसागरांसारखा घरचाच मनुष्य, हाकाटी करून जागृति आणूं अिच्छिणाऱ्यांना गप्प करण्याचा प्रयत्न करीत आहे हें दृश्य पाहून आनन्दाश्रूंनी भरून आले असतील. काही परकी शब्द वापरण्याची सवय हाडींमासीं खिळल्यामुळेच आता ती सोडण्याचें ज्याच्या जिवावर येत असेल अशा धुरन्धर लेखकांच्या पथ्यावरच क्षीरसागर यांची विचारसरणी पडत असल्याने तेहि त्यांना सानन्द आशीर्वाद देत असतील. ज्यांना तत्त्वबोधाच्या महत्त्वापेक्षा अमुक व्यक्तींनी पुढे यावें याचेंच वैषम्य अधिक वाटतें त्यांनाहि सावरकर-पटवर्धनांची झालेली ही सम्भावना पाहून हर्षवायु झाला असेल. भाषाशुद्धीच्या प्रचारकांनाहि हा प्रश्न अुपेक्षेचा नाही अेवढें क्षीरसागर मान्य करतात हें पाहून आनन्दच वाटावयाला हवा. त्यांनी या राष्ट्रीय महत्त्वाच्या चळवळीची नुसती हेटाळणी न करतां काही तरी तत्त्वनिष्ठ विरोध करून तिच्या पुरस्कारास अप्रत्यक्षपणें साह्यच केलें आहे. क्षीरसागरांनी हे जे दोन लेख सात्त्विकच नव्हे तर तात्त्विक सन्तापाने लिहिले आहेत ते काही केवळ

---

१ हा लेख श्री. क्षीरसागर यांच्या सह्याद्रींतील लेखाला अुत्तर म्हणून सह्याद्रीच्या अेप्रील १९३६ च्या अङ्कांत प्रकाशित झाला आहे.

टाळया मिळविण्याकरिता नव्हत. टाळ्यांनी त्यांचें समाधान होणार नाही. त्यांना भाषाशुद्धिवाद्यांची चळवळ हाणून पाडायची आहे. त्यांना अेकट्यांनाच या सार्वजनिक आनन्दाचे वांटेकरी होतां येणार नाही असें दिसतें. कारण, अुपहास, वक्रोक्ति, हेत्वाभास अित्यादि विविध अस्त्रांचा भडिमार करूनहि भाषाशुद्धिवादी लोकांचा युक्तिवाद अद्यापि ढासळून भुअीसपाट झाला नाही; तो अभेद्य अुभाच आहे.

लेखनाच्या भरांत दोन तीन ठिकाणीं क्षीरसागर यांच्या हातून माझ्यावर जे निराधार दोषारोप केले गेले आहेत, त्यांचा मुख्य प्रश्नाशीं सम्बन्ध नसल्याने सार्वजनिक मासिकाचीं पानें मी वैयक्तिक समर्थनासाठी अडवूं अिच्छीत नाही.

विद्रूपशब्दनिर्मितीचा भीषण रोग लेखकांना जडूं पहात आहे या भीतीने आणि असा रोग जडला असल्यास त्याचें निर्मूलन झालें पाहिजे या सदिच्छेने क्षीरसागर यांनी ही यातायात केली आहे. या प्रकरणीं त्यांचा नि माझा मतभेद नाही. जे लोक टूम वा लहर म्हणून शब्दनिर्मिति करतात आणि भाषेंत वा बोलींत विद्यमान असलेल्या शब्दांकडे नेणून वा जाणून-बुजून दुर्लक्ष करतात ते भाषेचें कोणतेंहि हित साधीत नाहीत. त्यांतून त्यांनी निर्माण केलेले शब्द जर अुच्चारकठिण आणि दुर्बोध असतील तर हे शब्दनिर्माते भाषेचा खेळखण्डोबाच करीत आहेत असें म्हटलें पाहिजे. भाषेंतील प्रत्ययोपसर्गांचा उपयोग करून नवनवे शब्द साधीत राहिल्याने भाषेची सर्गशक्ति तितकी जिवन्त राहते हें खरें; पण या लहरी जर ज्याला त्याला येअूं लागल्या तर प्राचीन शब्दसम्पत्तीचा नाश होअून पुन्हा वर भाषेचें अेकजातित्व आणि सातत्य हीं नष्ट होतील हेंहि काही खोटें नाही.

परन्तु या विद्रूप शब्दनिर्मितीच्या रोगाचें जें निदान क्षीरसागर यांनी केलें आहे तें चुकीचें आहे. शब्दनिर्मितीचा हा रोग कित्येकांना भाषाशुद्धीचें नांव निघण्याच्या आधीपासूनच जडलेला आहे; आणि असे शब्द डोळ्यांत भरावेत म्हणून ते जाड ठशांनी छापून, त्यांचा अर्थ ध्यानांत यावा म्हणून

पुढे कंसांत अिङ्ग्रजी शब्द देण्याची त्यांची वहिवाटहि वाचकांच्या परिचयाची आहे. हा रोग भाषाशुद्धीच्या सात्त्विक भावनेने होणें शक्य नाही. स्वावलम्बी होअून स्वत्वरक्षण करावें ही अिच्छा सुद्धा रोगाची भावना व्यक्त करीत नाही. शब्दनिर्मितीची प्रवृत्ति जेथे रोगट झालेली दिसते तेथे ती वैयक्तिक अहङ्काराने रोगट होते. 'विनीवाले' कशाला, 'आघाडीचे झुन्जार' असा सुन्दर शब्दप्रयोग मराठींत असतांना 'चमूपुरोभागयुयुत्सु' हा शब्द वापरा असा दुराग्रह खरा भाषाशुद्धिवादी कधीहि धरणार नाही.

कोणताहि शब्द सिद्ध करण्यापूर्वी (१) त्या अर्थाचा शब्द मराठींत पूर्वीचा आहे कीं काय, (२) नवीन सिद्ध करून योजावयाचा शब्द किती लोकांना समजेल, आणि (३) प्रचलित भाषासरणींत तो कितपत शोभतो, हे तीन प्रश्न लेखकाने स्वतःस विचारावेत असें क्षीरसागर म्हणतात. अुपदेश बहुमोल आहे. हे तीन प्रश्न लेखकांनी स्वतःला विचारूं नयेत अथवा त्यांचीं समाधानकारक अुत्तरें मिळण्याची वाट न पाहतां पुढे पाअुल टाकावें म्हणजे प्रगति होअील असें माझेंहि म्हणणें नाही. परन्तु या तीन प्रश्नांचा विचार करतांना तो तारतम्यानेच करावा लागेल.

पाहिजे असलेल्या अर्थाचा शब्द मराठींत आहे, पण तो परभाषेंतून आलेला आहे; तो रूढ झालेला आहे, परन्तु शिष्ट समाजाच्या विशिष्ट मनोवृत्तीमुळे पूर्वीच्या कोणत्या तरी शब्दाला नष्ट करून रूढ झालेला आहे; अशा स्थितींत त्या शब्दाचें अपरिहार्यत्व मान्य करा, त्याला प्रामुख्य द्या आणि नवीन निर्मूं नका असा आत्मघातकीपणाचा अुपदेश मी मराठीच्या सध्याच्या अस्वाभाविक स्थितींत तरी मुळीच करणार नाही. थोडा खोल विचार केल्यास परकीय भाषेंतून आलेल्या बहुतेक शब्दांनी स्वकीय मराठी शब्दांना खो देअूनच पङ्क्तींत स्थान पटकाविलेलें दिसतें. रानोमाळ विखरून कसेंबसें आयुष्य कण्ठणाऱ्या मराठी शब्दांचा पुरस्कार नि अुद्धार करण्याचा निश्चय झाला की नवीन शब्दांची निर्मिति आपोआपच तितकी अुणावते. अुदाहरणार्थ क्षीरसागर यांचेंच पुढील वाक्य पहा.— "ते रूढ

स्वकीय शब्दांची अवहेलना करून आपल्या सुल्तानी टांकसाळींतून नवीन विकृत शब्द सोडतात'' (पृ. १६७) या वाक्यांत लेखकाला कोठेच काही दोष दिसत नसेल; पण मला 'सुल्तानी' या शब्दाचा अुपयोग चुकीचा वाटतो. सुल्तानी हा शब्द अपरिहार्य नाही आणि तो योग्यहि नाही. टांकसाळ ही सुल्तानीच असावयाची आणि टांकसाळी रुपयांत दहा आणे मूल्याचीच चान्दी असली तरी राजसत्तेच्या प्रभावाने पेठेंत रुपयाहून अुणें मूल्य कोणीहि करूं शकत नाही. सुल्तानी नाणें विद्रूप असलें तरीहि चलनी होतें. तेव्हा येथे सुल्तानीच्या ठिकाणीं 'सम्राटी' असा नवीन शब्द निर्माण करून योजा असा अुपदेश खरा भाषाशुद्धिवादी करणार नाही. तो 'गोमागणेशी' हा शब्द सुचवील. पूर्वी अेका काळीं 'गोमा गणेश पितळी दरवाजा' असा छाप मारून अेक अुपटसुम्भ पैसे अुकळीत असे; आणि सुल्तानी राजवटींत काहीहि सहन करून घ्यायला शिकलेले लोक ती मुद्रा मारून घ्यायला पैका वेचीत. काही काळपर्यन्त तरी त्याचा हा धन्दा चालला. तेव्हा क्षीरसागर यांच्या वाक्यांत 'गोमागणेशी छापाचे नवीन विकृत शब्द चालवितात' अशी सुधारणा केली तर त्यांचें वाक्य अधिक अर्थपूर्ण नि अधिक जातिवन्त होअील कीं नाही हें त्यांनीच साङ्गावें.

अेखादा नवा शब्द किती लोकांना समजेल हें ठरवितांना अेकन्दर शिरगणती करावयाची नाही. ज्या लोकांच्यासाठी अेखादा लेख लिहावयाचा आहे त्या लोकांच्यापैकीं किती लोकांना तो नवा योजावयाचा शब्द समजेल हें पाहिलें पाहिजे. क्षीरसागर यांच्या 'श्रुतिविहीन' या शब्दाप्रमाणेच श्रवणतुला, श्रुतिसिद्ध, सूक्ष्मवेदी हे शब्द गुजरींतून जाणाऱ्या येणाऱ्या प्रत्येक मनुष्याला समजतील वा समजलेच पाहिजेत असें नव्हे. भाषाविषयक वा पद्यविषयक विवेचन वाचणाऱ्याला ते तत्काळ समजतील. पुनः सर्वच शब्द वाचकाला ठाअूक असले पाहिजेत असा आग्रह कोणीं धरल्यास वाङ्मयावर ती मोठी आपत्तिच कोसळेल. अिङ्ग्रजींत वेल्स या सुप्रसिद्ध लेखकाची 'लव्ह अॅण्ड मिस्टर ल्यूशॅम्' या नांवाची अेक काद-

म्बरी आहे. सुशिक्षित पदवीधरांनाहि ज्यांचा अर्थ कोशाच्या साहाय्यावांचून कळणार नाही असे किती तरी शब्द त्या कादम्बरींतून काढून दाखवितां येतील. म्हणून ती कादम्बरी काही कोणी त्याज्य म्हटली नाही कीं तिचा खप घटला नाही. गद्यात नवीन शब्द तारतम्याने आणि योग्य ठिकाणीं वापरल्यास वाचकांस सारखें चमत्कारिक वाटणार नाही आणि त्यांना फारसें अडखळायलाहि होणार नाही. सन्दर्भावरून अर्थाविषयी अटकळ बान्धण्याची शक्ति प्रत्येक वाचकाला थोडी फार आलेली असतेच असते.

अेखादा नवीन योजावयाचा शब्द प्रचलित भाषेंत किती शोभतो याचें अुत्तर तितकें निश्चित देतां येणार नाही. अर्थ आणि नाद यांच्या महत्त्व-मापनाचें प्रमाण सर्वसामान्य असें ठरलेलें नाही. वैयक्तिक लहरीचा प्रभाव यांत थोडाफार जाणवणारच. पद्यांत तर यमकगणमात्रांचीं बन्धनें पाळाव-याचीं असल्यामुळे गद्यांत जो शब्द मुळीच योजण्यांत आला नसता तोहि आपद्धर्म म्हणून पद्यांत योजावा लागतो. ज्या 'चमूपुरोभागयुयुत्सु'ची टवाळी क्षीरसागर करितात तोच शब्द अेखाद्या दीर्घ प्रतिष्ठित काव्यांत अुपेन्द्रवज्रा वृत्तांत आढळल्यास त्यांनाच हास्यास्पद वाटणार नाही. पद्यांत रीतिभङ्ग हा अर्थहानीपेक्षा आणि छन्दोभङ्गापेक्षा अधिक क्षम्य मानतात. तथापि पद्यांत ज्या व्यक्तीच्या तोण्डांतून वसन, सहस्रनयन, मण्डूक अित्यादि संस्कृत शब्द निघतांना काही चमत्कारिक वाटत नाही त्याच व्यक्तीच्या तोण्डांतून यमकासाठी का होअीना पण 'हन्त' हा शब्द निघतांच 'हाय हाय औचित्यभङ्ग!' अशी हाकाटी करीत धावणारे अरज्ञनीय विद्वान् टीकाकार भेटतातच. रीतीचा प्रश्न वाटतो तितका सोपा नाही. औचित्य-भङ्गाचें पाप भाषाशुद्धिवाद्यांच्याच हातून घडतें असेंहि नाही. तें पाप घडायला विद्रूप शब्दनिर्मितीचा भीषण रोग जडावा लागत नाही. "केळकर, माडखोलकर, अत्रे यांसारखे प्रसन्न गद्य लिहिणारे मार्मिक लेखक जी भाषा लिहितात ती जातिवन्त म्हणण्यास काहीहि प्रत्यवाय नाही" असें क्षीरसागर म्हणतात. अत्रे यांचें लिखाण प्रभावी आणि प्रसन्न

असतें याविषयी शङ्काच नाही. परन्तु त्यांचीहि रचना कलात्मक दृष्टीने शब्दन् शब्द पारखून तोलून योजणाऱ्या लेखकाच्या कृतीसारखी जातिवन्त नि आदर्शभूत आहे असें म्हणणें धाडसाचें होईल. "कोणालाहि हुक्की आली की त्याने अुठावें, व स्वतन्त्र शब्दाची निराळी टांकसाळ अुघडून बाजारांत आपलीं शिराळशेटी नाणीं नेअून ओतावींत म्हणजे भाषेची निवळ चेष्टा आहे" असें बजावणारे अत्रे जेव्हां 'फुलांची ओन्जळ' या गम्भीर काव्यग्रन्थाच्या प्रस्तावनेंत "ते नांवानें जरी B असले तरी त्यांचें कर्तृत्व A1 दर्जाचें आहे ही गोष्ट अेखादा बालकवीहि कबूल करील" वा "Bee हे नुसते Poet नसून ते Poet and Philosopher आहेत हें लक्षांत ठेवायला पाहिजे" अशीं वाक्यें लिहितात तेव्हा ते विलक्षण मराठी लिहून मराठीची चेष्टाच नव्हे तर काय प्रतिष्ठा करतात ! वानगी म्हणून त्यांच्या अगदी अलीकडील व्याख्यानांतील पुढील वाक्य पहा. 'आशियाच्या अुत्तरेला वाहणाऱ्या नद्या अतिशय थण्डीमुळे ज्याप्रमाणे वाहतां वाहतांच समुद्राला मिळण्यापूर्वी थिजून जातात त्याप्रमाणे पुष्कळशा ललितवाङ्मय-लेखकांच्या कृती क्लिष्ट व कृत्रिम लेखनपद्धतीमुळे बहुजनसमाजापर्यन्त पोहोचण्याच्या आधीच वाटेंत खतम् होतात.' या विधानांतील तर्कशुद्धतेचा प्रश्न कडेला ठेवूं, पण अनुस्वारांच्या ठिकाणीं परसवर्ण पेरलेले पाहून ज्याला मायभाषेंतील लिखाण भयङ्कर वाटतें त्याने 'खतम्'मधील मकाराचा पाय साक्षेपाने मोडावा हें आश्चर्य नव्हे काय ! शुद्ध मराठमोळ्याच्या या वाक्याच्या शेवटीं ही 'खतम्'ची धोण्ड औचित्यभङ्ग करीत नाही काय ! शङ्कराचार्यांच्या डोक्यावर कोणी लालभडक तुर्की टोपी ठेविली तर जसा अुद्वेग वाटेल तसा येथे वाटायला नको का ! हा शब्द लेखकाने निर्माण केला नसून तो दुसरीकडून अुचलून आणलेला आहे अेवढ्याचसाठी औचित्यभङ्गाची ओरड न करितां अत्रे यांस अेखादें ठकसेनपारितोषिक दिलें पाहिजे असें तर क्षीरसागर यांस वाटत नाही ना ! हा शब्द शिराळशेटी नाही तर हायदोसखानी आहे अेवढ्याचसाठी त्याचा आदर-सत्कार करायचा

असला तर तेंहि काही आमच्या आजपर्यन्तच्या अितिहासाला आणि मनोधर्माला सोडून होणार नाही. 'खतम्'ला भाळल्यावर गळाठणें, गारठणें, या घरच्यांची आठवण होतेच आहे कशाला ! ते समाप्त झालेच म्हणून समजावें! क्षीरसागर म्हणतात की शब्दाच्या ध्वनीकडे लक्ष दिलें पाहिजे. दोन आण्यांच्या तिकिटाने चित्रपटांतील दयितदयितांचे अतिप्रसङ्ग पाहून खुर्चीवरच्या खुर्चीवर अुड्या मारीत 'हायरे तेरे नखरेमे गरम मसाला !', ओरडणाऱ्या रसिकांच्या जिव्हाग्रींच्या या शब्दांत कोणता ध्वनि आहे तो वाचकच वाजवून पाहोत !

अशीं काही अुदाहरणें दाखवून अत्रे यांच्या अेकन्दर लिखाणाची योग्यता हीन ठरवितां येत नाही हें मला कळतें. तसा प्रयत्न करण्याची मला अिच्छाच नाही. शब्दांची परीक्षा करतांना अेकच कसोटी लाविली पाहिजे. ज्या अत्र्यांना[१] गुजरी आणि सङ्गे हे शब्द विद्रूप आणि विडम्बनीय वाटतात त्यांनाच खतम् हा शब्द सुस्वरूप आणि चुम्बनीय वाटतो ही गोष्ट मनाचा समतोलपणा दाखवीत नाही.

भाषाशुद्धिवादी लोक जे नवीन शब्द निर्माण करीत असतील ते टाकाअू असतील, परन्तु तेवढ्याने त्यांचा युक्तिवाद टाकाअू ठरत नाही. त्यांचे आद्य कर्तव्य, अमुक शब्दांपेक्षा तमुक शब्दांना अधिक जवळ करा, अमुक शब्दांच्यावर बहिष्कार टाका अेवढेंच पटवून देण्याचें आहे. त्यांची विचारसरणी भ्रामक असल्यास बिनतोड युक्तिवादाने ती खोडून काढा; परन्तु बहिष्कार्य गोष्टी काढून टाकिल्या असतां होणारी अडचण दूर करण्याचा बोजा त्यांच्याच अङ्गावर टाकणें हें काही त्यांच्या चळवळीस समञ्जसपणाचें अुत्तर नव्हे. विदेशी कापड वापरूं नये हें सप्रमाण सिद्ध करणाऱ्याला सूतहि काढतां येत नसेल; तो परदेशी गिरण्यांपुढे आपली टकळी काय चालविणार ! तो जी अुणीव अुत्पन्न करीत असतो ती समाधानकारक

१ अलीकडे तात्याराव सावरकरांच्या भेटीनन्तर अत्रे यांची मनोभूमिका पालटली आहे. तिचेंहि 'मराठीकरण' झालें आहे !

कापड काढून दूर करणें आणि पेठ पटकावून टाकणें हें कापडाची निर्मिति करणाऱ्याचें काम आहे. भाषेचा सम्बन्ध प्रत्येकाशी थोडातरी येत असल्याने भाषाशुद्धिवादी लेखकाला आपल्या स्वतःच्या अडचणी भागविण्यापुरती, तत्त्वाप्रमाणे कृति करण्यापुरती तरी, नवीन शब्दांची निर्मिति करावीच लागते. लालित्याकडे लक्ष देण्यांत त्याने ती निर्मितिच न केली तर गम्मत-बघे टीकाकार, लोकांना ब्रह्मज्ञान साङ्गणारा कोरडा पाषाण पहा म्हणून त्याची सम्भावना करतात आणि त्याने ती शब्दनिर्मिति केली तर क्षीर-सागरांच्यासारखे लालित्यलोलुप रसिक त्याच्यावर हत्यार धरितात ! भाषा-शुद्धिवाद्यांच्या टांकसाळींतील नाणीं बेडौल आणि दुर्बोध असतील. रा. न. चिं. केळकर आणि प्रा. ना. सी. फडके यांच्यासारख्या प्रसन्न मराठी लिहि-णाऱ्यांनी तर टांकसाळी काढायला कोठे प्रतिबन्ध नाही ना ! ते आपलें कर्तव्य विसरतात म्हणून भाषाशुद्धिवाद्यांच्यावर आग पाखडणें हें फिरोजशहा मेहता यांच्या वेषाच्या मानाने विष्णु गोविन्द विजापूरकर यांचा वेष 'बेडौल विद्रूप आणि दुर्बोध' होता म्हणून त्यांची टवाळी करण्याइतकेंच समञ्जस-पणाचें होईल. लालित्य आणि सौन्दर्य हीं कोणाला नको आहेत ! त्याला भाळून कोण जात नाही ! त्यांच्या पायीं अनर्थ करायलाहि मनुष्यें प्रवृत्त होत नाहीत काय ! विजापूरकरांच्याच वेषाचें रहस्य कळायला दुर्मिळ अशी सुन्दर मनोवृत्ति लागते.

भाषाशुद्धिवादी हा जेव्हा निर्मिलेल्या शब्दांच्याविषयीं हटवादी ममता दाखवूं लागतो तेव्हा तो टीकेला पात्र होतो. पण तो हटवादी कां होतो ! सार्वत्रिक औदासीन्य, पुढे येऊन ठेवलेल्या सङ्कटाविषयीं सोमनाथाच्या पुजाऱ्यांसारखा निष्काळजीपणा, काही कोठे थोडी चर्चा झालीच तर ती विळोप्याच्या टवाळीची, क्वचित् कोणी ठासून मत देतांना दिसला तर त्याने त्या प्रश्नाचा खोल विचारच केलेला नसावयाचा, अशा स्थितींत जो मनुष्य आपल्या ध्येयाचा ध्यास घेत कर्तव्य करीत राहतो तो हेकट म्हणा, तर्कटी म्हणा, एककल्ली म्हणा, आततायी म्हणा, तसा न झाला तरच आश्चर्य !

बहुजनसमाजाच्या हितासाठीच तो खपतो. पण चारचौघांत जें खपतें तेंच प्रतिष्ठित असें मानण्याचें त्याला कधीच सोडून द्यावें लागलेलें असतें ! मी या प्रकरणीं अेक आरोपी असलों तरी मला या वृत्तीची कारणमीमांसा सांगायची आहे; स्वतःचें समर्थन करावयाचें नाही. मी अेका विदेशी शब्दाचें अुच्चाटन केलें आहे अेवढ्यासाठी मला माझे स्वनिर्मित शब्द लोकांच्या डोक्यावर नाचविण्याचा अधिकार प्राप्त होतो असें मला तरी कधीहि वाटत नाही.

शुद्धिवादी मनुष्याने सुशिक्षितआशिक्षितांच्या बोलीचें सूक्ष्मपणाने निरीक्षण केलें पाहिजे आणि: अर्थपूर्ण नि सुटसुटीत शब्द दिसल्यासरशी त्यांचा स्वीकार केला पाहिजे. स्वतः निर्मिलेल्या शब्दांविषयी ममत्व न ठेवितां स्वतःचे काही शब्द भाषेंत रूढ करण्यांत अितिकर्तव्यता न मानतां, इतरांनी निर्माण केलेल्या शब्दांत जे अर्थपूर्ण, नादपूर्ण नि सुटसुटीत असे असतील त्यांचा पुरस्कार स्वतः कृतीने केला पाहिजे.

आज नाही उद्या आपण केलेले शब्द रूढ होतील या श्रद्धेने सावरकरांच्यासारखे चळवळ्ये मग दीर्घोद्योग कां करीत राहतात ? 'सामर्थ्य आहे चळवळीचें' हें त्यांना पटलेलें असतें म्हणून. त्याना ठाअूक असतें की बहुजनसमाज हा सामान्यतः स्थितिनिष्ठ म्हणजे अुदासीन नि आळशी असतो. अेका दिशेने समाजांत जी अनिष्ट क्रान्ति झालेली दिसते ती सुद्धा समाजाने नव्हे तर काही बलिष्ठ चळवळ्यांनीच केलेली असते. त्यांच्या चळवळीला कित्येकदा राजसत्तेचेंहि पाठबळ मिळालें असेल. कोणतीहि क्रान्ति करून टाकिली की बहुजनसमाज तिला सरावतो आणि पूर्वस्थितीप्रत जाण्याचा प्रयत्न बहुशः करीत नाही. अेखाद्याला धडधडीत अन्याय झाला आहे याची जाणीव असूनहि त्या अन्यायाला जर काही वर्षें लोटलीं तर त्या अन्यायाचें निराकरण करण्याचें सामर्थ्य अङ्गीं असूनहि लोकांना ती अिच्छा तितक्या तीव्रतेने होत नाही असा अनुभव आहे. तेव्हा बहुजनसमाजाला कोणी पूर्वस्थितीप्रत नेण्याचा प्रयत्न केला तर त्याला हा स्थिति-

निष्ठतेचा पायबन्ध आपोआप बसतो. त्याच्यावर द्वेषमूलकतेचा, समाजांत अशान्तता माजविण्याचा आरोप करणारे अुलट्या बुद्धीचे वा हृदयाचे टीकाकारहि निघतात. या विचारानेच त्या क्रान्तिकारकांनी ती अनिष्ट क्रान्ति करून टाकिलेली असते, आणि निर्ढावलेले क्रान्तिकारक होतां होअीतों गाजावाजा न करितां तशी क्रान्ति करून टाकण्याच्या अविरत प्रयत्नांत अद्यापिहि आहेत. परन्तु हें जो दूर 'भाग्यनगरा'पर्यन्त दृष्टि फेकील त्याला दिसेल. डोळे असून पाहूं अिच्छीत नाही त्याला कोण काय दाखविणार! महाराष्ट्रांत मराठी भाषेंत सतराव्या शतकापर्यन्त काही क्रान्ति होअून गेली. तिच्या अुलट क्रान्ति करायला हातीं सत्ता आली असतांना अुत्कृष्ट सन्धि लाभली होती. पण तेव्हा बुद्धि सुचली नाही. अिङ्ग्रजी राजवटींत अुलट दिशेने थोडी क्रान्ति झाली. ती अप्रत्यक्षपणें आणि अहेतुकपणेंच झाली, आणि म्हणूनच ती योग्य प्रमाणांत झाली नाही. अेकीकडे अिङ्ग्रजी भाषेला पहिल्या प्रतीचें महत्त्व मिळालें आणि दुसरीकडे संस्कृताच्या अभ्यासाला अुत्तेजन मिळालें. या दोन कारणांनी अुलट दिशेने योग्य ती क्रान्ति काही प्रमाणांत घडून आली. ही घडून येत असतांना ज्या लेखकांनी आधुनिक वाङ्मय निर्माण करून महाराष्ट्राला नवीन सामर्थ्याची जोड करून दिली त्यांनी जर मराठी भाषेच्या स्थित्यन्तरांचा खोल विचार करून, स्वावलम्बन आणि स्वाभिमान यांच्या दृष्टीने मराठी भाषेचें स्वरूप कसें असावें याविषयी काही मत ठरविलें असतें म्हणजे सहेतुकपणें क्रान्ति केली असती तर आज भाषाशुद्धीचा प्रश्न निघालाच नसता. आजहि वाङ्मयाच्या द्वारा लोकांच्या अन्तःकरणाचा ठाव घेणाऱ्या लेखकांच्या हातीं ही अप्रत्यक्ष सत्ता आहे. त्यांनाहि ही दृष्टि नाही. लोकप्रियता नि पैका यांच्या पलीकडे त्यांना काही दिसत नाही वा पाहण्याची आवश्यकता वाटत नाही. अशा वेळीं सावरकरांनी आपलें अेकाण्डें बण्ड चालू न ठेवावें तर काय, 'मला काय त्याचें!' म्हणून खाली मान घालून राम राम म्हणत बसावें!

क्षीरसागर म्हणतात की ही भाषाशुद्धीची चळवळ आम्हांला वाटत

आहे स्वभाषेची, पण वस्तुतः आहे परकीय भाषेसम्बन्धी तिरस्कार दाखविण्याची ! असा आक्षेप स्वदेशांत स्वकीयांनी काढावा, नि त्याला अुत्तर द्यावें लागावें ही अेकच गोष्ट अद्यापिहि आम्ही कसे अस्वाभाविक विकृत स्थितींत आहों हें सिद्ध करण्यास पुरेशी आहे. असाच आक्षेप परदेशी मालाच्या बहिस्काराविरुद्ध घेण्यांत येत असे. परन्तु बहिष्काराचें खरें स्वरूप दाखविणारी अेक कसोटी आहे. जे अिङ्ग्रजी वस्तु न घेतां आपली लालित्याची लालसा जर्मन वा जपानी वस्तु घेअून पुरवितात त्यांनी घातलेला अिङ्ग्रजीवरील बहिष्कार हा तात्पुरता देशाच्या अम्मळ अुपयोगी पडला तरी तो मूलतः सदोषच असतो. जे लोक आपला स्वतःचा देश स्वावलम्बी नि सुसम्पन्न व्हावा आणि अुद्योगधन्दे मिळून आपल्या देशबान्धवांचें पोट भरावें म्हणून वैयक्तिक अडचणी सोसून स्वदेशी वस्तूंचा पुरस्कार करतात, आणि तो पुरस्कार व्हावा म्हणून अिङ्ग्रजीच नव्हे तर कोठीलहि परदेशी माल घेत नाहीत त्यांनी घातलेला बहिष्कार हाच खरा सात्त्विक आणि निर्दोष बहिष्कार होय. हा द्वेषमूलक नसतो; प्रेममूलक असतो. आमची भाषाशुद्धीची चळवळ अशीच प्रेममूलक आहे.

आम्हांला परकीय भाषांचा तिरस्कार मुळीच वाटत नाही. मी स्वतः अनेक परकी भाषा शिकलों आहें, शिकवीतहि आहें. त्या भाषेंतील अुत्कृष्ट वाङ्मय ज्यांनी निर्माण केलें त्यांच्याविषयी मला पूज्यभाव वाटतो. तसें थोडें वाङ्मय झळझळीत भाषान्तराच्या द्वारा मराठींत आणण्याचा प्रयत्नहि मीं केला आहे आणि असें भाषान्तराचें कार्य करण्यांत मला काहीच हीनत्व वाटत नाही. तेव्हा परभाषांचा तिरस्कार कोठे राहिला ! तो दाखवायाचाहि कोणाला ! ज्यांना दाखवायचा असें क्षीरसागरांना वाटत असेल ते आपआपल्या मार्गांनी मराठ्यांची वा अितरांची यत्किञ्चितहि काळजी न करितां, आपली आणि आपल्या भाषेची अुन्नति करून घेत आहेत. त्या अुन्नतीला भाषाशुद्धिवाद्यांचा विरोध अगदी नाही. आम्हांला आमची आणि आमच्या भाषेची प्रगति आमच्या मार्गाने करण्याचें स्वातन्त्र्य पाहिजे आहे.

आम्ही भाषाशुद्धिवादी लोक अिङ्ग्रजी भाषेचें अुदाहरण नेमकें विचारांत घेत नाही याचें कारण तें आमचा युक्तिवाद ढासळून पाडील हें असावें असें क्षीरसागर यांना वाटतें. दृष्टान्तासाठी घ्यावयाच्या गोष्टींत साधर्म्य पाहिजे ही साधी गोष्ट ते विसरतात. परन्तु अिङ्ग्रजी भाषेचाहि विचार मी येथे करून टाकतों. अिङ्ग्रजी भाषेंत ग्रीक, लॅटिन, फ्रेञ्च नि अॅङ्ग्लोसॅक्सन अशा चार भाषांतील शब्द आहेत. परन्तु या शब्दांशीं अिङ्ग्रजी लोकांचें नातें कसें आहे हें पाहणें महत्त्वाचें आहे. ज्या लोकांची मातृभाषा लॅटिन होती त्या रोमन लोकांची सत्ता अिङ्ग्लण्डांत अत्यन्त अल्पकाल टिकली. ख्रिस्ती धर्माच्या प्रसारानन्तर अिङ्ग्रजांच्या स्वधर्माचीच भाषा म्हणून त्यांचा तिच्याविषयी अेक प्रकारचा आपलेपणा राहिला. काही ग्रीक शब्द आले ते लॅटिन भाषेच्या द्वारा म्हणजे लॅटिन होअून आले. शास्त्रीय परिभाषा सिद्ध करण्यास लॅटिन आणि ग्रीक या भाषा युरोपांतील सर्वच शास्त्रज्ञांस सोअीच्या असल्यामुळे शास्त्रज्ञांनी त्या भाषांतून हवे असलेल्या अर्थाचे नवे शब्द निर्माण करून घेतले. या पारिभाषिक संज्ञांचा बहुजनसमाजाच्या भाषेशीं फारसा सम्बन्ध येत नाही; तथापि ही परिभाषा निर्माण करण्यात अिङ्ग्रजी लोकांचा हात नव्हता अशी स्थिति नसल्याने अिङ्ग्रजांना या ग्रीक आणि लॅटिन पारिभाषिक संज्ञांविषयी परकेपणा वाटण्याचें प्रयोजनच नाही.

आता फ्रेञ्च आणि अङ्ग्लोसॅक्सन या भाषांतील शब्दांचा विचार करूं. हे बहुजनसमाजाच्या बोलींतहि सम्मिश्र आणि अेकजीव झालेले आहेत. क्षीरसागर मोठ्या आवेशाने विचारतात, ''पार्लमेण्ट हा शब्द शुद्ध अिङ्ग्रजी नाही म्हणून त्यास कोशात स्थान नाही असें पटवर्धन दाखवूं शकतात काय ! ते तसें करूं शकतील तरच अिङ्ग्रजी भाषाशुद्धिवाल्यांच्या सिद्धान्तास पोषक आहे असें ठरेल.'' परन्तु पार्लमेण्ट हा शब्द अॅग्लोसॅक्सन नसला तरी शुद्ध अिङ्ग्रजीच आहे. तेव्हा त्याला अिङ्ग्रजी कोशांत स्थान कां नसावें ! अिङ्ग्लण्डांत असे जनसमूह आहेत काय की जे शुद्ध अङ्ग्लोसॅक्सन वा नॉर्मन

रक्ताचे असून अलग अलग राहतात आणि त्यांच्यांत शरीरसम्बन्ध झालेले नाहीत नि होतहि नाहीत ! अिङ्ग्लण्डमध्ये राजसत्ता ही अमुक अेका वर्गाच्या हातीं आहे काय की त्या वर्गाच्या भाषेविषयी अितरांना वैषम्य नि परकेपणा हीं वाटावींत ! नॉर्मन जेते नि अङ्ग्लोसॅक्सन जित अशी स्थिति प्राचीन काळीं असली तरी धर्मैक्यामुळे जेते नि जित यांच्या रक्तांचें हळुहळू मिश्रण होत गेलें. प्रत्येकाच्या रक्तांत निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्यांचा अंश आल्याने अिङ्ग्रजी भाषेंत त्या त्या भाषांतून शब्द आले, त्यांत मानहानि वाटण्याचें काही कारणच नाही. तरी सुद्धा चॉसरविषयी लिहितांना मिल्टन त्याला 'न विटाळलेल्या शुद्ध अिङ्ग्रजीचा झरा' असें म्हणतोच ! कारण, त्या काळीं नॉर्मन आणि सॅक्सन यांचें सम्मिश्रण पूर्ण झालें नव्हतें. विद्वानांनी आणलेल्या लॅटिन शब्दांना मागे सारून, मागे पडलेल्या ॲङ्ग्लोसॅक्सन शब्दांचा टेनिसनपर्यन्त ज्या लेखकांनी पुरस्कार केला त्यांचा लेखकांनी नि लोकांनी गौरवून सत्कारच केला. राजकर्ते नॉर्मन आणि अेतद्देशीय ॲङ्ग्लो सॅक्सन हे लोक अेकजीव झाल्यावर जी अिङ्ग्रजलोकांची अशी अिङ्ग्रजी भाषा निर्माण झाली तिच्यावर परचक्र कधीच आलें नाही. अिङ्ग्रज जेथे जेथे आपली भाषा घेअून गेले तेथे ते जेते म्हणून वा यशस्वी व्यापारी म्हणून गेले. दळणवळणामुळे जे काही परकी शब्द अिङ्ग्रजींत आले ते त्याना व्यापारांतल्या लाभासारखे वा खण्डणीसारखे भूषणावह झाले; आणि अिङ्ग्लण्ड देशांत अिङ्ग्रजांचेंच गेलीं ४०० वर्षे सतत आणि सम्पूर्ण स्वराज्य राहिल्यामुळे भाषेची वाढ स्वाभाविकपणें होत गेली. स्वाभिमान आणि स्वत्वसंरक्षण यांचें बाळकडूच त्या लोकांस मिळालें असल्याने स्वत्वसंरक्षणहि आपोआप होत आलें आहे. अिङ्ग्रजींत भाषाशुद्धीची चळवळ झाली नाही, कारण त्या चळवळीची त्याना आवश्यकताच नव्हती. परन्तु यावरून अिङ्ग्रजी भाषेंत हें अनिर्बन्ध व्यापाराचें आणि दळणवळणाचें धोरण यावच्चन्द्रदिवाकरौ राहील असें मात्र कोणी समजूं नये. खुल्या व्यापारापासून अिङ्ग्लण्डचा लाभ होण्याचा थाम्बतांच अिङ्ग्लण्डने

आपलें धोरण फिरविलें, परन्तु हिन्दुस्थानांत स्वदेशी अुद्योगधन्द्यांची वाढ होण्यासाठी संरक्षक करांची आवश्यकता असूनहि कित्येक वर्षें आमच्यांतले पढतविद्वान् खुला व्यापार हेंच आर्थिक समुन्नतीचें सनातन आणि चिरन्तन तत्त्व आहे म्हणून बरळत असत !

महाराष्ट्रांत जर सुदैवाने स्वराज्य असतें; स्वराज्याच्या मोकळ्या वातावरणांत अव्याहत ४०० वर्षेंपर्यंत जर मराठीची वाढ होत आली असती; महाराष्ट्रांत जर अितर भाषा बोलणारांचा सवता सुभा नसता; त्या लोकांची दृष्टि महाराष्ट्राबाहेर आणि हिन्दुस्थानाबाहेर जर सारखी लागलेली नसती; मराठी लोकांच्या हातीं ज्या १००।१२५ वर्षांच्या अवधींत खरी सत्ता होती तेव्हा त्यांनी भाषेचें राष्ट्रीय महत्त्व ओळखून तिचें जर योग्य पालनपोषण केलें असतें; आमच्या वृत्तींत, आपलें तें वाअीट आणि दुसऱ्याचें तें चाङ्गलें मानण्याची अस्वाभाविक प्रवृत्ति, आणि स्वकीयाच्या थोरवीविषयी असहिष्णुता नि परकीयांचें वर्चस्व मानण्याची तत्परता अित्यादि दुर्गुण हाडींमासीं खिळलेले नसते; आणि आज सुद्धा मराठी भाषेचा नि वाङ्मयाचा पद्धतशीर अभ्यास करून आपली भाषा कमावण्याकडे लोकांची प्रवृत्ति असती तर मराठी भाषाशुद्धीचा प्रश्नच अुपस्थित झाला नसता; आणि तसा तो कोणीं केला असता तर मीच त्याला आधी विरोध केला असता. परन्तु महाराष्ट्राच्या अस्वाभाविक स्थितींत मराठीचें स्वत्व टिकविण्यासाठी जर भाषादृष्ट्या अस्वाभाविक असे प्रयत्न करण्यांत आले तर त्यांत गर्ह्य, अग्राह्य आणि अस्वाभाविक असें काय आहे ? औषध म्हणजे काही रुचिकर अन्न नव्हे, पण रोगी मनुष्याला कडू पथ्यकर औषधाविना गत्यन्तर नाही ! रोग्याचे जिभेचे चोचले पुरवून तो निरोगी कसा होणार ? मराठींतील कानडी शब्दांच्याविषयी आम्हांला वैषम्य कां वाटत नाही; आणि अिङ्ग्रजी वा फार्सी शब्दांविषयी कां वाटतें याचीं कारणें आता न सांगतां ध्यानांत येतील अशी आशा आहे.

क्षीरसागर यांनी अुपस्थित केलेल्या दोन आक्षेपांचें असें खण्डन

केल्यावर आणि नवशब्दनिर्मितीच्या धोरणासम्बन्धी त्यांचें माझें किती मतैक्य आहे हें दाखविल्यानन्तर विरोध कोठे येतो तें पाहूं.

ते म्हणतात, नवशब्दनिर्मिति कां करूं नका तर जुने मराठी शब्द मरतात म्हणून. मी तरी निराळें काय म्हणतों ! परकीय बोलींत नवा शब्द दिसला की हुरळून जाऊन त्याला जवळ करण्याची वृत्ति सोडून द्या. कां तर याच वृत्तीने मराठीचे शेकडों शब्द मेले आहेत, आणि शेकडों मरणोन्मुख झाले आहेत. मराठी शब्द मरूं नयेत हीच सदिच्छा दोघांची आहे. "भाषा हें अेक संस्कृतीचें अङ्ग आहे आणि संस्कृति-वर्धनाचें साधन आहे, अतअेव भाषेसम्बन्धी सुद्धा जागरूक राहिलें पाहिजे" असें स्वत: क्षीरसागर म्हणतात. मी तरी निराळें काय साङ्गतों !

मराठी शब्द मरूं देअूं नका. स्वकीय शब्द वाङ्मयाच्या जीर्ण पत्रांत धूळ खात पडले आहेत, स्वकीय शब्द अद्यापि अशिक्षितांच्या बोलींत कण्ठाशीं प्राण धरून राहिले आहेत त्यांना जवळ करा, त्यांना सङ्गतीं घ्या ! त्याचा पुरस्कार करण्यांत हीनता, अप्रतिष्ठा वाटूं देऊं नका. मराठी भाषेचा साङ्गोपाङ्ग अभ्यास करा. स्वावलम्बी व्हा. आपल्या अडचणी स्व-कष्टाने दूर करायला शिका. अितर भाषांतील जे शब्द मराठींत घुसले आहेत ते आपल्या नि आपल्या पूर्वजाच्या निष्काळजीपणामुळे वा पर-धार्जिण्या दास्यवृत्तीमुळे शिरलेले आहेत. ते केवळ दळणवळणाने नि व्यापारी देवघेवीने आलेले नाहीत. आपल्या स्वकीय शब्दाना न कळत मागे रेटल्याविना ते पुढे आलेलें नाहीत. या पुढे पुढे करणाऱ्या परकी शब्दांना काही काळ तरी मागे दूर सारल्यावांचून आपले मागासलेले शब्द आपल्याला दिसूं शकत नाहीत. हे आपले मागासलेले शब्द आणि प्रत्ययोपसर्ग आपल्या वाढत्या नडी भागवून आपली सेवा करण्यास सिद्ध आणि समर्थ आहेत. त्यांच्याकडून सेवा करून घेअून त्यांचें नि आपलें अूर्जित साधणें हें आपलें कर्तव्य आहे. मातृप्रसूतिगृह या शब्दांत हास्यास्पद पाण्डित्य असेल, पण बाळन्तघर या शब्दांत हीनत्वाची छटा कोठे आहे ! मॅटर्निटी होम

म्हणून मोठी पाटी लावतांना लाज वाटावी ती वाटत नाही; आणि बाळन्त-घर या सोप्या घरगुती शब्दाची लाज वाटूं नये ती वाटते, ही स्थिति पार पालटली पाहिजे. शब्दांचें अस्वाभाविक भाषान्तर करूं नये हें युक्त आहे; परन्तु 'अप्‌टुडेट्' याचें भाषान्तर आजतागायत हें चुकीचें होअूं लागलें तें ग्राह्य वाटूं लागलें म्हणूनचअद्ययावत् हा शब्द पुढे आला. हा 'यच्चयावत्'चा भाअू आजतागायतपेक्षा अधिक जवळचा वाटायला पाहिजे, पण वाटत नाही. ज्यांना आजतागायत हा चुकीचा प्रयोग खपतो त्यांना तरी अद्ययावत् हा प्रयोग मुळीच खुपतां कामा नये. आजतागायतच्या ठिकाणीं अद्ययावत् हा शब्द वापरण्यांत काही कोठे परकी भाषांच्यावर आक्रमण होत नाही. ज्यांचें पूर्वी आक्रमण न कळत झालें त्यांना मात्र आता तें अुणावणार म्हणून वाअीट वाटणें स्वाभाविक आहे. पण त्यांच्या विजिगीषामूलक विषादाचा विचार आम्हीं स्वत्वसंरक्षण करूं अिच्छिणाऱ्यांनी कां करावा ?

शुद्धिवादी लोकांना लेखकवर्गाचा विरोध आहे तो येथे आहे. स्वकीय शब्दांची विस्मृति झाली आहे आणि हे परकी शब्द परकी आहेत हेंच कळेनासें झालें आहे. हे परकी शब्द मराठींतून काढून टाकायचे म्हटलें म्हणजे जी अडचण होअील, जी नवी शिक्षा घ्यावी लागेल तिला तोण्ड देण्याला हे कचरतात. अेक प्रकारची दीर्घकालीन सवय झाली म्हणजे ती सोडून दुसरी सवय लाअून घेणें कठिण जातें हें खरें; पण जें अिष्ट आहे तें अुशीरा का होअीना पण केलेंच पाहिजे. तथापि आपला दुबळेपणा लपविण्यासाठी मनुष्य न कळत, पुढे आलेली योजना कशी अव्यवहार्य आणि अशास्त्रीय ठरवितां येअील हें पाहूं लागतो. माझा विरोध आहे अेवढें म्हटल्याने कटुकर्तव्य टाळतां येतें. नवीन शुद्ध-लेखनाविषयी जी अुदासीनता वा जो विरोध दिसतो त्याच्या बुडाशीं अम्मळ हाच चमत्कार आहे ! जे नव्या शुद्धलखनाला हटवादाने विरोध करतात त्यांना पूर्वीच्या शुद्धलेखनाचें ज्ञान, अगत्य तितकेंच असतें.

मराठीवर इतर भाषांचें आक्रमणच नाही असें जे म्हणतात त्यांनी खोल

विचार केलेला नाही असें मोठ्या खेदाने म्हणावें लागतें. अमुक अमुक परकी शब्द वापरावयाचे नाहीत असा जेव्हा मी निश्चय केला तेव्हाच त्या अर्थांचे पूर्वीचे मराठी शब्द मला आठवूं लागले असा माझा अनुभव आहे. नेहमीच्या व्यवहारांतलेच दोन शब्द 'खुशाल' नि 'खुशाली' हे घेअूं. हे शब्द वापरावयाचे नाहीत असें मीं ठरविलें तेव्हापासून माझ्या भाषणांत नि लेखनांत सुखरूप, क्षेम, कुशल हे शब्द येअूं लागले; पूर्वी ते शब्द येत नसत. सुखरूप पोचणें या अन्वयांत सुखरूप शब्द अनेकदा वापरला जातो हें मला ठाअूक आहे; पण सुखरूप आहों, आपली सुखरूपता कळ-वावी असें काही कोणी म्हणत नसेल. तसेंच खुशाल जा या ठिकाणीं सुखेनैव जा, बेधडक जा असें क्वचितच कोणी म्हणत असेल. फार्शी भाषा बोलणाऱ्यांचा आणि आपला सम्बन्ध आला त्याच्या पूर्वी या अर्थाचा वाक्प्रयोग करण्याची आवश्यकताच पडत नसे असें तर या भाषाशुद्धिविरो-धकांचें मत नाही ना! जर काही तरी वाक्प्रयोग होता तर तो नष्ट कां आणि कशाने झाला!

स्वतः क्षीरसागर 'कमालीची कृत्रिम', 'कमालीचा हास्यास्पद' असें म्हणून 'कमालीचा' हा शब्द दोनदा वापरतात. 'पराकाष्ठे'चा हा मराठी शब्द त्याना अेकदाहि का सुचूं नये! जबाबदार, बेजबाबदार हे शब्द त्यांना सारखे आठवतात; विचारी, अविचारी हे शब्द कां आठवूं नयेत! जबाबदार या शब्दात अुत्तरदायित्वाची छटा किती वेळां अभिप्रेत असते! ज्या कारणासाठी मातृप्रसूतिगृह न म्हणतां प्रसूतिगृह म्हणणें योग्य वाटतें त्याच कारणासाठी परिणामविचारी न म्हणतां विचारी म्हणणें योग्य वाटलें पाहिजे. फिकीर, पर्वा हे दोन्ही शब्द ते वापरतात; मुलाहिजाहि ते वापरतील. काळजी, चिन्ता, क्षिति यांपैकी अेखाद्याचें स्मरण कां होअूं नये! हरकत शब्दाची पुनरुक्ति कितीदा तरी होते; अडचण, चिन्ता, प्रत्यवाय, प्रतिबन्ध, आडकाठी, अित्यादि शब्द सन्दर्भाप्रमाणे त्यांच्या हातून कां योजिले जात नाहीत! 'पाण्डित्याची कदर न करितां' आणि 'किताबाची खैरात

करणें' असें ते लिहितात. 'पाण्डित्याची प्रतिष्ठा न ठेवितां' आणि 'पदव्यांचा पाऊस पाडणें' असें लिहिणें अधिक जातिवन्त नाही का होणार ! 'साफ विस्मरण', 'साफ खोटें' असे वाक्प्रयोग लेखनौघांत त्यांच्या हातून होतात; सन्दर्भाप्रमाणे 'पार' आणि 'धादान्त' हे शब्द यावेत ते मागेंच कां राहून जातात ! 'जोराचा' या शब्दापुढे 'निकराचा' हा शब्द येऊं कां शकत नाही! शब्दांनी भाषेंत कोशबद्ध नि निष्क्रिय राहणें म्हणजेच मृत्युपन्थाला लागणें होय. या मराठी शब्दांच्या अुपस्थितीचे मानाने परकी शब्दांच्या अुपस्थितीचें पौनःपुन्य भयङ्कर अधिक आहे. हें त्यांचें वाढूं दिलेलें प्राबल्य नष्ट केल्याविना मराठी शब्दांची अुपस्थिति सहजासहजीं होत जाणार नाही. तेव्हा मराठी शब्द जिवन्त रहावेत, कार्यक्षम रहावेत आणि समर्थ व्हावेत ही जी क्षीरसागरांची सदिच्छा आहे तिच्याच पूर्तीसाठी परकी शब्दांच्यावर त्यांनी बहिष्कार टाकणें अगत्याचें आहे.

क्षीरसागर म्हणतात की "कुशल लेखक जेथे कृपा वापरील तेथे मेहेरबानी वापरीलच असें नव्हे, आणि जेथे प्रेम वापरील तेथे मोहबत कधीच वापरणार नाही;" आणि म्हणून "जे शब्द धड मूळ शब्द घालवीतहि नाहीत आणि फारसा महत्त्वाचा अर्थ, नवीन अर्थ अथवा नाद मराठी शब्द-सङ्ग्रहास देतहि नाहीत" अशा शब्दांनाहि ते अजागलस्तनाप्रमाणे निरर्थक समजत नाहीत. परन्तु जे अर्थाची कोणतीहि नवीन छटा व्यक्त करीत नाहीत अशाच शब्दांनी मराठीच्या अङ्गणांत दाटी केली आहे. प्रेम आणि मोहबत यांच्यांत सूक्ष्म भेद दाखवितां येअील; तसा प्रेम आणि स्नेह यांच्यांतहि दाखवितां येअील. तेवढ्यासाठी मोहबत हा शब्द अपरिहार्य होतो असें नाही. कृपा नि मेहेरबानी यांत मला तर काही अन्तर दिसत नाही. 'शेवटचा निर्णय' न म्हणतां 'अखेरचा निर्णय' म्हणण्यांत अर्थाची कोणती सूक्ष्म छटा क्षीरसागर यांनी व्यक्त केली ती त्यांनीच दाखवून द्यावी.

"दळणवळणाची अपरिहार्यता वा मराठीची निर्धनता ही या क्रान्तीच्या वा अुत्क्रान्तीच्या मुळाशीं नसून या उत्क्रमणाचा दोष सर्वस्वी आमच्या शेळ-

पट परधार्जिण्या अस्वाभाविक मनोवृत्तीकडे आहे" या माझ्या वाक्याचा, त्यांनी आम्ही लोकमान्य लेखकांस शेळपट ठरवितों असा अनर्थ करून 'आम्हां क्रान्तिकारकांच्या दिलदारपणाकडे' वाचकांचें लक्ष वेधिलें आहे! लोकमान्य लेखकांनी ज्या गोष्टीचा खोल विचार केला नाही असें मला स्पष्ट वाटतें त्यांनी तो केला होता असें मी कसें म्हणूं! आणि शेळपट परधार्जिणी वृत्ति ही हिन्दुस्थानांत लेखकांपुरती मर्यादित नसून गार्यीपासून देवापर्यंत दिसते. कोणाला परक्याला दटावयाचें झालें की आम्ही हिन्दुस्थानीचा अवलम्ब करतों तें कां म्हणून! धमकी द्यायला मराठी भाषा खरोखर असमर्थ आहे का? आणि दुसऱ्याला वचक बसतो तो शब्दाचा कीं दृष्टीचा नि दृष्टींत प्रगटणाऱ्या मनगटाच्या शक्तीचा! केवळ विनोदासाठी हिन्दु देवदेवतांच्या कासोट्याला हात घालणारे धाडसी नवमतवादी वीर अ-हिन्दूच्या दाढीच्या वाटेस चुकूनहि जात नाहीत हें ध्यानांत घेतल्यास ते परकीय शब्दांच्या अुच्चाटनाला कां बिचकतात हेंहि ध्यानांत यायला वेळ लागणार नाही.

क्षीरसागरांनी आपल्या लेखाच्या शेवटीं लोकमान्य लेखकांचे अुतारे देअून सावरकरांचा आशावाद निराधार आहे हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. माझा आशावाद सावरकरांच्यासारखा दुर्दम्य नसल्यामुळे मला या प्रश्नाविषयी काही लिहितां येत नाही. भाषाशुद्धीच्या चळवळीला यश आलेलें नसलें, आणि यावयाचें नसलें तरीहि कर्तव्य काही सोडतां येत नाही. तेव्हा श्री. नरसोपन्त केळकर यांच्या अुताऱ्याची तेवढी छाननी करून हें लाम्बलेलें अुत्तर सम्पवूं.

या तेरा ओळीच्या अुताऱ्यांत फार्सी शब्द दहा आहेत. या दहापैकी एक तरी अपरिहार्य आहे का? या दहा फार्सी शब्दांच्या ठिकाणीं मागे पडत चाललेले मराठी शब्द घालून हाच अुतारा कानाला कसा लागतो पाहूं या.

"अिङ्ग्रजांनी हिन्दुस्थानांत राज्य कसें मिळविलें? निजामाकडून अिङ्ग्रजांना जो प्रदेश मिळाला तो अिङ्ग्रजांना लढाअी केल्यावांचून मिळाला हें

खरें, पण निजामाने तो त्यांना स्नेही म्हणून प्रसन्न होऊन भेट म्हणून दिला नव्हता; किंवा अिङ्ग्रज हे त्याचे धर्मगुरु किंवा अीश्वरी लीला दाखविणारे महन्त म्हणून धर्मादाय दिला नव्हता! लॉर्ड डलहौसी यांच्या राजवटींत बरींच राज्यें दायादशून्य झालीं म्हणून अिङ्ग्रजांनी तीं बळकावून आपल्या राज्यास जोडलीं हें खरें आहे. पण अधिराजे किंवा साम्राज्याचे धनी असा आपला अधिकार साङ्गतां आल्यावांचून अिङ्ग्रजांना हीं राज्यें आत्मसात् कशीं करता आलीं असतीं! अिङ्ग्रज काही मराठ्यांच्या बीजाचे नव्हत की ते सातारच्या राजाचे दायाद होअूं शकतील!"

या अुताऱ्याचें मूळ स्वरूप फार्सी शब्द घालून सिद्ध करा असा प्रश्न विद्यार्थ्यांच्या प्रश्नपत्रिकेंत घालून त्यांनी दिलेलीं अुत्तरें वाचणें मनोरञ्जक आणि अुद्बोधक होअील. या स्वरूपांत हा अुतारा कर्णकटु लागतो का, बेडौल दिसतो का! दायादशून्य या अेकच शब्दापाशीं काही लोक ठेचाळतील, पण जेथे 'अक्कलशून्य'सारखा विजातीयांचा सम्बन्ध चालतो तेथे दायादशून्य कां चालूं नये! दक्षिण महाराष्ट्रांत नष्टांश हा शब्द आहे पण तो महाराष्ट्रांत सर्वदूर कदाचित् समजणार नाही. क्षीरसागर म्हणतात की, 'अिङ्ग्रज ही काही मराठ्यांची अवलाद नव्हे' असें वाक्य लिहून अवलाद शब्दाने या ठिकाणीं केळकर यांनी जें कार्य केलेलें आहे तें भाषाशुद्धीच्या कार्याहून मोठें आहे! अवलाद या शब्दांत हीनतेचा ध्वनि आहे, त्या ध्वनीचें या ठिकाणीं काही प्रयोजन नाही. तो ध्वनि मनांत वागवून केळकर यांनी शब्दयोजना केली असेल तर त्यांच्यावर निष्कारण अनुदारपणा दाखविल्याचा आरोप येतो; आणि त्या ध्वनीकडे त्यांनी दुर्लक्ष केलें असेल तर केळकर हे, जितक्या मार्मिकपणाने कलावन्ताने शब्दयोजना केली पाहिजे तितक्या मार्मिकपणाने शब्दयोजना करीत नाहीत असें म्हणणें प्राप्त होतें!

परकी शब्द मराठींत निष्कारण कसे अुपयोगांत येतात हें तर या अुताऱ्यावरून दिसलेंच. आणखीहि अेक चमत्कार पहाण्यासारखा आहे. 'शिवाय'

हा शब्द वांचून या अर्थी दोनदा योजण्यांत आला आहे. या शब्दाने 'वांचून, विना, विणें' या शब्दांना मागे रेटिलेलें नसतें तर अेकदा तरी त्यांचा अुपयोग सहजगत्या झाला नसता का ? परन्तु अशा रीतीने मागे पडत चाललेल्या शब्दांच्याकडे बोट दाखविलें की आम्हांला त्यांची आठवण आहे असें म्हणायचें आणि त्यांची नेमणूक करण्याचा प्रसङ्ग आला की त्यांना नेमकें विसरून, विदेशी शब्दांची वरणी लावून आपली विश्वप्रेमी निष्पक्षपाती वृत्ति (वा स्वकीयांविषयीची अन्याय्य अनास्था) व्यक्त करावयाची अशी आमच्या लेखकांची अभिजात रीति आहे !

भाषाशुद्धीची चळवळ ही धर्मवेडावर उभारलेली नाही. ही सनातनी सोवळेपणाचीहि नाही. एखाद्याने पुराणिकाचें पाण्ढरें चक्राकार पागोटें डोक्याला घातलें की तो हास्यास्पद सनातनी झाला असें मानणें हें अेखाद्याने अिङ्ग्रजी धर्तीचा वेष केला की तो गोरा झाला असें मानण्याअितकेंच भ्रामक नि हास्यास्पद आहे. परधर्मीयाना हिन्दु करून घेतां मग परकी शब्दांना मराठी कां करून घेत नाही असा प्रश्न करणें हें पाङ्घरलेल्या वेडाचें लक्षण आहे. अमेरिकेंतील गोरे लोक ज्यांना खिस्ती धर्माची दीक्षा द्यायला तत्पर असतात त्यांनी जर नागरिकत्वाची मागणी केली तर त्यांना तत्क्षणीं नकार देतात. त्या लोकांची घातुक स्पर्धा नको म्हणून त्यांना नागरिक होअूं देत नाहीत. त्याचप्रमाणे परकी शब्दांचा स्वीकार हा मराठी शब्दांच्या नाशाला कारणीभूत होतो असा अनुभव आहे म्हणून परकी शब्द नकोत. नागरिकत्वाचे अधिकार देण्यास नाकारणारे न्यूनगण्डाने पछाडलेले आहेत असें म्हणण्यास आम्ही धजत नाही कारण ते परकी नि स्वतन्त्र आहेत. भाषाशुद्धिवाद्यांना मात्र न्यूनगण्डी म्हणावें कारण ते घरचे आहेत नि प्रबळ नाहीत ! असो; सदोदित स्वकीय शब्दच आठवून योजावेत. जेथे नवीन एखादी गोष्ट साङ्गायची असेल तेथेहि स्वभाषेतील शब्दांचा, आणि प्रत्ययोपसर्गांचा अुपयोग केल्याने भाषेचा पराक्रम वाढतो म्हणून परकी शब्द न घेतां नवीन शब्दांची निर्मिति करावी.

# ६ स्वभाषेंतील शब्दांकडे पहाण्याची विशिष्ट दृष्टि[१]

शब्दांचा प्रश्न हा प्रथमदर्शनीं क्षुद्र वाटतो, पण हा अुपेक्षणीय नाही. याचें महत्त्व हें एखाद्या विशिष्ट भाषेपुरतें मर्यादित नाही. मी जरी मराठी भाषेंतील शब्दांना अनुलक्षून माझे विचार माण्डणार आहें, तरी गुजराथी-कानडी लोकांनी सुद्धा आपआपल्या जन्मभाषेविषयी विचार करतांना माझी विचारसरणी अवश्य ध्यानांत घ्यावी, अशी माझी अिच्छा आहे. माझ्या सूचनाचा स्वीकार झाला तर त्यापासून निरनिराळ्या हिन्दुस्थानी भाषांचें कल्याणच होअील. त्यांच्या स्वत्वाचें संरक्षण होऊन त्यांचा पराक्रम वाढेल. जें धोरण स्वीकारल्याने आपलेंच नव्हे तर अितरांचेंहि हितच साधणार आहे, तें धोरण सङ्कुचित स्वार्थाचें वा आत्मघातकी सोवळेपणाचें नाही हें अुघड आहे.

या प्रश्नाचा विचार करतांना मराठी भाषेच्या विशिष्ट परिस्थितीची नि मराठी लोकांच्या विशिष्ट मनोवृत्तीची स्पष्ट जाणीव ठेवणें अत्यवश्य आहे. ही जाणीव न ठेविली तर अिङ्ग्रजीसारख्या भिन्न मनोवृत्तीच्या लोकांच्या आणि भिन्न परिस्थितींत वाढलेल्या भाषेचें अुदाहरण डोळ्यापुढे येअून दिशाभूल होते; आणि राष्ट्रीय हित कशांत आहे हें कळेनासें होतें. लक्षावधि रुपये अितर धन्द्यांत मिळविणारे व्यापारी अथवा अखण्ड करगङ्गाजळीचे धनी असे राजे हे जेव्हा करमणूक म्हणून थोडा पैका घोडदौडीच्या पैजांत घालवितात तेव्हा राष्ट्राचें अहित काही होत नाही. परन्तु बहुजनसमाज हा जेव्हा दैवाची परीक्षा पहावयाला सवकतो, म्हणजे विनाश्रम

---

१ हें बडोदें येथे ता. ९ मार्च १९३६ या दिवशी दिलेलें व्याख्यान लोकशिक्षणाच्या अेप्रील १९३६ च्या अङ्कांत प्रकाशित झालेलें आहे.

श्रीमन्त होण्यासाठी तडफडूं लागतो, आणि आपल्यावर अवलम्बून रहाणाऱ्या बायकामुलांच्या तोण्डचा घास काढून घोडदौडीच्या पैजेस लावतो, तेव्हा राष्ट्राची दुर्दशा होते. म्हणून त्याचें अनुकरणस्वातन्त्र्य काढून घेतलेंच पाहिजे. घोड्यांची निपज सुधारेल या आशेच्या नादीं लागून लक्षावधि मनुष्यांचा आर्थिक नि नैतिक अधःपात चालूं ठेवणें अिष्ट नाही. अेकाच समाजात मूठभर थोरांना रुचणारें नि पचणारें हें मेतकूट जर बहुजन-समाजाचें कालकूट होअूं शकतें, तर अेका भाषेला मानवणारें धोरण हें परिस्थितिभेदाने दुसऱ्या भाषेला मारक व्हावें यांत काही नवल नाही. मराठी भाषेच्या भवितव्याचा विचार हा मराठी भाषेची विशिष्ट परिस्थिति ध्यानांत धरूनच करावयाला पाहिजे.

मराठी भाषा आपलेपणांत येअून तिच्यांत ज्ञानेश्वरीसारखें प्रौढ,सालङ्कृत आणि स्थायी वाङ्मय निर्माण होअूं लागलें न लागलें तोंच मराठीची राजवट सम्पली. राजव्यवहाराची परम्परा मोडली. धर्मासङ्गतींच अरबीफार्सी संस्कृतीविषयी विलक्षण आपुलकी बाळगणाऱ्या अल्पसङ्ख्याक वर्गाचें प्राबल्य होत गेलें. काही देवमन्दिराचें जसें रूपान्तर करण्यांत आलें, तसें कित्येक-मराठी स्थानाचें बलात्काराने नामान्तर करण्यांत आलें. देवगिरीची दौलता-बाद झाली. पण मराठी भाषा नष्ट करण्याचा पद्धतशीर प्रयत्न तेव्हा कर-ण्यांत आला नाही, वा सुचलाच नाही, हें महाराष्ट्राचें सुदैव होय. बहु-जनसमाज अशिक्षित आणि म्हणूनच अलिप्त राहिला. वाङ्मय हें केवळ पारलौकिक सोयीसाठी धर्मजागृति करीत असल्यामुळे त्याच्यावर काही राज-कीय वरवण्टा फिरला नाही. अशीं काही शतकें लोटल्यानन्तर शिवरायांचा अुदय होअून महाराष्ट्राचा थोडा भाग शिवछत्राखाली आला. हिन्दवी स्वराज्य झालें. पुढे थोडी घालमेल झाली; पण मराठ्यांच्या अभूतपूर्व अेकोप्याने शिवरायी सावरून धरिली. मराठी सत्ता बळावली, पसरूं लागली; पण जेणेंकरून ती दृढमूल व्हावी अशा काही राष्ट्रीय सङ्घटनेचा विचार झाला नाही. राष्ट्रीय स्वाभिमान, स्वावलम्बन आणि सङ्घटनशीलता यांचा अभाव

भोवल्यावांचून राहिला नाही. मराठी सत्ता स्थापन झाली तेवढ्या प्रदेशापुरतें स्थाननामान्तर थाम्बलें; परन्तु नामान्तरितांचें शुद्धीकरण करण्याची बुद्धि कोणाला झाली नाही. देवगिरीचें नांव लोपलें तें लोपलें ! महाराष्ट्रांत राज्य करणाऱ्या अल्पसङ्ख्य मुसल्मानांच्या ठिकाणीं स्वभाषेविषयी, म्हणजे फार्सी भाषेविषयी जो अुज्ज्वल अभिमान होता तसा मराठी लोकांना मराठी भाषेविषयी कधी वाटला नाही; आणि अेका विजिगीषु राष्ट्राची स्वभाषा म्हणून मराठी भाषेची जशी अुन्नति आणि जोपासना करावयाला हवी होती तशी कधीच करण्यांत आली नाही. मराठी लोकांच्या चालत्या काळांत सुद्धा "नबाब नासरजङ्गास हिन्दवी पत्र गुजरत नाही," म्हणून भगवन्तराव पन्तअमात्य यांचा प्रतिनिधि नारो महादेव हा त्यांच्या पत्राचा अर्थ ध्यानास आणून 'फार्सी अर्जी' सिद्ध करून प्रविष्ट करितो; पण महाराष्ट्रांत औरङ्गाबादेस असें करावें लागावें यांत काही महाराष्ट्रीय मानहानि आहे, असें त्याला वाटत नाही. आमच्या मनोवृत्तीचें हें लक्षण चिन्तनीय आहे. मराठी ही स्वभाषाच होती; तेव्हा मराठ्यांचा व्याप वाढला तसें मराठी लेखकाचें काम वाढलें. शिवरायीच्या अुदयापासून पन्तप्रधानकीच्या अस्तापर्यन्त या लेखकांनी जो पत्रव्यवहार केला त्यांत व्यक्तिशः काही लेखकांनी आपलें सामर्थ्य प्रकट केलें आणि अप्रत्यक्षपणें, सहेतुकपणें नव्हे, मराठी वाङ्मयांत महत्त्वाची भर टाकिली. मराठे राज्यकर्ते झाले तरी लेखकांच्या मनावरील अरबीफार्सी शब्दांची मोहनी अुतरली नाही. पन्तप्रधान या शब्दापेक्षा 'पेशवा' हा शब्द विशेष सुप्रतिष्ठित म्हणूनच कीं काय, विशेष परिचित झाला. अरबी-फार्सी शब्दांची आवश्यकता असो वा नसो, त्यांचा अर्थ लागू पडो वा न पडो, पण अरबीफार्सी शब्द वापरून मराठीचें सोङ्ग सजविण्याची या लेखकांची खोड गेली नाही. राज्यकर्त्यांनी आणि लेखकांनी मराठी भाषेचा कामचलाअू अुपयोग केला; त्यांनी तिच्या स्थितीचा-नि भवितव्यतेचा विचार करून काही धोरण आखलें होतें, असें मुळीच नाही. अशा स्थितींत त्यांनी परकीय शब्दांचे अिष्ट असें 'हिन्दवी-

करण' केलें होतें असें म्हणणें म्हणजे शुद्ध विपर्यास होय.

राज्य मिळवावयाला लागणारे गुण मराठी लोकांत होते, पण पालटल्या स्थितींत राज्य टिकवावयाला लागणारे गुण त्यांच्यांत नव्हते. निराळ्या दृष्टीने सबळ अशा अल्पसङ्ख्य पाहुण्यांच्यापुढे बहुसङ्ख्य यजमानांचा टिकाव न लागून मराठ्यांच्या महाराष्ट्रात कोठे प्रत्यक्ष तर कोठे अप्रत्यक्ष अशी अिङ्ग्रजी राजवट चालू झाली. अितरत्र मराठीची काही प्रगति होत असली, तरी मान्जरा नि पेणगङ्गा या नद्यांमधील प्रदेशांत, मराठवाड्यांत मराठीची जी पद्धतशीर हेळसाण्ड नि दुर्दशा चालली आहे, तिच्याकडे दुर्लक्ष करणें अनर्थावह आहे. असो; अिङ्ग्रजी राजवटींत शिवरायींतील लेखकांची परम्परा तुटली; आणि अिङ्ग्रजी-संस्कृत शिकलेल्या लेखकांचा एक नवीन वर्ग अस्तित्वांत आला. अभ्यासक्रमांत संस्कृत वाङ्मयाला महत्त्वाचें स्थान मिळाल्यामुळे मराठी भाषेला प्रौढता आता संस्कृत शब्दांच्यामुळे येअूं लागली; आणि अरबीफार्सी शब्दांची अुसनी अैट आपोआप मागे पडली. ही क्रान्तिहि अप्रत्यक्षपणें घडून आली; ती कोणी सहेतुकपणें घडवून आणिली नाही. दौलताबादेप्रमाणे कित्येक अरबी-फार्सी शब्द मराठीच्या मानगुटीस घट्ट नखें रोंवून बसले त्यांच्याकडे कोणाचें लक्ष गेलें नाही. शिक्षणाच्या प्रसारासङ्गतीं संस्कृतशब्दप्रचुर भाषा सुबोध नि अभिजात वाटूं लागली. हिन्दुस्थानांतील विविध भाषा या आर्यकुलोत्पन्न असोत वा द्राविडकुलोत्पन्न असोत, सर्वांना संस्कृतीची नि अुच्च शास्त्रीय विचाराची परिभाषा देणारी भाषा संस्कृत हीच असल्याने मराठींत अप्रत्यक्षपणें घडून आलेली ही क्रान्ति अन्तःप्रान्तीय विचारविनिमयाच्या दृष्टीने अिष्ट अशीच झाली. 'लोकहित-वादी'पासून श्री. नरसोपन्त केळकर यांच्यापर्यन्त 'वाघिणीच्या दुधावर पोसलेल्या' अनेक विद्वानांनी नवीन जिवन्त वाङ्मय निर्माण करून मराठी भाषेचा प्रभाव तितका वाढविला आहे याविषयीं वाद नाही; तथापि त्यांनी मराठी भाषेचा मार्मिक अभ्यास करून मराठी-भाषासम्पत्तीच्या दृष्टीने खोल विचार करून काही धोरण ठरविलें होतें असें मला वाटत नाही. शिक-

लेल्या लोकांच्या बोलींतून कानावर पडून पडून हाताशीं राहिलेले काही मराठी शब्द, आणि विद्यापीठाच्या परीक्षा देतांना साहजिकपणें जें संस्कृत वाङ्मयाचें वाचन झालें त्यांतून अुपस्थित होणारे वा नवीन साधतां येणारे संस्कृत शब्द यांच्या भाण्डवलावर वाङ्मयनिर्मितीचा व्यापार अद्यापि करतां येत असल्याने मराठीच्या साङ्गोपाङ्ग अभ्यासाची आवश्यकता वाटत नाही. प्राचीन मराठी वाङ्मय अेकीकडेच राहो, पण आधुनिक मराठी लेखकांच्या कृतींचा अभ्यास शब्दयोजनाचातुर्याच्या दृष्टीने झाला तरी सुद्धा भाषेंत एक नवीन जिवन्त परम्परा चालू होअील. पण सारी कामचलाअू दृष्टि आहे. अेका सुप्रसिद्ध लेखकाच्या अपरिचित संस्कृत ललित शब्दांचा अुगम 'आपटे—मार्गोपदेशिके'च्या बाहेर नाही ! अैतिहासिक कादम्बऱ्यांत वा नाटकांत जेथे मध्ययुगीन मराठी भाषा कशी होती हें दाखवावयाला हवें असतें, तेथे बहुशः अरबीफार्सी शब्दाचा वर्षाव करून तो भ्रम अुत्पन्न करण्याचा प्रयत्न होतो. त्या काळची विशिष्ट शब्दसम्पत्ति, विशिष्ट वाक्प्रयोग अित्यादिकांचें यथायोग्य दर्शन करून द्यावयास पाहिजे. पण तसें करूं म्हटल्यास अैतिहासिक कागदपत्रांतलि नि बखरींतील भाषेचा मार्मिक नि खोल अभ्यास पाहिजे. तो अभ्यास करावयास वेळ आहे कोठे ! आणि त्याची आवश्यकताहि जाणवते आहे कोठें[१] ! साङ्गण्याचें तात्पर्य हें की वाङ्मयांत स्पृहणीय भर पडत असली नि शब्दांच्या नादमाधुर्याकडे जरी लक्ष पुरविलें जात असलें, तरी त्यावरून लेखकांनी भाषेचा मार्मिक अभ्यास केलेला असतो आणि ते शब्दांच्या ध्वनीकडे नि परम्परांच्याकडे लक्ष देअून योजना करितात अशी जी लोकांची समजूत होते ती निराधार आहे. विष्णुभट गोडसे वरसअीकर, 'धनुर्धारी', हरिभाऊ आपटे, आणि लक्ष्मीबाअी टिळक अशी चारपांच माणसें सोडलीं तर शुद्ध घरगुती

१ या दृष्टीने प्रा. श्री. म. माटे अेम्. अे. यांनी काही वर्षांपूर्वी बखरींतील शब्द वापरून भाषा कशी सजवितां येअील याचें प्रात्यक्षिक म्हणून अेक निबन्ध महाराष्ट्र-शारदा-मन्दिरापुढे वाचला होता त्याचें मला स्मरण आहे.

वळणाच्या मराठीकडे लेखकांचें दुर्लक्षच झालें आहे असें दिसून येअील. अशिक्षितपटु अशा स्त्रियांच्या जिह्वाग्रीं जीव धरून राहिलेली ही मराठी भाषा शिक्षणाच्या प्रभावाने तेथूनहि पळ काढूं लागली आहे. लेखी भाषेंत अिङ्ग्रजी शब्द जरी विरळा दिसत असले तरी सुशिक्षितांच्या तोण्डीं अिङ्ग्रजी–मराठीची जी मिसळ घोळत आहे तिचा अद्यापि वीट येत नाही. मराठी वाग्भट तिच्या विरुद्ध निकराची चळवळ करावयाला अजून पुढे येत नाहीत. भाषाशास्त्राचें स्तोम माजविणाऱ्यांनी हें ध्यानांत धरावें की, निकट नात्यांचे वा व्यवहाराचे शब्द मनुष्य बहुशः सोडीत नाही हा जरी नियम आहे तरी मिसेस, वाइफ, बेबी, ब्रदर, मटन, फिश इत्यादि परकीय शब्द मराठीच्या माजघरांत वावरूं लागले आहेत. बायकासुद्धा "याचें काही 'फील' होत नाही" असें म्हणतात. कारण, जिवाला लागण्याचे दिवस गेले ! अिङ्ग्रजीचा गन्ध नसलेले मराठी शिक्षक आपल्या विद्वान् वरिष्ठांच्या तोण्डचे शब्द झेलून 'रिफ्रेशर क्लास'ची भाषा बोलतात, अुजळणी शब्दाच्या व्याप्तीचा विसर त्यांच्या विद्यार्थ्यांच्या आधीच त्यांना पडूं लागला आहे. बान्धकामाशीं ज्यांचा सम्बन्ध येतो असे गवण्डी लोक जोतें वा चौथरा हा मराठी शब्द टाकून 'प्लिन्थ'चें बान्धकाम करीत आहेत. चौथऱ्याचे खरोखरीच चार थर असतात. एक थर पायांत जातो, दुसरा थर लहान तोडीचा वा बेन्द्रीचा, तिसरा थर गुण्डा वा पेटीचा आणि चौथा, पाठथर असतो. कऱ्हाडास रा. दत्तात्रय पाण्डुरङ्ग पाठक यांनी आपलें घर बांधिलें होतें त्यांच्याशी बोलतांना सहज हें ज्ञान मला मिळालें. हें लक्षांत घेतलें तर चौथरा या शब्दाला कशी सार्थकता आहे, कशी परम्परा आहे हें दिसून येअील. सुशिक्षितांच्या तोण्डचे हे अिङ्ग्रजी शब्द अशिक्षित बहुजनसमाजाच्याहि तोण्डीं बसूं लागले आहेत. काही दिवसांनी हे विदेशी परकीय आहेत याचीहि जाणीव राहणार नाही; आणि

"मिस्टर नानाभाअी, तुम्हीं जो धाडिलांत सर्व्हण्ट
गुड फॉर नथिङ्ग आहे, त्याची आम्हां नसे अता वॉण्ट"

अशी आर्या वाचून आर्यांना आज जें हसूं येतें तें येणार नाही. मराठींतील शब्द-प्रवाहांचा अितिहास हा असा आहे. मराठीचें बहुतेक आयुष्य पारतन्त्र्यांत गेलेलें आहे. आजहि ही परतन्त्र लोकांची भाषा आहे. वाङ्मयाचा ओघ अव्याहत वाहत आलेला दिसला तरी भाषेचें राष्ट्रीय महत्त्व ओळखून राष्ट्रीय स्वाभिमान, स्वावलम्बन आणि स्वत्वरक्षण यांच्या दृष्टीने तिच्या पराक्रमाचें क्षेत्र वाढविण्याचा विचार कधींहि झालेला नाही. जें झालें तें कां झालें असा निर्भीड प्रश्न विचारून यातायात करण्यापेक्षा जें झालें तें अिष्ट होतें म्हणूनच झालें, असें म्हणून तें मान्य करून स्वस्थ बसण्याकडे आमचा कल अधिक असतो. मूठभर जेत्यांच्या भाषेंतील शब्दांची भुरळ अद्यापि नाहीशी झालेली नाही. अितकेंच नव्हे, तर ती नाहीशी व्हावी अशी अिच्छा करणेंहि आम्हांला अस्वाभाविक आणि भयङ्कर वाटतें! मराठी शब्दांचा विचार करतांना मराठी भाषेच्या विशिष्ट परिस्थितीप्रमाणेच विलक्षण, विपर्यस्त आणि परधार्जिण्या अशा आमच्या मनोवृत्तीकडेहि आम्ही लक्ष पुरविलें पाहिजे.

मराठी भाषेंतील मराठी शब्दांची—वाङ्मयांतील नि प्रान्तिक बोलींतील मराठी शब्दांची आमच्या अनभ्यासामुळे नि अुपेक्षेमुळे सारखी पिछेहाट होत आहे, या गोष्टीकडे अद्यापि कोणाचें लक्ष जात नाही, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. हातात नियमितपणें खेळणाऱ्या रुपायांवर नगरांत टामटुमीने संसार करणाऱ्या लोकांना ज्याप्रमाणें नागरजीवनाच्या पलीकडे, खेड्यांपाड्यांतून राहणाऱ्या बहुसङ्ख्य आणि निष्काञ्चनच नव्हे तर निष्कपर्दिक अशा मनुष्यांची स्थिति कशी आहे याची जाणीव होत नाही, त्याचप्रमाणे आपल्या नियमित भाण्डवलावर एका मर्यादित वर्गाचें मनोरञ्जन करून आपल्या प्रतिभेचे विलास चालविणाऱ्या लोकांना मराठी भाषेचें दूरवर पसरलेलें पाणी आटत चाललें आहे कीं काय हें दिसत नाही, आणि पहाण्याची आवश्यकताहि वाटत नाही. वैयक्तिक चरितार्थासाठी चालविलेल्या धन्द्याचा राष्ट्रीय चरितार्थावर काय परिणाम होतो याचा थोडाफार

विचार प्रत्येकाने अवश्यमेव केला पाहिजे, हें आमच्या स्वप्नांत सुद्धा येत नाही. आम्ही आत्मसन्तुष्टतेच्या तन्द्रींत निमग्न राहतों. काही चळवळ्यांनी घातलेल्या बहिष्काराच्या किङ्काळ्या कानावर आदळल्या म्हणजे मग आम्ही डोळे अुघडून, पण पडल्यापडल्याच बान्धवांच्याकडे दृष्टि फेकतों; आणि ती सुद्धा, काय निष्कारण बोम्बाबोम्ब चालविली आहे अशा अर्थाच्या त्रासिक मुद्रेने ! परन्तु या हाकाटीविना जागृतिच होत नाही त्याला काय करावें ! पेठेंतील झगझगीत दुकानांतून सज्ज असलेलें परदेशी कापड वापरूं नका, स्वतःच्या जवळच्या–दुसऱ्याच्या दुकानांतील नव्हे हं !–अशा त्याज्य कापडाची होळी करा, असे महाध्वनि कानीं पडूं लागले म्हणजे मगच स्वदेशी कापड कोठे मिळतें, कसें असतें, तें डोळ्यांत कां भरत नाही, तें विणणाऱ्या साळीकोष्टी समाजाची स्थिति अशी कां, त्यांना परदेशांतील विणकऱ्यांशी टक्कर कां देतां येत नाही इत्यादि अनेक प्रश्न मोहरा करून लोकांना विचार करावयाला लावतात. हे विचार चालू झाले म्हणजे काही मनुष्यांना तरी निर्घोर झोप येत नाही.

मराठी, गुजराथी, कानडी अित्यादि हिन्दुस्थानी भाषांतील मूळ शब्दांची पिछेहाट होऊन ते लुप्त होण्याच्या पन्थाला लागले आहेत कीं काय, भाषावृक्षावर डवरलेली तकतकीत पालवी मूळ वृक्षाची आहे कीं बाण्डगुळाची आहे याचा विचार प्रत्येक देशी भाषेच्या स्वाभिमानी पुत्राने केला पाहिजे. ही तकतकीत पालवी जर बाण्डगुळाची असेल तर त्या बाण्डगुळाचें निर्मूलन केल्याविना तो वृक्ष स्वतःच्या पल्लववैभवाने सुशोभित होणार नाही. परन्तु या बाण्डगुळावर कुऱ्हाडीचा घाव घाला म्हणून म्हटलें की, आमचे संवयबद्ध, लालित्यलोलुप शान्तिपाठी नेमके त्याचा कैवार घेऊन भाण्डावयाला सिद्ध होतात ! हें बाण्डगूळ सुशिक्षितांच्याच निष्काळजीपणामुळे वाढलें आहे. त्यांनीच तें खणून काढण्याचे परिश्रम केले पाहिजेत. ही खडतर शिक्षा नको म्हणून ते कुतूहलजनक विचारसरणी लढवीत आहेत. हें बाण्डगूळच नाही; ही गूढ अीश्वरी योजनेने वाढलेली औषधीच असेल;

हें काढण्याचें द्वेषमूलक कार्य करण्यापेक्षा सामर्थ्याचा विनियोग अितर काही विधायक कार्य करण्याकडे करतां येअील; शोभा आणि सावली यांना तरी सध्या कां मुकावें ! अशी काही शिष्टाअी हे साहित्याचे आधारस्तम्भ केव्हा केव्हा करीत असतात. यांत फारसें काहीच करावें लागत नाही. प्रतिपक्षावर विविध आरोप करून त्याच्याशीं आमचा प्रामाणिक मतभेद आहे अेवढें यांनी ठासून म्हटलें की, आपल्या रुळलेल्या पन्थाने जावयाला हे मोकळे होतात ! नड चळवळ्यांना जाणवते. तेव्हा अशा आक्षेपांचें खण्डन करण्याचा बोजा चळवळयांच्यावरच पडतो.

ज्या परकीय शब्दांना आम्ही मराठींत घुसूं दिलें आहे ते आम्हांला मराठी समानार्थी शब्दांचा विसर पाडतात; आणि म्हणून, विस्मृतीच्या पन्थाला लागलेल्या या शब्दांचा जर अुद्धार करावयाचा असेल तर लाडावून डोअीजड होअूं दिलेल्या या परकीय शब्दांना आम्ही निष्ठुरपणाने दूर केलें पाहिजे. या परकीय शब्दांच्याविषयी आम्हांला जी घातुक मोहनी वाटते असें मी म्हणतों, तिच्यामुळे समानार्थी मराठी शब्द मागासलेले नाहीत असें जर सप्रमाण सिद्ध करून देण्यांत आलें तर या चळवळीचें प्रयोजनच अुरणार नाही. परन्तु या अस्वाभाविक मायेच्या झपाट्याने शेकडों मराठी शब्द पाङ्गुळलेले आहेत, ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. आमचें यामुळे जें अपरिमित अहित होत आहे, त्याची नीट जाणीव आम्हांला झालेली नाही. अुदाहरणार्थ 'नफा–नुकसान' हेच शब्द घेअूं. हे शब्द लिहिण्याबोलण्यांत कितीदा येतात हें प्रत्येकाने पहावें आणि प्राप्ति–हानि, लाभ–तोटा, हित–अहित हे समानार्थी शब्द कितीदा येतात तें ताडून पहावें, म्हणजे मग अितर शब्दांच्या मानाने 'नफा-नुकसान' या शब्दांचें पौनःपुन्य किती भयङ्कर आहे तें दिसून येअील. लाभ हा शब्द व्यापाऱ्याच्या तोण्डीं पहिलें माप टाकतांना तेवढा हटकून येतो. पर्वा, फिकीर हे शब्द योजावयाचे नाहीत असें ठरवावें तेव्हाच अडचण, क्षिति, चिन्ता, प्रतिष्ठा अित्यादि शब्दांची अुपस्थिति होते. मुद्दाम या शब्दावर बहिष्कार

घातल्याविना जाणून-बुजून, बुद्धया, बळें हे शब्द सुचत नाहीत. मजल, गरज, रोख हे शब्द कडेला सारल्यावांचून धाव, नड, मोहरा हे शब्द पुढे येअूं शकत नाहीत. बाजार या शब्दाचें अेकमेवाद्वितीयत्व नष्ट झाल्याविना, मार्केटलाहि दूर केल्यावाचून गुजरी, पेठ, मण्डअी, हाट या शब्दांना भाव येत नाही. 'खण्डेराव मार्केट' हें नाव कशाला ? 'खण्डेराव काच्छियावाड' काय वाअीट आहे ? 'खण्डेराव-मण्डअी' तर कानास विशेष गोड लागेल. बरोबर या शब्दाला भुअी–सपाट केल्यावांचून सङ्गें, सङ्गतीं या शिष्ट वाङ्मयांत आढळणाऱ्या, पण खेडवळ लोकांच्याच तोण्डीं अद्यापि खेळणाऱ्या शब्दांचें अूर्जित होणार नाही. दुखणाअीत, दुखणेकरी हे आसन्न-मरण दिसतात; पण आजारी हा मात्र प्रबळ आणि सर्वगामी दिसतो. त्याची आणि पेशण्ट या शब्दाची आता झोम्बी लागेल तेव्हा काय होअील तो प्रकार दिसेलच. सुन्दोपसुन्दराप्रमाणे दोघेहि पडले तर दुखणेकऱ्याला बरें वाटेल !

हे परकीय शब्द किती अडवणूक करितात, कसे अपरिहार्य होअून बसतात याचा अनुभवच घेअून पाहिला पाहिजे. "ज्याची लज्जत तूच लावुनि दिली .." अशी एक ओळ माझ्या कवितेंत होती. 'लज्जत' हा शब्द अेकन्दर भाषासरणींत, संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास ज्याने केला आहे अशा नायकाच्या तोण्डीं शोभत नाही म्हणून तो काढावयाचा असें मी ठरविलें. मग समानार्थी शब्द कोणता योजावा याचा विचार करूं लागलों. 'लज्जत' या अरबी शब्दाचा अर्थ स्वाद–स्वादिष्टपणा याहून निराळा अगदी नाहीं; तथापि स्वाद या शब्दांत काहीतरी अुणें आहे असें वाटे. गोडी या शब्दांतहि पुरी गोडी वाटेना. मग शोधता शोधतां चटक हा शब्द आणि त्यासङ्गतींच "गुरुने चटक लाविली मोठी" ह्या चरणाचीहि उपस्थिति झाली. नादिष्ट लेखकांना 'लज्जत' या शब्दांत जी चटक प्रतीत होते तीच मला चटक या शब्दांत पटली. मी जर थाम्बून कष्टपूर्वक या शब्दाचा शोध केला नसता तर तो शब्द तितका मागेच राहिला असता

आणि लज्जत हा पुढे पुढे करणारा शब्द तितकाच अपरिहार्य वाटला असता. तसेंच एका टेकडीवर रात्रीं चान्दण्यांत अस्वस्थपणाने फिरण्याचें वर्णन करण्याच्या भरांत "सैतान मनांतिल झोपायाचा परन्तु कुठला क्रूर !" असें मी लिहून गेलों. मनोगत अस्वास्थ्याला मी 'सैतान' ही शिवी दिली. परन्तु हिन्दु संस्कृतींत हा वाक्प्रयोग "बाय् जोव्ह" इतकाच विसङ्गगत आहे. तेव्हा या सैतानाला दूर करावयाचें मीं ठरविलें. मनांत तीच कल्पना घोळत असल्याने दैत्य, निशाचर हे शब्द आढळले; पण ते तितके समर्पक वाटेनात. शेवटीं आपल्या जुन्या परिचयाचा वेताळ आठवला; आणि "वेताळ मनींचा न निजे—छे पण रात्रिंचाच हा शूर !" अशी सुधारणा मी केली. वस्तुतः हा शब्द आरम्भींच सुचावयाला हवा होता. कारण, ज्या टेकडीवरील भ्रमणाविषयीं ही कविता होती तिच्या शेजारच्याच टेकडीचें नांव वेताळ-टेकडी असें आहे !

परकीय शब्दांच्यापुढे आम्हांला आमच्या शब्दांचें विस्मरण होतें. अितकेंच नव्हे, तर जेथे असें विस्मरण होत नाही तेथे आम्ही आमच्या शब्दांचें सञ्चारक्षेत्र अगदी मर्यादित करून परकीय शब्दांना हातपाय पसरावयाला पूर्ण वाव देतों. मराठींतील बलात्कार हा शब्द घ्या. अेक निन्द्य कर्म लक्षणेने व्यक्त करण्यापुरती या शब्दाची व्याप्ति सङ्कुचित करण्यांत आल्याकारणाने बलाग्रहाने केलेलें कोणतेंहि कर्म साङ्गावयाला जोरी, जबरी, जबरदस्ती, जुलूम, सक्ती या परकी शब्दांचा अुपयोग अपरिहार्यपणें करावा लागतो. अुलट, परकीय शब्दांना नानार्थी अुपयोगिल्याने त्यांची अुपस्थिति तितके अधिक वेळा होते; आणि ते शब्द तितके अधिक वेळां स्मरल्यामुळे तितके अधिक बलिष्ठ होतात. सुखरूप हें 'खुश्हाल'चें भाषान्तर आहे; पण सुखरूप पोहोचणें या व्यतिरिक्त सुखरूप शब्द निकामी पडून राहातो; त्याच्यापासून सुखरूपता असा नवनि शब्द आम्ही सिद्ध करीत नाही. अुलटपक्षीं सुखरूप या अर्थी खुशाल हा शब्द आम्ही वापरतोंच, पण सुखेनैव, निश्चिन्तपणें या निराळया अर्थानेहि तोच शब्द आम्ही बहुशः वापरतों.

खुशाल या विशेषणापासून खुशाली हें कुशलाला मागे सारणारें भाववाचक नाम तर होतेंच; पण खुशालचन्द, खुशालराव अशीं विशेषनामेंहि सिद्ध होतात; पण अुद्या सुखरूपचन्द, सुखवस्तुराव असें कोणी म्हटलें तर विडम्बनाला तत्काळ अुकळी फुटेल !

परकीय शब्दांत काही विशेष अर्थच्छटा वा नाद वा गौरव असेल अशा आशेने त्यांना जवळ करून, जुने मराठी शब्द टाकाअू असतील अशा भ्रमाने त्यांस आम्ही दूर करीत आहों, हा आमच्या बौद्धिक विकृतीचा प्रताप आहे. ही विकृति आमच्या अितक्या सवयीची झाली आहे की, ती प्रकृतिच आहे असें आम्हांला वाटतें आहे ! आमच्यांत स्वाभिमान जसा प्रज्वलित असावयाला पाहिजे तसा तो अद्यापि नाही. आमचीं विद्यालयें अिङ्ग्रजी हा अेकच विषय शिकविण्यासाठी असत नाहीत; अिङ्ग्रजी हा अनेक विषयापैकी अेक विषय असतो; पण शाळेचें नांव अिङ्ग्रजी, वर्गांचीं नांवें अिङ्ग्रजी, मुलांची नाममाला अिङ्ग्रजी, मुलांसाठी काढलेल्या सूचना अिङ्ग्रजी; अितकेंच नव्हे, तर मराठीची प्रश्नपत्रिकासुद्धा अिङ्ग्रजींतून, अशी काही विपरीत स्थिति आढळते! बरें, अिङ्ग्रजासारखें अिङ्ग्रजी बोलतां लिहितां यावें म्हणून हा 'अव्यापारेषु व्यापार' चालला आहे म्हणावें, तर गेल्या ६०-७० वर्षांत गोखले, जयकर वगळल्यास किती अिङ्ग्रजीचे वक्ते निर्माण झाले ! आणि रानडे, खरे नि श्री. श्रीधर गणेश वझे हे वगळले तर किती अिङ्ग्रजीचे लेखक झाले ! पण आम्हांला आमच्या धड मराठीविषयी काही प्रेम वाटत नाही नि आमच्या फाटक्या अिङ्ग्रजीचा मात्र मोठा अभिमान वाटतो. या प्रकरणीं मुसल्मानांचा स्वभाषाभिमान अनुकरणीय आहे. नांवपाट्या या कोणाच्या अुपयोगासाठी आहेत ! पण त्या अिङ्ग्रजी भाषेच्या असण्यांत आम्हांला गौरव वाटतो. 'मॅटर्निटी होम' अशी भव्य सुशोभित पाटी असलेलें घर काही आङ्ग्ल युवतींच्यासाठी नसतें, पण बाळन्तघर या साध्या शब्दाची आम्हांला लाज वाटते. आम्ही सार्वजनिक अुद्यान म्हणत नाही, तर 'पब्लिक

पार्क' वा 'कमिटी-बाग' म्हणतों, परन्तु मुसल्मान संस्थानांत 'बाघे आम्'म्हणतात ! मराठी हिन्दु राज्यांत 'मुशीरिखास, 'मुन्तझिम् बहादुर' अशा पदव्या देण्यांत येतात ! या प्रकरणीं बडोद्यांत थोडी जागृति, थोडी प्रगति आहे. अितरत्र ही जागृति सुद्धा नाही. सुशिक्षितांच्या विचारसरणींत विलक्षण विसङ्गति आढळते. बहुजनसमाजाच्या मातृभाषा भिन्न असूनहि अेक ठिकाणीं राजभाषा म्हणून अुर्दूचें प्राबल्य आम्ही राजनिष्ठपणें स्वाभाविक मानितों,तर अितरत्र राजभाषा हिन्दी असतांना बहुसङ्ख्य प्रजाजन मुसल्मान असल्याने अुर्दूचेंच प्राबल्य झालें पाहिजे अशी मागणी करण्यांत आली तर त्या वेळीं आमची राजनिष्ठा नव्हे, तर आमची लोकनिष्ठा अचूक जागृत होते आणि त्या मागणीला मान्यता देते ! या चमत्कारिक मनोवृत्तीमुळे आम्ही बाहेरच्यांचे दास नि घरच्यांचे काळ होतों. रावसाहेब, रावबहादूर याच पदव्या मुसलमानांना दिल्या तर काय बिघडेल ! परन्तु त्यांत 'राव' आहे तो त्याना नको म्हणून त्याच्या ठिकाणीं 'खाना'ची स्थापना करून खानसाहेब, खानबहादूर अशा पदव्या सिद्ध होतात. हें सारें आम्हांला योग्य वाटतें, पण साहेब, बहादूर यांचाहि स्वीकार स्वाभिमानास बाधक आहे म्हणून रावधणी, रावशूर अशा पदव्या सिद्ध व्हाव्यात अशी कोणी मागणी केली तर आम्ही त्याला तत्काळ विक्षिप्त ठरवूं. कारण, या परदेशी शब्दांत आम्हांला नकळत गौरव वाटतो. कारभाऱ्याला 'दिवाण' म्हणवून घ्यावेसें वाटतें; प्रधानाला 'प्राइम् मिनिस्टर' हा शब्द रुचतो. राजकुमाराला 'प्रिन्स' शब्दांत अधिक प्रतिष्ठा वाटते. साहेबाचा डोअीजडपणा तर विचारूंच नका ! राव, राजे, महाराज सर्वांनाच 'साहेब' या पदवीचा पाठिम्बा न मिळाला तर बहुमानांत काही तरी न्यून राहिलें, नव्हे अपमान झाला असें वाटतें. जणू काय 'साहेब' म्हणजे नाममाहात्म्याचा कळसच होय ! 'साहेब' म्हटल्याने रङ्कापासून राजापर्यन्त सारेच स्त्रीपुरुष प्रसन्न होतात. शङ्कराचार्यांना 'डॉक्टर' पदवीचा अुपसर्गच मानवूं लागला आहे. पण अद्यापि शङ्कराचार्यसाहेब असा वाक्यप्रयोग होअूं लागला नाही

कसा याचेंच मला आश्चर्य वाटतें! रावाची ही अवहेलना योग्य आहे का? राव हें 'राजन्'चेंच मराठी रूप आहे. कच्छ आणि कोटा या दोन संस्थानांचे महाराजे स्वतःस 'महाराव' म्हणवितात. कोल्हापुराकडे 'राव' ही पदवी बहुमानदर्शक होती असें मानावयाला आधार आहे. जोशी, पण्डित वा भोप्ये (म्हणजे तुळजापूरचे क्षेत्रोपाध्ये) हे जेव्हा राजाश्रयाने नामदार नव्हे तर नामवन्त होत, तेव्हा त्यांना जोशीराव, पण्डितराव, भोपेराव म्हणत. मराठी राज्यांत शूर झुन्जारांना धारराव, भालेराव म्हणत. शहाजीमहाराजांच्या सङ्गतीं जीं महाराष्ट्रीय घराणीं दक्षिणेंत तन्जावरपर्यन्त जाऊन स्थायिक झालीं तीं स्वतःला 'राव' म्हणवितात. श्री. नरसोपन्त केळकर यांना तात्याराव म्हणतांक्षणीं मुम्बअी-पुण्याकडे हसूं लोटत असलें तरी बेङ्गलुराकडे अण्णाराव, अप्पाराव, तात्याराव, बाबाराव, भाअूराव, अशीं नांवें अद्यापि प्रचलित आहेत. 'काय राव!' असा प्रश्न अैकण्यांत ज्यांना हीनत्व वाटतें त्यांना 'काय राजे!' म्हणावें. असें करावयाला कोणाचा प्रतिबन्ध आहे! गुजराथी स्वयम्पाकी हा नाही महाराज होअून बसला! रावाची अितकी महती साङ्गितल्यावरहि नुसतें 'राव' म्हणण्यात ज्याना योग्य शिष्टाचार पाळला गेला आहे असें वाटत नाही, त्याच्यासाठी तोण्ड भरून म्हणता यावेत म्हणून 'रावमहाशय' 'रावराजे' अित्यादि वाक्प्रयोग आहेत!

नवीन शब्दांची सिद्धि करतांना सुद्धा आमची अस्वाभाविक मनोवृत्ति आमची दिशाभूल करिते. 'रेकॉर्डब्रेकिंग'वरून काहीतरी मोडण्याची कल्पना डोक्यांत ठाम होते; आणि मग 'रेकॉर्ड'साठी अुच्चाङ्क, पराकाष्ठा, सीमान्त असे शब्द शोधून काढून हास्यास्पद रीतीने त्यांचें 'मोडण्या'शीं आम्ही लग्न लावतों! परन्तु अेखाद्या गोष्टींत पूर्वी होअून गेलेल्या पराक्रमाहून अधिक पराक्रम करून दाखविणें, त्या गोष्टींत अग्रेसरत्व पटकावणें म्हणजे अेका दृष्टीने 'दिग्विजय'च करणें नाही तर काय! पण काहीतरी मोडण्याची कल्पना मनांत ठसल्यावर दिग्विजय हा आपला शब्द सुचावा कसा! 'दि गोल्डन् मीन्' मनांत ठसल्यावर 'सुवर्णमध्य'च सुचणार, 'तार-

तम्य' कसा सुचणार! मानभावीपणाचें रडें, शोकाचें सोङ्ग ही कल्पना मराठींत व्यक्तच करितां येणार नाही का! का 'क्रॉकोडाअिल टियर्स'ची ओळख होअीपर्यन्त ही गोष्टच आम्हांला ठाअूक नव्हती! बकध्यानाच्या जोडीला बक-शोक हा शब्द निर्माण करा, कृतककलहावरून कृतकाश्रु असा शब्द सुचवा, परन्तु 'नक्राश्रु' ढाळूं नका. अिङ्ग्रजी भाषेंत मृगजळाला डिअर-वॉटर (हरिण-पाणी) म्हणणें हें जितकें हास्यास्पद होअील तितकेंच मराठींत कृतकशोकाला 'नक्राश्रु' म्हणणें हें हास्यास्पद आहे. न्यायाचें राज्य असलें तर मराठींत आपण रामराज्य म्हणतों; परन्तु राज्य हा शब्द समासांत अपात्र वाटतो म्हणूनच की काय अितर वेळीं आम्हांला 'शाही'च आठवते; जणू काय आमच्या पूर्वजांनी राजवटी गाजविल्याच नाहीत! जेथे सेवकच सत्ता बळकावतात आणि प्रजाजनांचा विचार न करतां आपलीच आज्ञा चालवितात, तेथे 'नोकरशाही' न म्हणतां सेवक-राज्य, सेवक-स्तोम कां म्हणूं नये! 'सोटेशाही', 'दण्डुकेशाही' या प्रयोगांपेक्षा सोटेरावी, बडगेरावी, काठी-राज्य हे प्रयोग अधिक जातिवन्त नाहीत होणार! 'ऑनरेबल' शब्दाचें भाषान्तर, नामधारी अर्थाच्या 'नामदार' या शब्दाने करण्यापेक्षा नामवन्त, मान्यवर, सन्मान्य अित्यादि शब्दांनी करणें अधिक श्रेयस्कर नाही का? 'आमदार-खासदार' ही दुक्कल तर प्रदर्शनीय आहे! अुच्चारसौकर्यावीण या शब्दाच्या ठिकाणीं काही गुण नाही. दिल्लीपतींच्या राजवटींत 'दीवानि खास' आणि 'दीवानि आम' म्हणजे 'विशिष्ट मण्डळ' आणि 'सामान्य मण्डळ' अशा दोन सभा असत. अशा प्रकारचा स्थूल भेद ठेवणारीं दोन विधिमण्डळें आज मध्यवर्ती ठिकाणीं आहेत आणि काही प्रान्तातून अशींच दोन मण्डळें स्थापन होणार आहेत, तेव्हा विधिमण्डळाच्या सभासदांचे चार वर्ग पडणार, आणि नांवेंच द्यावयाचीं झालीं तर सुटसुटीत चार नांवें हवींत. 'खासदार-आमदार' ही दुक्कल चालणार नाही. 'नामदार' याचा काही अर्थ तरी होतो; परन्तु 'खासदार-आमदार', या शब्दांचा अर्थ काय! विशिष्ट-धारी, सामान्य-धारी, असें म्हणून

काही अर्थबोध होतो का ! विशिष्ट सभासद, सामान्य सभासद अथवा वर्ग-प्रतिनिधि नि लोकप्रतिनिधि हे शब्द निदान सार्थ तरी आहेत. परन्तु 'आम-खास-दिवाणीं'च्या मोहिनीने दिङ्मूढ झालेल्यांना अर्थाची चाड वाटत नाही. हातांशीं पत्र असलें की गोमागणेशी छापाचे शब्द बेधडक चलनी करावेत. अेकाने अरुण-तरुण-वरुणांची लयी काढली की दुसऱ्याने शिष्ट-विशिष्ट-प्रशिष्टांची शिष्टाअी चालवावी !

परकीय शब्दांवर नसत्या गुणांचा आरोप करून त्यांना सेवेस ठेवून त्यांत आपला मोठेपणा मानण्याच्या आमच्या अस्वाभाविक वृत्तीमुळे आमचे जुने जातिवन्त शब्द मागे पडून नष्ट होत आहेत, ही अेक मराठी भाषेची हानि होतच आहे; परन्तु दुसऱ्यांनी, म्हणजे महाराष्ट्रीयेतरांनी, सुचविलेल्या शब्दांवर निर्वाह करण्याच्या आमच्या स्वाभिमानशून्य आयते-पणाच्या खोडीने भाषेची नवीन शब्द निर्माण करण्याची जी शक्ति तिचाहि झपाट्याने ऱ्हास होत आहे. कष्ट करून यश मिळतेंच असें जरी नाही तरी कष्ट करण्याने बळ वाढतें, आत्मविश्वास वाढतो याविषयी शङ्का नाही. बळ आहे तोंपर्यन्तच यशाची काही आशा आहे. पण अेक भाषाशास्त्री आक्षेप घेतात की शब्दाच्या मुळाशीं जी अेक कल्पना असते ती दुसऱ्या शब्दाने कशी अुभी रहाणार ! 'फ्लॉवर-पॉट्' म्हणतांच जी वस्तु डोळ्यां-पुढे येते ती 'फुल-पात्र' वा 'पुष्पभाजन' म्हणून कशी येअील ! पण 'फ्लॉवर-पॉट' म्हणताच तरी अमुक वस्तु प्रथम कशी अुभी राहिली ! पाहिलेल्या अेका वस्तूला 'फ्लॉवर-पॉट' म्हणतात असें कळलें तेव्हाच ना ! मग या वस्तू जेथे पहावयाला वा विकत मिळतात तेथेच त्यांना 'फुल-पात्र' म्हणतात असेंहि कळलें तर पुढे 'फुल-पात्र' म्हणतांक्षणीं तें चित्र डोळ्यांसमोर अुभें राहील कीं नाही ! आगगाडी तर परदेशांतूनच आली ना ! मग आगगाडी हा मराठी शब्द रूढ कसा होअूं शकला ! हा शब्द जर माझ्यासारख्याने नवीन सुचविला असता तर ही गाडी वाफेच्या शक्तीने चालते आणि गाडी अेक नसून गाडयांची माळ असते, अतअेव

शब्द ग्राह्य नाही, अशी टीका आगगाडी शब्द प्रत्यहीं वापरणाऱ्या विद्वानांनीच केली असती. परन्तु बहुजनसमाजाच्या दृष्टीने पुढे आग स्पष्ट दिसते आहे, मागे लाम्बलचक गाडी आहे, तेव्हा आगगाडी हा आटोपशीर शब्द पुरेसा सार्थ झाला. पाश्चात्य देशांतून सहस्रावधि नवनव्या गोष्टी हिन्दुस्थानांत येत आहेत म्हणून त्यांच्यासङ्गतीं परकीय शब्दहि मराठी भाषेंत आलेच पाहिजेत असें समजणाऱ्यांनी आगगाडी, घड्याळ, बोलपट अित्यादि शब्दांचा नीट विचार करावा. अुपलाणी घोडा म्हणजे ज्या घोड्यावर पलाण नाही तो; हाच 'अु' अुपसर्ग अुमाप आणि अुदण्ड या शब्दात आहे. जी गोष्ट तोलतां वा जोखतां येत नाही अितकी मोठी आहे तिला अुतोल वा अुजोख म्हटलें तर अु हा अुपसर्ग जिवन्त ठेविल्यासारखें नाही का होणार ! जोख हें नाम कोल्हापुरी बोलींत अगदी रूढ आहे. 'स्टेशन'ला 'टेशन' म्हणण्याचें प्रयोजन नाही. 'गाडीतळ' वा 'तळ' म्हणावें; अथवा, प्रवासी गाडीतून काही ठिकाणीं खाली अुतरावयाचा असतो म्हणून तो जर 'अुतारू', तर ज्या ठिकाणीं तो अुतरतो त्याला 'अुतार' का म्हणूं नये ! वाऱ्याने वा पाण्याने चालणाऱ्या यन्त्राला जर आपण पवनचक्की वा पाणचक्की म्हणतों तर 'ट्रेडल मशीन'ला, म्हणजे ज्या यन्त्राला गति पायाने रेटून देण्यात येते त्याला 'पायचक्की' सहज म्हणता येअील; मराठी शब्दसिद्धीचा मात्र जिवन्त अभ्यास हवा. 'थर्मामिटर' म्हणजे तरी काय गूढ आहे ! उष्णतामापन करण्याची, आंत पारा असलेली काचेची नळी, अितक्या गोष्टी ज्यांत सांगितल्या आहेत असा अेखादा बाणभट्टी समास निर्माण केला तर तो लोकांना पेलणार नाही. पण ताप पाहण्याची नळी ती 'तापनळी' असें म्हटलें तर हा शब्द 'थर्मामिटर'पेक्षा अधिक अुच्चारसुलभ नि सुबोध आहे हें भाषाशुद्धीच्या विरोधकांनाहि मान्य करावें लागेल. अशा सुटसुटीत सामासिक शब्दांप्रमाणेच प्राचीन मराठी प्रत्ययोपसर्गांचा अुपयोग करून किती तरी शब्द निर्माण करतां येतील ! तेव्हा 'रॉकेल' (Rock oil) हें जाळावयाचें

खनिज तेल जरी परदेशांतून येत असलें तरी तिळेल, खोबरेल, धुपेल, दिवेल यांच्या धर्तीवर 'खाणेल' हा शब्द निर्माण केला तर अेका मराठी शब्दाची भाषेंत भर पडेल इतकेंच नाही, तर 'अेल' हा प्रत्यय वापरून तितका जिवन्त ठेवल्याने पुढे असे शब्द सिद्ध करण्यास साह्य केल्यासारखें होअील. अच्छेर, अदमण, अदमुरें अित्यादि शब्दांत अद् या अुपसर्गांचा अर्थ अर्ध असा होतो. नवीन शब्द निर्माण करितांना याचा अुपयोग करून अद-की, अदखुळा, अदपट असें म्हणायला काय अडचण आहे ? स्वाभिमानपूर्वक स्वावलम्बनाने, स्वकष्टाने आपल्या नडी भागवायला शिकणें हें कठिण असलें तरी यांत जीवनतत्त्व आहे, भावी अुत्कर्षाचें बीज आहे. अुलटपक्षीं मोठेपणाच्या खोट्या कल्पनेने अुसनवारीवर स्वस्थ कालक्रमणा करणारे श्रीमन्त हे वस्तुतः अुलट्या अम्बारीचा काळ जवळ ओढून आणीत असतात. अर्थोत्पादनाची कला जाणणारा व्यापारी रीण काढतो खरा, पण तो रिणाची फेड करून वर स्वतःचा लाभ करून घेतो. त्याचें अुदाहरण जसें आळशी शेतधन्याला लागू नाही त्याचप्रमाणे अिङ्ग्रजी भाषेचें अुदाहरण मराठी भाषेला लागू पडत नाही. अिङ्ग्रजी भाषा सम्मिश्र आहे तर अिङ्ग्रजी समाजहि सम्मिश्र आहे. सदैव अेखाद्या परदेशाकडे पाहणारा आणि त्याच्याविषयी अभिमान ठेवणारा नि अितर देशबन्धूंशीं भिन्नभावाने वागणारा असा अेखादा वर्ग अिङ्ग्लण्डांत नाही. अिङ्ग्रजीचा अितिहास स्वतन्त्र अिङ्ग्रजांना भूषणावह असाच आहे. पारतन्त्र्यांतील मराठीचा अितिहास मराठी लोकांस दूषणावह होणार नाही अशी विशेष काळजी घ्यावयाची आहे.

परकीय शब्दांवर कडक बहिष्कार घातल्याविना स्वकीय मराठी शब्दांचें स्मरण होत नाही, अथवा अडचण भासून प्रत्ययोपसर्गांच्या साह्याने नवनव्या शब्दांची सिद्धि होत नाही, तर या बहिष्काराविना तरणोपाय नाही. या चळवळींत परकीयांचा द्वेष नाही, तर स्वकीयांविषयी तळमळणारें प्रेम आहे. घरच्या पोरांवर जातें चाटून पोट भरण्याचा प्रसङ्ग आला

असतांना अुपाध्यायाला सुद्धा पीठ घालूं नये असा जेथे गृहस्थाश्रमाचा धर्म आहे तेथे अितरांची काय कथा ! परक्यांच्यापैकी ज्यांची हिन्दुधर्मात येण्याची अिच्छा आहे त्यांना हिन्दुधर्मांत अवश्य घ्यावें, परन्तु तेवढ्याने हिन्दु बळाचा प्रश्न सुटत नाही; दुसऱ्या दिशेने, सामाजिक अन्यायांना कण्टाळून लोक बाहेर जावयाला प्रवृत्त होतात त्यांना तसें करण्याची पाळीच येअूं नये, अशा रीतीने काळजी घेणें अवश्य आहे. त्याचप्रमाणे स्वाभाविकपणें काही शब्द परभाषांतून मराठींत आले तर तें अिष्ट असलें तरी मराठींतील शब्द मागासून नष्ट होअूं नयेत याची काळजी आधी घ्यायला पाहिजे. ती घेतली जावी नि आमची मनोवृत्ति अस्वाभाविक आणि परघार्जिणी आहे ती सुधारावी, म्हणून तात्पुरती ही बहिष्काराची चळवळ आहे. भाषाशास्त्राला सोडून असें या चळवळींत काही नाही. भाषाशास्त्राचे नियम काही सृष्टींतील नियमांच्यासारखे देशकालभेदाबाधित नाहीत. सुसंस्कृत बहुसङ्ख्य लोकांच्या देशांत अेका अल्पसङ्ख्य वर्गाने आपली भाषा लादण्यांत थोडेंफार यश मिळवावें हें जर भाषाशास्त्राला सोडून होत नाही, तर बहुसङ्ख्य लोकांनी आपल्या सुसंस्कृत भाषेच्या संरक्षणासाठी अल्पसङ्ख्य लोकांच्या भाषेतील शब्दांच्या घातुक संसर्गापासून काही काल अलिप्त राहण्याचा प्रयत्न करावा, हें भाषाशास्त्रास सोडून कां व्हावें ! यांत कृत्रिम नि अशक्य काही नाही. जर्मन राष्ट्राने निश्चय केला तेव्हा ade आणि au revoir या फ्रेञ्च वाक्प्रचारांना गचाण्डी नाही मिळाली ! औफ् वीडर झेअेन auf wiederschen वा नुसतें वीडरझेअेन wiedersehen हें रूढ नाही झालें ? आम्ही सुशिक्षित लोक मराठींत आर्. एस्. व्ही. पी. म्हणत असलों तरी जर्मन लोक अु. आ. वे. गे (um Antwort wird gebeten चा सङ्क्षेप) हा वाक्प्रयोग वापरतात. कृ. क. अु. पा. (कृपा करून अुत्तर पाठवावें) असा अेखादा सङ्क्षेप मराठींत रूढ कां होअूं नये ! अुर्दू ही बहुजनसमाजाची जन्मभाषा नसून, ती राजभाषा आहे म्हणून कोट्यवधि रुपये व्ययित करून तिच्यांतूनच

शिक्षण देण्याचा हट्ट अेकीकडे चालला असतांना, आणि हिन्दुस्थानांत अितरत्र या कृत्याचें धर्मबांधवांकडून कौतुकच केलें जात असतांना, आम्ही मराठी भाषेच्या स्वत्वरक्षणाचाहि विचार करूं नये काय ? पडत्या काळांत देव-गिरीचें नांव तरी जिवन्त ठेवण्याची तळमळ आम्ही अहर्निश बाळगिली पाहिजे. प्रारब्धवाद, मायावाद हे आम्हीं टाकून देअून "यत्न तो देव जाणावा" या शिकवणुकींतिल अिङ्गित जाणिलें पाहिजे. "भाषेंतील काही शब्द नष्ट झाले म्हणून बिघडलें कोठे ?" असें पुसणाऱ्यांना असें विचारलें पाहिजे की, "आपणहि नष्ट झालांत म्हणून तरी काय बिघडणार आहे ? मग आपले क्षुद्र जीव जगविण्याची अितकी यातायात कां करतां ?" स्वतः धडाडीने काही करावयाचें नाही, आणि दुसरा काही प्रयत्न करील तेव्हा अचूक स्वातन्त्र्याची आठवण ठेअून त्याला अनुसरण्याचें टाळावयाचें, ही वृत्ति नवशुद्धलेखनाच्या अितिहासांत स्पष्ट दिसत आहे. भाषाशुद्धीस यश येणार नाही असें भाकित वर्तविण्यांत येतें; पण तसें झाल्यास त्यास कारण चळ-वळ अन्याय्य आहे हें नसून लोक अपात्र आहेत हें होअील. ही मनोवृत्ति पार पालटून टाकिली पाहिजे. म्हातारी मेल्याचें दुक्ख नाही, पण काळ सोका-वेल अशी जशी भीति वाटते तशी, काही परकीय शब्द मराठींत आल्याचें वैषम्य नाही, पण आमची ही गर्ह्य मनोवृत्ति बळावून सर्वनाश करील, ही भीति वाटते. म्हणून भाषेचा प्रश्न स्वावलम्बी, स्वाभिमानी, स्वकीयप्रेमी तत्त्वनिष्ठेनेच सोडवा, अशी आपणां सर्वांस माझी आग्रहाची विनन्ती आहे.

# ७ भाषाशुद्धिवाद्यांची भूमिका[1]

भाषा-शुद्धि हा आज मोठा वादग्रस्त प्रश्न होऊन बसला आहे. मी केवळ भाषाशुद्धिवाद्यांची भूमिका आपल्यापुढे माण्डणार आहें. मला फड मारायचा नाही. आपण शान्त मनाने या प्रश्नाचा विचार करावा अेवढीच माझी अिच्छा आहे. आरम्भीं थोडें वैयक्तिक स्पष्टीकरण केलें पाहिजे; म्हणजे वैयक्तिक टीका करून तात्त्विक पाडाव करूं पहाणाऱ्यांचा पक्ष लुला पडेल. भाषाशुद्धीची चळवळ शङ्कास्पद आहे असें दाखविण्यासाठी माझ्यावर विसङ्गतीचा नि धरसोडीचा आरोप करण्यांत येतो. ज्यांनी स्वतः फार्सी शब्दांची आपल्या कवितांतून पेरणी केली, त्यांनीच काही वर्षानन्तर भाषाशुद्धीचा प्रचार करून, फार्सी शब्दांच्या विरुद्ध चळवळ करावी हें त्यांच्या लहरी मनोवृत्तीचें लक्षण होय; अशा लोकांच्या मागे जाणें धोक्याचें आहे, असें माझ्याविषयी साङ्गण्यांत येतें. या आरोपांत सत्य नाही; सत्याभास आहे. मी जेव्हा पद्यरचना करूं लागलों, तेव्हा पद्याची भाषा कशी असावी याविषयी साम्प्रदायिक मताशीं माझा विरोध आला. 'पद्यरत्नावली'ला जोडलेल्या परिशिष्टांत 'मराठी कवितेंतील व्याकरणाचे विशेष' साङ्गतांना कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात की, ''गरज, हिम्मत, जलद, जरूर, सबब वगैरे फार्सी किंवा अरबी भाषेंतून आलेले शब्द मराठी जुन्या व प्रतिष्ठित कवितेंत प्रायः असत नाहीत.'' याचा अर्थ असा होऊं लागला होता की, काव्यांत असे अरबीफार्सी बीजाचे शब्द वापरल्याने काव्याची सरसता आणि प्रतिष्ठितपणा यांना बाध येतो; म्हणून तसें करणें गर्ह्य आहे. वस्तुतः

---

१ हें व्याख्यान पुणें येथील वसन्तव्याख्यानमालेंत ता. २७ अेप्रील १९३६ या दिवशीं गुम्फण्यांत आलें. अध्यक्षस्थानीं प्रा. वामन मल्हार जोशी होते.

काव्य म्हणजे भावस्पृष्ट मूर्त विचार होय. जें वाचलें असतां, मूर्तिमन्त प्रसङ्ग डोळ्यांपुढे अुभा राहून वृत्ति चलित होत नाही, तें काव्यच नव्हे. वाक्याचा वा वाक्यसमूहाचा साकल्याने विचार करून पहातां, जो शब्द असा परिणाम घडवून आणण्यास साहाय्यक होत नसेल त्याची त्या ठिकाणीं केलेली योजना अनुचित ठरेल. परन्तु काव्यानुकूलता याप्रमाणे परिणामावरून न ठरवितां जातीवरून ठरविणें, आणि केवळ जात फार्सी म्हणून काही शब्दांना भाषेंतून नव्हे, तर काव्याच्या प्रान्तांतून मात्र बहिष्कृत करणें हें काव्याविषयी विपरीत ग्रह करून देणारें आणि गद्यपद्यांतील अन्तर निष्कारण वाढविणारें आहे. या साम्प्रदायिक मताविरुद्ध मीं बण्ड केलें, आणि तें यशस्वीहि झालें. काव्यांत मी फार्सी शब्द वापरले तें फार्सी शब्द वापरल्याने विशेष रसनिष्पत्ति होते, आणि फार्सी शब्दांची मला विशेष मोहनी पडली होती म्हणून नव्हे; तर फार्सी शब्द वापरून रसहानि होत नाही हें सिद्ध करण्यासाठी होय. पुन्हा काव्यांतून मीं फार्सीच नव्हे, तर या साम्प्रदायिकांना रूक्ष नि त्याज्य वाटणाऱ्या अपभ्रष्ट नि अप्रचलित अशा मराठी शब्दांचाहि अुपयोग केला. ज्या कवितेंत हर्राजी हा फार्सी शब्द आहे, त्याच कवितेंत बुझावूं हा अप्रचलित मराठी शब्दहि आहे. 'बुझावूं शकेना विधाता तयाला' हा सुप्रसिद्ध चरण ज्याला ठाअूक आहे तो 'बुझावूं मी किती तूतें' या चरणार्धाला सहसा विरोध करीत नाही. परन्तु हर्राजी हा शब्द तत्क्षणीं डोळ्यावर आला. हा शब्द बडोद्याकडील मराठी बोलींत रूढ असल्याने स्वाभाविकपणें माझ्या हातून त्याची योजना झाली. फार्सीविषयीच्या प्रेमाने ती प्रवृत्त झालों असतों तर या अपभ्रष्ट रूपाची योजना न करितां 'हराज' हें शुद्ध रूप मीं योजिलें असतें. मी फार्सी शब्दांचें स्तोम माजविलें असा आरोप करणारे लोक मीं अेकन्दर किती फार्सी शब्द वापरले, माझ्या अेकन्दर शब्दसङ्ग्रहाशी त्यांचें प्रमाण काय पडतें, त्यांच्या मानाने 'मरीचिका'सारखे अप्रचलित पण शुद्ध संस्कृत शब्द आणि 'बुझावूं' सारखे अप्रचलित मराठी शब्द किती योजिले अित्यादि

गोष्टींचा विचार करीत नाहीत; कारण तसा विचार करणें त्यांना सोयीचें नसतें. माझ्या फार्सी शब्दांच्या सापेक्ष पुरस्काराच्या मुळाशीं फार्सीचें प्रेम नव्हतें, तर काव्यानुकूलतेविषयीची भ्रामक कल्पना दूर करण्याची अिच्छा होती.

ज्या शब्दाचे धागेदोरे वाङ्मयांतील वा अितिहासांतील संस्मरणीय व्यक्तींशीं निगडित झाले आहेत, असे सूचक शब्द वापरावे अशी माझी अिच्छा असल्याने केव्हा केव्हा फार्सी शब्द वापरावे लागत. जनकोजी शिन्दे या नवतरुण वीराच्या कामगिरीचें कौतुक बाळाजी बाजीराव पन्तप्रधान याने "शाबास तुमच्या हिमतीची व दिलेरी-रुस्तुमीची" अशा शब्दांनी केलें आहे. या उद्गारांतून मी रुस्तुमी हा शब्द उचलला. अशा शब्दांची योजना करण्याने मराठीच्या शब्दसम्पत्तींत भर पडते असे वरवर पाहतां प्रत्येकाला वाटतें. तसेंच मलाहि तेव्हा वाटलें.

या वेळीं देशभक्त विनायकराव सावरकर यांनी भाषाशुद्धीचा प्रश्न महाराष्ट्रापुढे माण्डला. अरबीफार्सी म्हणण्यापेक्षा अिस्लामी शब्दांवर कडक बहिष्कार घातला पाहिजे अशी त्यांनी घोषणा केली. त्यांच्या घोषणेला अुत्तर मीं विविध-ज्ञान-विस्तारांतून "मराठी भाषेवरील भयङ्कर सङ्कट" या लेखांत दिलें. मला त्यांची चळवळ मान्य होती, पण ती चळवळ अल्पसङ्ख्य अरबी-फार्सी शब्दांच्या विरुद्ध चालविण्यापेक्षा बहुसङ्ख्य अिङ्ग्रजी विरुद्ध चालविण्यांत यावी असा माझा आग्रह होता. माझी दुसरी मागणी अशी होती की भाषाशुद्धीच्या चळवळींत परकीयांच्या द्वेषापेक्षा स्वकीयांच्या प्रेमाला प्राधान्य दिलें पाहिजे. भाषाशुद्धीच्या चर्चेंत दृष्टि केवळ भाषिक असावी.

अिङ्ग्रजी शब्द कां वापरावयाचे नाहीत तर त्यांमुळे मराठी शब्दांचा तितका विसर पडतो आणि नवीन मराठी शब्द करण्याची सन्धि नाहीशी होते. परावलम्बन हें केव्हाहि अस्वाभाविक आणि घातुक असतें. लहान मूल सुद्धा जी गोष्ट त्याला स्वतःला करावीशी आणि करिता येअील अशी वाटते ती दुसऱ्याने केली तर चिडतें. स्वावलम्बी प्रयत्नांत मुलाला सुद्धा आनन्द वाटतो. उलटपक्षी परावलम्बी स्वास्थ्य हें वार्धक्याच्या, मृत्यूपूर्वीच्या

अवस्थेचें लक्षण आहे. परभाषेंतील पुढे पुढे करणाऱ्या शब्दाला अेकीकडे सारायचें असा निश्चय झाला म्हणजेच आपल्या भाषेंतील शब्दाची आठवण होअूं लागते; आणि भाषेंत योग्य शब्द विद्यमान नसल्यास नवीन शब्द निर्माण करण्याचा प्रयत्न होअूं लागतो. मिस्टिसिझम् हा शब्द वापरावयाचा नाही असें ठरविलें आणि स्वतन्त्रपणे विचार करून योग्य शब्द शोधायचा असें निश्चित केलें म्हणजेच भक्तिवाद हा शब्द सुचून अयोग्य वाटतो, गूढगुञ्जनाने समाधान होत नाही. व्यक्त करावयाच्या अर्थाची निरनिराळीं अङ्गें ध्यानांत येअून प्रतीतिवाद अित्यादि शब्द सुचतात. हे जे परिश्रम होतात, यांमुळे स्वतन्त्रता पोसली जाते आणि बुद्धीचें सामर्थ्य वाढतें. भाषेंतील शब्द नि प्रत्ययोपसर्ग जिवन्त रहातात. भाषेची सर्गशक्ति टिकून राहते; आणि शेवटीं आपण आपल्या श्रमांनी आपल्या नडी भागविल्या याचें अुच्च प्रकारचें समाधान लाभतें.

यांत काही कोणाचा द्वेष नाही. कोणाशीं वैर नाही, कोणावर आक्रमण नाही. ही दृष्टि सर्व भाषांनीं ठेवावी; यांत कोणाचेंहि अकल्याण नाही. या स्वाभिमानी स्वावलम्बनाचें, या स्वत्वसंरक्षणाच्या चळवळीचें कोणालाहि वैषम्य वाटूं नये. मी आपल्या घराचा सुरक्षितपणा वाढविला याचा जर कोणाला विषाद वाटला तर त्याच्या हेतूसम्बन्धी मात्र मी साशङ्क राहीन.

नेहमींच्या व्यवहारांतील शब्द सिद्ध करतांना अर्थासङ्गती शब्दाच्या सुटसुटीतपणाकडे नि सोपेपणाकडेहि लक्ष पुरवावें लागतें. 'सब्मरीन'ला समुद्रान्तः सञ्चारिणी नौका असें क्लिष्ट नाव ठेवण्यापेक्षा, ज्यामुळें अर्थ अधिक सोपा नि अुच्चार सुटसुटित होअील असा 'पाणबुडी' हा शब्द चाङ्गला आहे हें कोणीहि मान्य करील. आगगाडी ही जरी वाफेने चालते तरी पुढे आग दिसते नि मागे गाडी चालते असें असल्यामुळे आगगाडी हा सोपा नि सुटसुटीत शब्द रूढ झाला. त्याप्रमाणे विजेच्या हात-दिव्याला 'अिलेक्ट्रिक टॉर्च' म्हणण्यापेक्षा विजेची दिवटी वा नुसतें दिवटी म्हटल्याने अर्थबोध होअील. विजेची मशाल हा शब्दप्रयोग मात्र हास्यास्पद होअील.

केवळ भाषिक दृष्टीने या प्रश्नाचा मी असा विचार करीत असतांना मला मराठी भाषेच्या विशिष्ट परिस्थितीची—मराठी लोकांची भाषाविषयक मनोवृत्ति आणि अितर लोकांची भाषाविषयक मनोवृत्ति यांच्यामधील भेदाची—तीव्र जाणीव झाली, आणि बहिष्कार्य शब्दांच्या वर्गात अरबीफार्सी शब्दांचाहि समावेश करण्याची निकड भासूं लागली. अरबीफार्सी शब्द तरी भाषेंत कसे आले आणि रूढ कसे झाले हा प्रश्न काही गौण महत्त्वाचा नाही. "शाबास तुमच्या दिलेरी रुस्तुमीची" असें जेव्हा बाळाजी बाजीराव म्हणतो तेव्हा त्याला मराठी शब्दांनी व्यक्त होअूंच शकत नाही असा काही नवीन अर्थ व्यक्त करावयाचा असतो काय ! धैर्य, शौर्य या गोष्टी अिराणांतून नव्यानेच हिन्दुस्थानात आल्या होत्या काय ! धैर्य, शौर्य या शब्दांचें विस्मरण कां झालें ! या शब्दांचा अुच्चार करणें म्हणजे राजद्रोह होय असा काही दण्डक पूर्वी कधी काळीं महाराष्ट्रावर लादण्यांत आला होता काय ! काही थोडे शब्द दळणवळणासारख्या स्वाभाविक मार्गाने मराठींत आले असतील; परन्तु बहुतेक अरबीफार्सी शब्द हे मराठी लोकांच्या विशिष्ट मनोवृत्तीमुळेच घुसले, बळावले आणि धनी होऊन बसले !

ही आमची मनोवृत्ति कशी आहे ! आम्ही राष्ट्रीयदृष्ट्या अुदासीन नि अजागरूक आहों. कोठे अन्याय झाला तर तो जोपर्यन्त घराला, नव्हे अन्तःपुराला येअून भिडत नाही तोंपर्यन्त तो अन्याय आहे, त्याचा वेळींच प्रतिकार करायला पाहिजे, असें आम्हांला वाटत नाही. घराला आग लागल्यावर आम्ही खडबडून जागून थोडी धावपळ करतों, मग त्या धावपळीचा यत्किञ्चित् अुपयोग होत नाही. अितरांची जी स्थिति आजची, तीच माझी अुद्याची असें समजून त्यांच्या साहाय्याला वेळींच धावून जाण्याचें आमच्या मनांत येत नाही आणि अनिष्ट अशी क्रान्ति सहज होअून जाते. परकीयांचा द्वेष करण्याचें यत्किञ्चित् कारण नाही; पण परकीयांच्यापेक्षा स्वकीय जवळचे वाटले पाहिजेत, त्यांच्यावर

अधिक प्रेम करावयाला पाहिजे, याविषयी तर वाद नाही ना ! पण आम्हांला स्वकीयांवरच प्रेम करण्याची चोरी वाटते. अेक बडे स्वास्थ्यवन्त आहेत; त्यांनी आपल्या अधिकार-कालांत स्वजातीचा अेकहि माणूस वृत्तीला लावला नाही यांचेंच ते भूषण मानतात ! मी त्यांना म्हणतों की धन्य आहे तुमची ! मी पक्षपाती नाही हें दाखविण्यासाठी आपल्या जातींतील सत्पात्र व्यक्तींना धुडकावून लावून परकीयाना जवळ करणें हा का न्याय ! हें का औदार्य ? ही का राष्ट्रीय वृत्ति ! वस्तुतः हा निवळ स्वार्थ असतो. परकीयांची भीति वाटते ती आम्हांला लपवावीशी वाटते; म्हणून आम्ही मोहक युक्तिवाद लढवितों की, झालें गेलें तें आतां पवित्र झालें. समाजांत खालच्या थरापर्यन्त पोचलें. आता अुलथापालथ कशाला ? का कोणाच्या म्हणजे परकीयांच्या भावना दुखवा ? जे आम्ही स्वकीयाच्या भावना म्हणजे बेण्डें होत म्हणून तीं मुळापासून कापून काढिलीं पाहिजेत असें छाती-ठोकपणाने म्हणतों, तेच आम्ही परकीयाच्या भावनांना हळुवारपणाने सुद्धा हात लावायला भितों.

पूर्वीच्या अैतिहासिक काळांत मन्दिरें अुध्वस्त करण्यांत येअून त्याच सामग्रीने मशिदी बान्धण्यात आल्या, त्याचप्रमाणे गांवांच्या मराठी नावाचें इस्लामीकरण करण्यांत आलें; आणि आम्ही अद्यापि तें चालूं ठेवलें. 'देवगिरी'ची दौलताबाद झाली ! सिंहगडासही बक्षन्दाबक्ष हें नाव देण्यांत आलें होतें. पण तें रूढ झालें नसलें, तरी साताऱ्याच्या माथ्यावर 'आज-मतारा' बसलाच. देवगिरीची दौलताबाद करून टाकिली, दौलताबादेची पुन्हा देवगिरी करण्याची कल्पना सुद्धा आम्हाला भयावह वाटते. या वृत्ती-मुळे होअून गेलेली अनिष्ट क्रान्तिहि स्थायी होते. आपल्या मनोवृत्तीचा तिसरा विशेष म्हटला म्हणजे आम्ही परकी गोष्टीवर सहज भाळतों; आणि नाही त्या सद्गुणाचा त्या गोष्टींवर आरोप करितों. मग अर्थातच होअून गेलेल्या अनिष्ट क्रान्तीचें समर्थन करणारे लोक आमच्यांतच निघतात. पन्त-प्रधानांच्या राजवटींत तुळाजी आङ्ग्रे याचें पत्र आदर्शभूत वाटलें नाही, तर

नानाफडणवीसाचें अेक पत्र आदर्शभूत वाटलें. त्यांत फार्सीशब्दप्राचुर्यापलीकडे काही नाही. पन्तप्रधानापेक्षा पेशवा हा शब्द रूढ झाला! पन्तप्रधानांच्या चालत्या काळांत, महाराष्ट्रांत सत्ता गाजविणारा सलाबतजङ्ग हा भवानराव पन्तप्रतिनिधींचें पत्र हिन्दवी म्हणून हातीं धरीत नाही, आणि यांत अपमानास्पद, अस्वाभाविक असें काहीच न मानणारा नारो महादेव त्याचें फार्सी भाषान्तर करून तें प्रविष्ट करितो, हा देखावा चिन्त्य आहे. मराठी राजवटींत सुद्धा अरबी-फार्सी पदव्यांची, शब्दांची मोहनी नष्ट झाली नव्हती. मराठी राजकर्त्यांना मराठी भाषेचें महाराष्ट्रीय महत्त्व कधींच जाणवलें नाही.

अशा अस्वभाविक नव्हे, तर विपर्यस्त परिस्थितींत, जे अरबीफार्सी शब्द मराठींत आले, ते विधिपूर्वक पङ्क्तिपावन होअून आले नि हिन्दवी स्वराज्यांत त्यांचें हिन्दवीकरण झालें, असें म्हणणें धादान्त चुकीचें आहे. आपली मनोवृत्ति जर स्वाभाविक असती तर ही क्रान्ति घडूनच आली नसती. झालेली चूक निस्तरल्याविना आपली मनोवृत्ति आता स्वाभाविक झाली आहे असें आपणांला कधीहि सिद्ध करितां येणार नाही. म्हणून अिङ्ग्रजी शब्दांच्या सङ्गतीं अरबीफार्सी शब्दांनाहि बहिष्कृत करायला हवें.

हिन्दुस्थानांत अितरत्र काय चाललें आहे या गोष्टीकडेहि दुर्लक्ष करून चालणार नाही. कारण, अितरत्र होणाऱ्या चळवळींचा मराठीच्या भवितव्यावर परिणाम झाल्याविना रहाणार नाही. मी बङ्गाली असतों तर बङ्गाली भाषेविषयी बोलताना फार्सी शब्दाच्या विरुद्ध चळवळ मी कधीहि केली नसती; कारण, बङ्गाल प्रान्तांत हिन्दुमुसल्मान दोघेहि बङ्गाली भाषेला मातृभाषा मानून तिची सेवा करीत असल्याने त्या प्रान्तांत भाषाविषयक द्वैत नाही; म्हणूनच सर अब्दुर्रहीम यांनी अलीगडाविद्यापीठांत दिलेलें कुप्रसिद्ध व्याख्यान बङ्गाल प्रान्तांत फोल झालें. गुजराथेंत निराळा बनाव बनला. अुर्दू बोलीचा जन्म छावणींत स्वाभाविकपणें व्रज नि फार्सी या भाषांच्यापासून झाला असला, तरी ती प्रगल्भ होअूं लागली तेव्हा तिला जें वळण देण्यांत आलें, तें हिन्दुस्थानांतील बहुसङ्ख्य लोकांशी

अविश्वासाने पाठमोरे होअून, अिराणअरबस्थानाकडे आपुलकीची दृष्टि लावून देण्यांत आलें. हिन्दुस्थानांत कोठेहि जा! भाषा आर्य असोत वा द्राविड असोत, नेहमीच्या व्यवहारापलीकडील गोष्टी व्यक्त करायला लागणारे शब्द संस्कृत आहेत. तेच पेशावरापासून रामेश्वरापर्यन्त समजतात असें असतांना अुर्दू भाषेंत अरबीफार्सीचें प्राबल्य माजविण्यांत आलें, या गोष्टीचा हिन्दुस्थानांतील अितर भाषांनी मुळीच विचार करूं नये काय! सिन्धी बोली मूळची आर्य आहे. लेखणीच्या एका फटकाऱ्याने तिला अेका अधिकाऱ्याने अरबी लिपी दिली. पुढे सिन्धांत बहुसङ्ख्य मुसल्मान लोक आहेत, म्हणून परिभाषा ही फार्सी शब्दांच्याच साहाय्याने सिद्ध केली पाहिजे अशी राजाज्ञा झाली! म्हणजे ज्या दिशेने अुर्दू भाषेची वाढ झाली तीच दिशा सिन्धीच्या प्रगतीसाठी बळें निश्चित करण्यांत आली! असें असूनहि अुर्दू भाषा हीच अखिल हिन्दुस्थानची भाषा व्हावयास पात्र आहे असा आग्रह धरण्यांत येत असतो. जी राजभाषा एक दशांश प्रजेचीच मातृभाषा आहे, तिच्यांतून सारें शिक्षण देण्याचा अुस्मानिया विद्यापीठाकडून अुद्योग चालू आहे; आणि सर रॉस महमूद सारखे शिक्षणाधिकारी, हा प्रयोग देशी भाषेच्या अुन्नतीचा असल्याने अिङ्ग्रज सरकारने यापासून धडा घ्यावा असा अुपदेश करीत आहेत! अल्पसङ्ख्याक राजकर्त्यांची जी राजभाषा, ती जर देशभाषा समजावयाची, तर अिङ्ग्रजीला देशभाषा गणायला आणि ऑक्स्फर्ड, केम्ब्रिज येथील विद्यापीठांना स्वदेशी गणायला प्रत्यवाय आहेच कोठे! अेवढ्यावरहि हें प्रकरण थाम्बत नाही. प्रान्ताच्या भाषेला मातृभाषा मानायची नसेल तर नका मानूं. आपल्या मार्गाने जा आणि अुन्नति करून घ्या. परन्तु आम्ही आमच्या मार्गाने जात असतांना मराठी भाषेचें स्वरूप कसें असावें याचा विचार करूं लागलों आणि मराठींतून अिङ्ग्रजी शब्दांच्या सङ्गती फार्सी शब्दांचें अुच्चाटन करणें भाषिक दृष्ट्या आम्हांला अिष्ट वाटलें, तर "हां थाम्बा! आमचे फार्सी-अरबी शब्द तुम्ही तुमच्या मराठी भाषेंतून काढण्याचा प्रयत्न कराल, तर तुमचें

आमचें सख्य नष्ट होअील" अशी धमकी आम्हांला देण्यांत येते ! अशा दुराग्रहामुळे जे शब्द आज केवळ भाषिक दृष्ट्या त्याज्य वाटत आहेत, ते आणखीहि काही दृष्टींनी त्याज्य वाटूं लागतील.

मराठी भाषा ही केवळ हिन्दूंचीच आहे असें मुळीच नाही. ज्याला ज्याला मराठी ही मातृभाषा आणि मराठी भाषा बोलणारे लोक हे आपले लोक असें वाटतें, तो जैन असो, लिङ्गाअीत असो, खिस्ती असो, मुसल्मान असो, त्याला मराठी भाषेची सेवा करण्याचा आणि मराठीचें स्वरूप कसें असावें हें ठरविण्याचा अधिकार आहे. अितरांना मात्र हा अधिकार मुळीच नाही, हें स्पष्टपणाने बजाविलें पाहिजे.

बेल्जममधील फ्लेमिश प्रान्तांतील लोक फ्लेमिश भाषेला त्या प्रान्तांत योग्य अधिकार मिळवून देण्यासाठी जशी सुसङ्घटित आणि निकराची चळवळ करीत आहेत, तशी चळवळ मराठी प्रान्तांत मराठीसाठी केल्यावाचून मराठीची धडगत नाही. फ्लेमिश विद्यापीठ अितरत्र न स्वीकारतां फ्लेमिश लोकानी चळवळ करून आता घेण्ट येथील प्राचीन फ्रेञ्च विद्यापीठाचेंच फ्लेमिशीकरण करून घेतलें आहे !

मराठी भाषेंतील शब्दसम्पत्तीला जपणें हें मराठी लोकांचें आद्यकर्तव्य आहे; मराठी शब्दाचा विसर पाडणाऱ्या परकीय शब्दांस साक्षेपाने दूर ठेविल्याविना हें कार्य होणार नाही. आपल्या नडी आपण स्वतः कष्टून भागविल्यानेच भाषेची सर्गशक्ति जिवन्त रहाणार आहे. स्वाभिमानी स्वावलम्बनानेच स्वत्वरक्षण होणार आहे. अितरांच्यावर न विसम्बतां प्रेमाने अेकत्र येअून तत्वनिष्ठेने सुसङ्घटित कष्ट करण्यांत भावी अुत्कर्षाचें बीज आहे.

# ८ भाषाशुद्धीचें माहात्म्य[1]

महाराष्ट्र-साहित्य-सम्मेलनाच्या अध्यक्षपदासाठी मला निवडून आपण जो माझा बहुमान केला आहे, त्याकरिता मी आपले साभिवन्दन आभार मानतों. मी लोकप्रेमी असल्याने लोकांनी बहुमताने दिलेला मान मला विशेष महत्त्वाचा वाटतो. लोकसमाज हा आपल्या प्रसादाचे वा रोषाचे विषय निवडण्यांत व्यक्तीअितकाच लहरी असूं शकतो, हें मला ठाअूक नाही असें नाही. दोन्ही प्रकारचा प्रत्यक्ष अनुभव मी घेतलेला आहे. परन्तु अेकन्दरीने विचार करितां लोकसमाज हा मला व्यक्तीहून केव्हाहि अधिक विश्वसनीय वाटतो. तथापि प्रस्तुत प्रसङ्गीं, वयाने, ज्ञानाने नि वाङ्मय-तपाने माझ्याहून श्रेष्ठ असल्यामुळे श्री. लक्ष्मणराव पाङ्गारकरांप्रमाणे जे जे या अध्यक्षपदाच्या मानाला अधिक पात्र आहेत त्यांचें मला स्मरण झाल्या-वाचून रहात नाही. या बहुमानाचें श्रेय माझ्या पात्रतेपेक्षा आपल्या माझ्यावरील प्रेमालाच अधिक आहे असें मला वाटतें. हा बहुमान स्वीकार-ण्यास मला आनन्दाअितकाच सङ्कोचहि वाटतो. म्हणून बहुमान तेवढा मी मनाने त्या महानुभावांकडे पावता करून आपल्या कार्याला आरम्भ करितों.

ज्या अनेक धाग्यांनी आपण नि मी अेकत्र बान्धले गेलों आहों, त्यां पैकी मराठी भाषा हा अेक महत्त्वाचा धागा आहे. या सम्बन्धाचा जिव्हाळा नि महत्त्व हीं सहज पटत नाहीत, तीं प्रसङ्गविशेषेंच मनावर ठसतात. बारा वर्षांपूर्वी जेव्हा अुदरभरणासाठी पुणें सोडून अिकडे खानदेशात मला यावें लागलें, तेव्हा आपण घर सोडून घराबाहेर कोठे तरी जात आहों या

---

१ हें अध्यक्षीय भाषण जळगाव येथे भरलेल्या २१ व्या महाराष्ट्र-साहित्य-सम्मेल-नांतील स्वागताध्यक्ष आणि महाराष्ट्रीय बन्धुभगिनींना सम्बोधून ता. १२ नोवेम्बर १९३६ या दिवशी करण्यांत आले होतें.

भावनेने मन फार अस्वस्थ झालें होतें. खानदेश महाराष्ट्रांतच असला तरी नामाँने निराळा आहे, आणि भूगोलाचें पुस्तक वाचणें नि देश प्रत्यक्ष पाहणें यांत महदन्तर असतें, म्हणून माझ्या मनाची अशी अवस्था झाली. पण याच जळगांवीं आगगाडींतून मी धक्क्यावर अुतरलों आणि काही शेतकऱ्यांच्या बायका माझ्या दृष्टीस पडल्या. त्यांची ती थोडी निराळी पण कुणबाअू मराठीच अशी बोली माझ्या कानांवर पडली मात्र, माझा विषाद पार मावळला. येथे मी माझ्या मायदेशांतच नव्हे तर अगदी घरींच आहें, हें मनास पटून तेव्हा जें विलक्षण समाधान वाटलें, तें मी जन्मांत विसरणार नाही. मायबोलीचा प्रभाव, मायबोलीचा जिव्हाळा हा असा आहे.

धर्मनिष्ठा, भाषाप्रेम आणि देशभक्ति हीं मिळून अेखाद्या लोकसमाजाच्या, अेखाद्या राष्ट्राच्या अैक्याची त्रिवेणी वहात राहते. यांपैकी धर्मनिष्ठेचा प्रवाह तेवढा लोकांना अुणेंअधिक स्पष्टपणें वाहतांना दिसतो; आणि त्याचाच प्रभाव त्यांना विशेष जाणवतो. "स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ।" ही शिकवणूक सामान्य जनांनाहि तत्काळ पटते. वस्तुतः स्वभाषाभक्ति नि स्वदेशभक्ति हीं स्वधर्माचींच अङ्गें आहेत. पण आता काही सुशिक्षित लोकांना धर्म या शब्दाची सुद्धा घाण येअूं लागली आहे. आपण धर्मातीत आहों म्हणून मिरवणें हें पुढारलेपणाचें नि टुमदारपणाचें लक्षण होअूं पहात आहे. तथापि धर्माचें मर्म जो ध्यानांत घेअील त्याला वेळोवेळीं देहान्तर करणाऱ्या आत्म्याप्रमाणे धर्म हा सनातन आहे, हें पटल्याविना रहाणार नाही. धर्मविषयक कल्पना नि समजुती या सनातन आहेत असें नव्हे, पण धर्मविषयक वृत्ति ही सनातन आहे. नास्तिक मनुष्य सुद्धा धर्मात्मा असूं शकतो; जैन आणि बौद्ध हे लोक निरीश्वरवादीच आहेत. खिस्ती धर्माचाच नव्हे, तर धर्म या संस्थेचाच अुच्छेद करण्यास सज्ज झालेले रशिया देशांतील समाजसत्तावादी क्रान्तिकारक, हेहि धार्मिकच नव्हे तर अगदी धर्मवेडे आहेत ! त्यांचीं साधनें आक्षेपार्ह वाटतील; पण त्यांचें ध्येय स्वीकरणीयच आहे. जाज्वल्य तत्त्वनिष्ठा आणि अलौकिक स्वार्थत्याग

या गुणांसङ्गतींच त्यांच्यांत कडवी असहिष्णुताहि आढळते. अेखाद्या सङ्कुचित लहान वर्गाचें वा समाजाचें हित साधणें हें त्यांचें ध्येय नसून, कृत्रिम भेद नष्ट करून अेका मोठ्या समाजांतील सर्व व्यक्तींना, किम्बहुना यच्चयावत् मनुष्यजातीला सुखी करण्यासाठी ते झगडत आहेत. धर्म-संस्थापना तरी निराळ्या कशासाठी असते! मनुष्याने स्वार्थाच्या प्रेरणेने केलेले भेदभाव नि दण्डक मोडून टाकून, मनुष्यप्राण्यांचें मूलभूत साम्य आणि समता हीं ध्यानांत घेअून, जीं तत्त्वें आचरणांत आणिल्याने व्यक्तीचीच नव्हे, तर समष्टीची धारणा आणि अभ्युन्नति होतील असें वाटतें, त्या तत्त्वांवर अढळ श्रद्धा ठेवून वैयक्तिक कष्टांची, आपदांची वा मृत्यूचीहि चिन्ता न करतां, अेक प्रकारच्या गूढ आणि श्रेष्ठ आत्मसमाधानासाठी तीं तत्त्वें आचरणात आणून, देह 'चन्दनाचे परी' झिजविणें यापरता दुसरा धर्म नाही. धर्म हा व्यक्तीची वैयक्तिक स्वार्थावरील दृष्टि काढून ती लोक-हितावर स्थिर करितो; आणि तिच्या अङ्गांत अेका व्यापक पराक्रमाची प्रेरणा करितो. आता कालान्तराने मानवी स्वभावाच्या अुपजत स्वार्थ-परायणतेमुळे अितर मानवी संस्थांप्रमाणे धर्माचेंहि शुद्ध स्वरूप लोपून तो विपर्यस्त होतो, ही गोष्ट निराळी! अशी गत होते म्हणूनच तर वेळोवेळीं, 'युगे युगे', धर्मसंस्थापना करण्याची निकड लागते.

हें सारें साङ्गण्याचा हेतु अितकाच की, धर्म हा शब्द कानीं पडतांच नवमतवाद्यांनी बिचकून जाअूं नये आणि सनातन्यांनी हुरळून जाअूं नये. धर्माचें मर्म ध्यानांत धरून आपल्याला वाङ्मयाचा नि भाषेचा विचार केला पाहिजे. दुर्दैवाने आम्हां हिन्दूंची धार्मिक दृष्टि सुद्धा विकृत झाली आहे. व्यावहारिक स्वार्थाचा सङ्कोच कोठे कोठे दिसत असला, तरी बहुजन-समाजाविषयी समानतेची दृष्टि नि अन्तरींची प्रीति ह्या दिसत नाहीत. भूत-दयेला आम्ही सन्तांचें भाण्डवल समजतों. या भूतदयेंत आत्मप्रौढीची छटा दिसते ती नसावी. आमचें धार्मिक जीवन साङ्घिक न होतां वैयक्तिक होतें, स्वाभाविकपणेंच आम्ही संहति-सामर्थ्याला आचवतों आणि कार्य-

नाश होतो. वैयक्तिक मुक्तीसाठी तेवढी आमची थोडीफार धडपड चालते: स्वाभाविकपणेंच राष्ट्रीय मुक्तीला आम्ही दुरावतों. स्वाभिमानाप्रमाणे धर्मनिष्ठा ही व्यक्तीपुरती सङ्कुचित झाल्याने तत्त्वनिष्ठा दुर्बल होअून, पावेल त्याला भजण्याच्या मोहाला सुज्ञहि बळी पडतात. सार्वजनिक सङ्कटांची चिन्ताच वाटत नाहीशी होते. वैयक्तिक अुत्कर्ष केव्हा केव्हा झाला तरी सार्वजनिक अपकर्ष होतो तो ध्यानांत येत नाही.

येथे मला मीं पाहिलेल्या अेका दृश्याची आठवण होते. कोल्हापुराहून मोटारीच्या सडकेने आपण पुण्याकडे येअूं लागलों की अिस्लामपुराच्या पलीकडे ओढ्याच्या काठीं वसलेलें अेक खेडें लागतें. सडकेला लागून बान्धलेली अेक मशीद आहे. केव्हाहि पहा, वेळोवेळीं चुन्याने सारविल्यामुळे ती कशी अुजळ दिसते! तिच्या पलीकडे जवळच अेक देवालय आहे. तें प्राचीनतर आहे हें अुघड दिसतें. आता तें जीर्ण आणि मलिन दिसत असलें, तरी त्याची बान्धणी बळकट नि सुबक आहे. देवपूजेला पुजारी असेलच; आणि देवपूजेची व्यवस्थाहि ज्याने अितका पैका व्यायित करून तें मन्दिर बान्धिलें त्याने करून ठेविली असेल. प्रसङ्गविशेषीं हिन्दु गांवकरी दर्शनाला जात असतील. पण मुसल्मानाना आपल्या मशिदीविषयी जो आपलेपणा वाटतो, तो हिन्दु गांवकऱ्यांना आपल्या देवळाविषयी वाटत नाही, म्हणूनच दोन्ही देवळांच्या बाह्य रूपांत अन्तर दिसतें. कारण, तें देअूळ काही बहुजनसमाजाने बहुजनसमाजासाठी आणि बहुजन समाजाच्या स्वामित्वाचें असें बान्धिलेलें नाही! हीं दोन पूजास्थानें मला साङ्घिक आणि वैयक्तिक धर्मभावनांचीं, आणि त्यांच्या परिणामांची प्रतीकें वाटतात.

अितर लोक आम्हांला अेक समजून हिन्दु म्हणतात, म्हणून आम्हीहि आता आम्हांला अेक समजून हिन्दु म्हणवून घेअूं लागलों आहों. नाहीतर साम्यापेक्षा भेदच आमच्या डोळ्यात चटकन भरतात, आणि आम्ही आमची आपुलीक तत्काळ अेखाद्या पन्थापुरती या जातीपुरती वा पोट-

जातीपुरती मर्यादित करितों. अितरांनी नकाशावर रेघा काढल्या की, तेव-ढ्याने आम्ही द्विधाच काय पण शतधा होअून पुणेरी, खानदेशी, वऱ्हाडी नागपुरी, याप्रमाणे नांवें घेअून अेकमेकांपासून फुटून स्वतः क्षीण होतों आणि अितरांचें प्राबल्य साधतों. असे आम्ही आत्मघातकी नि परघा-र्जिणे आहों !

आमची धर्मबुद्धि शुद्ध आणि व्यापक जरी राहिली नसली, तरी सुदै-वाने अद्यापि तिच्यांत धुगधुगी आहे. पुण्याच्या लालुचीने का होअीना, पण लोक फूल नाही, फुलाची पाकळी अर्पण करण्यापुरते स्वार्थत्यागास प्रवर्त-तात. भाषेचें तसें महत्त्व सुशिक्षितहि जाणत नाहीत; मग अशिक्षितांची गोष्टच काढावयाला नको. अेखादी भाषा जर धर्मग्रन्थाचीहि असेल तर तिचा थोडा पुरस्कार धर्म्य कर्म म्हणून होतो. यासाठीच पूर्वी आपल्या मराठी राज्यांत, त्या काळीं ब्राह्मण हेच वैदिक धर्माचे आणि गीर्वाण-भाषेचे आधारस्तम्भ होते, म्हणून त्यांची दक्षिणेने सम्भावना करण्यांत येअी. परन्तु हें दाक्षिण्य दाक्षिणात्यांच्या मायबोलीविषयी, मराठीविषयी प्रकट झालें नाही. धर्माचें मर्म जर आपण जाणलें, तर "भाषेची[१] अभिवृद्धि ही देशा-च्या अुत्कर्षाचें अेक मोठेंच साधन असून तें प्रयत्नाधीनहि बरेंच आहे", हें आपणांला पटेल आणि आपण स्वभाषेची सेवा धर्मनिष्ठेच्या प्रचण्ड अुत्सा-हाने करावयाला लागूं. धर्माची सङ्कुचित दृष्टि मात्र कामाची नाही.

धर्म, भाषा आणि देश हीं अेखाद्या समाजाच्या साधर्म्याचीं आणि अैक्याचीं द्योतकें आहेत. त्यांच्या मर्यादा अेका काळीं जरी अभिन्न असल्या आणि तसें असणें हें अैक्याच्या दृष्टीने जरी अिष्ट असलें, तरी त्या कालान्तरा ने अपरिहार्यपणें भिन्न भिन्न होतात. बौद्धधर्म, खिस्तीधर्म आणि महम्मदी धर्म हे आज अनेक देश व्यापून राहिले आहेत; अुलट, हिन्दुस्थानासार-ख्या अेका देशांत अनेक धर्म नान्दत आहेत. भाषांच्या विस्तारांतहि हाच प्रकार आढळतो. अिङ्ग्रजी भाषा ही राजकीयदृष्ट्या स्वतन्त्र, अलग अशा

१ निबन्धमाला (चि. शा. छा.) पृ. १.

अनेक देशांची भाषा होअून बसली आहे. तर अुलट, हिन्दुस्थानासारख्या जित देशांत राज्यकर्त्यांच्या अिङ्ग्रजी भाषेव्यतिरिक्त अनेक देशी भाषा चालू आहेत; आणि पुन्हा धर्मभाषा वा पन्थभाषा म्हणून संस्कृत, प्राकृत, अरबी अित्यादि भाषांनाहि थोडेंफार महत्त्व आहेच. अशा स्थितींत व्यक्तीने आपली निष्ठा कशी ठेवावयाची हा प्रश्न बिकट होअून बसतो.

धर्मांचें मर्म ओळखून चाललों तर हा प्रश्न बिकट वाटणार नाही. सर्वत्र चालू असलेल्या जीवनकलहांत, या कलियुगांत जर जिवन्त रहावयाचें असेल तर संहतीविना कार्यसिद्धि होणार नाही. सङ्घाला आपल्या अैक्याची सतत जाणीव रहावी आणि तो कार्यक्षम रहावा अशी जर अिच्छा असेल तर तो सङ्घ जसा फार लहान असून चालणार नाही तसा अफाट असूनहि भागणार नाही. सङ्घ अफाट असला म्हणजे तो विस्कळित होतो; व्यक्तींना सार्वजनिक चिन्ता वाटत नाही; आणि माणसें सुरक्षितपणाच्या सुखस्वप्नांत मग्न रहातात. अेखादा धर्म जेव्हा अनेक देशांत पसरतो, तेव्हा या निरनिराळ्या देशांत अेकमेकांविषयी धर्मबन्धुत्वामुळे साहजिकच जरी थोडीफार सहानुभुति वाटली, तरी व्यावहारिक हितसम्बन्धापुढे ती बहुश: लटकी पडते. ज्या कारणाने बन्धुत्वाचें भाअूबन्दकींत पर्यवसान होतें, त्याच कारणाने धर्मबन्धुत्वाचेंहि राष्ट्रीय वैरांत पर्यवसान होअूं शकतें. व्यवहार हा अशा प्रकारें प्रभावी असल्याकारणाने, जेथे ह्या देशांत अनेक धर्म आणि भाषा चालू आहेत, तेथे व्यक्तीने वा व्यक्तींच्या लहानलहान सङ्घाने सङ्कुचित धर्माभिमान नि भाषाभिमान सोडावा, आणि देशांतील राष्ट्रैक्यावर दृष्टि ठेवावी, हेंच अुचित आहे. राष्ट्रासारखा मोठा सङ्घ जिवन्त रहावा, त्याचा साक्षात् अभ्युदय व्हावा, यासाठी परदेशांतील सधर्मीयाला वा सभाषिकाला कोणी स्वदेशांतील परधर्मीयापेक्षा वा परभाषिकापेक्षा केव्हाहि जवळचा मानतां कामा नये, हेंच खरा धर्म साङ्गतो. या सद्धर्मदृष्टीने पाहिलें तर सर मुहम्मद अिक्बाल यांना सर अक्बर हैदरी हे भाअी परमानन्दांहून थोडे अधिक जवळचे वाटले तरी चालेल; पण त्यांना

काबुलचा राजा हा सर रामस्वामी अय्यराहून वा डॉ. अम्बेडकराहून अधिक जवळचा वाटतां कामा नये. स्वदेशप्रेम हा धर्मश्रद्धेचाच अेक प्रकार आहे, अशा अर्थाचें "हुब्बुल्वतन् मिनल्ओीमान्" म्हणून जें अरबी धर्मवचन आहे, तें याहून निराळें काही साङ्गत नाही. हिन्दुस्थानाबाहेर हिन्दु धर्म वा अेखादी हिन्दु भाषा जवळजवळ नसल्याचमुळे हिन्दु मनुष्यांची सहानुभूति हिन्दुस्थानाबाहेर जाअू शकत नाही. त्यांची दृष्टि अितकी सङ्कुचित आहे की, ती जातीय वा प्रान्तिक जरी झाली तरी ती अेक मोठी प्रगतिच होणार आहे. अुलटपक्षीं, दुर्दैवाने असा अेक समाज हिन्दुस्थानांत आहे की, त्याला हिन्दुस्थान ही आपली केवळ भोगभूमि वाटते, आपल्या हिन्दु देशबान्धवांचा मानभङ्ग करण्यांत आणि वेळींअवेळीं आपली सहानुभूति परस्थ सधर्मीयांच्या चरणीं वाहण्यांत अिहलोकींची अितिकर्तव्यता वाटते. त्यांच्या सहानुभूतीचा स्वदेशाबाहेर सङ्कोच आणि स्वदेशांत प्रसार होण्यानेच राष्ट्रीय अैक्याचा प्रश्न सुटणार आहे.

राष्ट्रीयदृष्ट्या धर्म नि भाषा यांना असें गौणत्व येत असलें, तरी राष्ट्राचें अैक्य साधण्यासाठी स्वधर्म नि स्वभाषा यांना आपण अग्नि दिला पाहिजे, असें मुळीच नाही. बहुजनांच्या कार्यासाठी ज्याप्रमाणे आपण आपल्या प्राप्तीचा काही अंश द्यावयाचा असतो, त्याचप्रमाणे राष्ट्रीय कार्य साधण्यासाठी आपल्याला स्वत्वाभिमानाचा थोडा अंश स्वसंमतीने सोडावयाचा आहे. बलात्काराला कोठेहि अनुज्ञा नाही. चोरी करून वा ठकवून दुसऱ्याच्या धनाचा अपहार न करतां प्रामाणिकपणें धन्दा करून ज्याप्रमाणे चरितार्थ चालवितां येतो, त्याचप्रमाणे स्वदेशांतील अितर लोकांच्या धर्मांवर नि भाषांवर घाला न घालतां आपल्याला आपल्या धर्माची नि भाषेची अभिवृद्धि करतां येते. तेव्हा दुसऱ्यांच्या धर्मांवर नि भाषेवर धाडी घालणाऱ्या लोकांना भिअून, राष्ट्रीय अैक्य साधण्यासाठी म्हणून स्वभाषा नि स्वधर्म यांच्यावर निखारा ठेवणें, हें भेकडपणाचें नि दुबळेपणाचें लक्षण आहे. ही आत्मवञ्चना, आत्महत्या होत आहे. राष्ट्रधर्मांत भेकडपणाला आणि दुबळेपणाला थारा नाही.

ज्या स्वत्वावर पाणी सोडूं नये असे मी म्हणतों, त्या स्वत्वाची थोडी मीमांसा केली पाहिजे. स्वधर्म काय, स्वभाषा काय, नि स्वदेश काय जो मनुष्य अभिमानाने हे शब्द अुच्चारतो त्याने काही या गोष्टी स्वतः निर्माण केलेल्या नसतात. त्या त्याला सामान्यतः वंशपरम्परेने प्राप्त होतात. त्याला जी या गोष्टींविषयी आपुलकी वाटते तिला अनेक कारणें असतात. ज्यांच्याशीं त्याचे व्यावहारिक हितसम्बन्ध निगडित झालेले असतात, त्यांच्याशीं या गोष्टींनीहि तो संबद्ध असतो हें अेक कारण; आणि या गोष्टींत त्याचा अितिहास असतो, म्हणजे त्याच्या पूर्वजांच्या धडपडींचें, पराक्रमांचें प्रतिबिम्ब असतें, हें दुसरें कारण. मला मराठी भाषेविषयी ममत्व कां वाटतें, तर माझे बहुतेक स्नेहीसंबगडी, सारे आप्तस्वकीय हीच भाषा बोलतात, माझ्या पूर्वजांच्या संस्कृतीचें भाष्य मला मराठी वाङ्मयांत वाचावयाला मिळतें; आणि त्यांच्या संस्कृतीचें प्रतिबिम्ब मला तिच्या शब्दसङ्ग्रहांतहि आढळतें. 'वनवास' आणि 'शिवराअी' हे साधे शब्दसुद्धा थोडा विचार करतांच मला वन्द्य अशा रामचन्द्राची आणि शिवछत्रपतींची आठवण करून देतात. पूर्वजाभिमान हा अेक प्रकाराचा स्वाभिमानच असतो. त्यामुळे न्यायनिष्ठुरतेने पूर्वजांचे दोष दाखविताना सुद्धा भाषेंत आपण स्वाभाविकपणेंच मर्यादा पाळतों. हें ममत्व गुणावलम्बी नाही. अितर स्त्रियांशी तुलना करून काही आपण अेखादी स्त्री मातृप्रेमासाठी म्हणून नियोजित करीत नाही; तसेंच आअी कशीहि असली तरी तिचा जो सत्पुत्र आहे तो काही 'बाबांची आवा' म्हणणार नाही.

स्वधर्म, स्वभाषा नि स्वदेश हीं काही अशीं सनातन अपरिवर्तनीय नाहीत की, त्यांत व्यक्तीच्या पराक्रमाला वाव नाही ज्या क्षेत्रात माझ्या पराक्रमाला वाव आहे त्या क्षेत्राविषयी मला ममत्व वाटल्यावाचून रहात नाही. सुराज्य कोणाला नको आहे ! पण सुराज्यापेक्षा स्वराज्याविषयी प्रेम वाटतें याचें हेंच कारण की, स्वराज्यांत आपल्या कर्तृत्वाला चौफेर वाव मिळतो. अुलटपक्षीं असें म्हणतां येअील की, ज्या स्वराज्यांत व्यक्तींच्या

पराक्रमाला वाव नसेल तें स्वराज्यच नव्हे; त्याविषयी आपुलीक कधीहि वाटावयाची नाही.

.यासाठी स्वधर्म आणि स्वभाषा यांच्या त्यागाची भाषा बोलणें भयावह आहे. भूतकालाशीं निष्कारण पिढ्या तोडणें आत्मघातकीपणाचें आहे. "पूर्वं दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भाविकाल" हे आपल्या 'विनायक' कवीचे शब्द आपण विसरतां कामा नये. या स्वत्वाभिमानांत भूतकालाचें स्फूर्तिप्रद स्मरण आहे, वर्तमानकाळीं करावयाचा पराक्रम आहे, आणि अुज्ज्वल भविष्यकाळाची आशा आहे.

यावरून मी स्वभाषेकडे म्हणजे मराठीकडे कोणत्या दृष्टीने पाहतों, हें ध्यानांत येअील. ही अेक लौकिक व्यवहाराची भाषा आहे नि सवडीच्या वेळीं या भाषेंतील वाङ्मय वाचतांना वेळ बरा जातो, अेवढ्यासाठी मी या मायभाषेला मानतों असें नव्हे. लौकिक व्यवहार काय मोडक्यातोडक्या हिन्दीवरहि चालेल; आणि मनोरञ्जनापुरतेंच पहावयाचें तर अिङ्ग्रजी भाषा मला येते आणि तिचा फुलोरा मराठी भाषेच्या फुलोऱ्यापेक्षा कितीतरी विविध, विस्तृत आणि सुगन्धी आहे! पण मराठीवर माझें स्वभाषा म्हणून प्रेम जडतें; कारण, तिच्या द्वारा मला माझ्या पूर्वजांच्या, ज्ञानेश्वरादि कवींच्या आणि शिवछत्रपतिप्रभृति वीरांच्या पराक्रमांचें ज्ञान होतें; आणि हीच भाषा त्यांचीहि मायभाषा होती हें ध्यानांत येतांच तिच्याविषयी विलक्षण आपुलकी वाटते. या पूर्वजांच्या स्फूर्तिदायक स्मृतिसङ्गतींच ही भाषा भण्डाऱ्यापासून जञ्जिऱ्यापर्यन्त आणि बऱ्हाणपुरापासून खानापुरापर्यन्त पसरलेल्या माझ्या दोन कोटी बान्धवांची भाषा आहे याचीहि जाणीव होते. ही भाषा दोन कोटी लोकांच्या कौटुम्बिक साधर्म्याचें आणि सांस्कृतिक अैक्याचें द्योतक आहे अितकेंच नव्हे, तर हें अैक्य दृढ करण्याचें महत्त्वाचें साधन आहे, हें ध्यानांत येतांच स्वभाषेचें महत्त्व अधिक वाटतें. या दोन कोटी लोकांच्या भवितव्याकडे लक्ष देअून भाषेच्या स्वत्वाचें संरक्षण नि संवर्धन हें धर्म्य कार्य आहे, आणि हें धर्म्य कार्य करण्याची मला यत्कि-

ञ्चित् लाज वाटत नाही. हिन्दुस्थानाच्या पसतीस कोटी लोकांपैकी या मराठी दोन कोटींविषयी माझ्यासारख्या सामान्य मनुष्यास विशेष आत्मीयता वाटते, याला जर कोणी स्वार्थ म्हणेल तर मी स्वतःला निश्चिन्तपणें स्वार्थी म्हणवून घेअीन.

या दोन कोटी लोकांच्या महाराष्ट्रांत अितर धर्मांचेहि लोक आहेत. खिस्तानुयायी नारायण वामन टिळक, बौद्ध धर्मानन्द कोसम्बी, जैन दत्तात्रेय भिमाजी रणदिवे, लिङ्गायत सुमन्त यांच्याप्रमाणे ज्यांना ज्यांना मराठी ही आपली भाषा वाटते, म्हणजे दोन कोटी महाराष्ट्रीय हे आपले वाटतात, त्यांना मराठी भाषेचें स्वरूप ठरविण्याचा अधिकार हिन्दु महाराष्ट्रियांअितकाच आहे; आणि त्यांच्या साहित्यसेवेची योग्य बूज करावयाला महाराष्ट्र बान्धला गेला आहे.

मराठी असे आमुची मायबोली जरी भिन्नधर्मानुयायी असूं,
पुरी बाणली बन्धुता अन्तरङ्गीं, हिच्या अेक ताटांत आम्ही बसूं.

परन्तु जे महाराष्ट्रांत राहून मराठीविषयी आपुलीक बाळगीत नाहीत, ज्यांना आपले हितसम्बन्ध अितर महाराष्ट्रियांहून वेगळे आहेत असें वाटतें, ज्यांची सहानुभूति केवळ महाराष्ट्राबाहेरच नव्हे तर हिन्दुस्थानाबाहेर अेका विशिष्ट दिशेने वहात असते, त्यांनी आपली अुन्नति आपल्याला रुचेल त्या प्रकारें निश्चिन्तपणें करून घ्यावी. त्यांच्या आड येण्याची आमची अिच्छा नाही. परन्तु आम्ही दोन कोटी लोक आमची उन्नति आम्हांला रुचेल त्याप्रकारें करून घेत असतांना त्यांनी यत्किञ्चित् ढवळाढवळ वा विरोध करत कामा नये. आमच्या भाषाविषयक वा संस्कृतिविषयक चळवळींत जे आम्हांला आपले मानतात असें कृतीने दाखवीत नाहीत, त्यांना ही लुडबूड करण्याचा अधिकारच प्राप्त होत नाही.

मराठी भाषा ही दोन कोटी लोकांच्या कौटुम्बिक साधर्म्याची साक्ष आहे, आणि त्यांचें जीवन व्यापक, सुसङ्घटित नि अभ्युदयोन्मुख करण्याचें अेक महत्त्वाचें साधन आहे, या दृष्टीने आपण भाषेच्या नि वाङ्मयाच्या

स्वरूपाची पाहणी केली पाहिजे. आधुनिक मराठी वाङ्मय हें सुललित दिसलें तरी अेकन्दरीने पाहतां सङ्कुचित दृष्टीचें, थिल्लर, दुबळें, अनुकारी आणि वेषवेडें वाटतें. म्हणूनच महाविद्यालयाच्या आंतबाहेर बागडणारे कुमार नि कुमारी, आणि वेळ जात नाही म्हणूनच वाचन करणारे प्रवासी नि गृहिणी यांच्याव्यतिरिक्त प्रौढ, अुद्योगी नि सुशिक्षित माणसें वाङ्मयाचें स्वागत करतांना क्वचितच आढळतात. बहुजनसमाजास सन्तवाङ्मयाविषयी जो जिव्हाळा वाटतो तो त्याला आधुनिक वाङ्मय लौकिक असूनहि त्याविषयी वाटत नाही. वैवाहिक जीवनाविषयींचें असमाधान तेवढें आधुनिक वाङ्मयांत जिव्हाळ्याचें आढळतें; पण तें अेका सुशिक्षितवर्गापुरतेंच मर्यादित आहे. याव्यतिरिक्त अितर सामाजिक वा वैयक्तिक दुःखांची कहाणी तितक्या समरसतेने लिहिली जात नाही. शृङ्गार हा आद्यरस असेल, रसांचा राजा असेल, परन्तु सतत आणि सर्वदूर त्याचाच ध्यास लागणें हें कामगण्डाचें[1] लक्षण आहे. या 'नवमत'-वादाचा समाजसत्तावादाशीं काही सम्बन्ध नाही, असें भाअीलोक ओरडून साङ्गूं लागले आहेत; आणि खरोखरच समाजसत्तावाद असा स्त्रैण नाही. तो निरर्गल वाटेल, पण पराक्रमी आहे. पराक्रमी मनुष्याच्या शृङ्गारांत रङ्ग आहे, तो कौतुकास्पद वाटतो. दुबळ्यांची शृङ्गारलोलुपता केविलवाणी वा किळसवाणी वाटते.

पण येथे वाङ्मयाचा आढावा घ्यावयाचें मीं योजिलेलें नाही. वाङ्मय वाढत आहे, वाचनाची आवड पसरत आहे, आवड आहे म्हणून आर्थिक तोटा सोसूनहि लिहिलेलें पुस्तक मुद्रित करून प्रकाशित करण्याची वृत्तिहि लेखकांत दिसत आहे अित्यादि गोष्टी निस्संशय अभिनन्दनीय आहेत. पण या प्रसङ्गीं मी वाङ्मयापेक्षा भाषेच्या स्वरूपाविषयी अधिक चर्चा करणार आहें.

महानुभावीयांनी या आपल्या मराठी भाषेंत प्राचीन काळीं रचना

---

१ 'सन्ततिनियमन' पुस्तकाच्या १५०० प्रती खपतात आणि 'प्रेमाचें तत्त्वज्ञान' या त्याच ग्रन्थकाराने लिहिलेल्या पुस्तकाच्या ३०० प्रती सुद्धा खपत नाहीत, हें कामगण्डाचें नव्हे तर कशाचें द्योतक आहे?

करून तिला सजविली अितकेंच नव्हे, तर पन्थभाषा म्हणून तिची महती सिन्धूपार काबूलपर्यन्त पोचाविली. ज्ञानेश्वर-तुकारामादि सन्तांनी बहुजनसमाजाची बोधभाषा म्हणून हिच्यांत सकस नि सुन्दर वाङ्मय निर्माण करून हिला गौरविली. मराठ्यांनी आपल्या राजवटींत जरी हिचे महाराष्ट्रीय महत्त्व ओळखिलें नाही आणि हिला राजकीय महत्त्व प्राप्त करून दिलें नाही, तरी मराठी ही त्यांची मायबोली असल्याने त्यांच्या पराक्रमाचें क्षेत्र जसजसें वाढलें, तसतसा अप्रत्यक्षपणें हिचा गद्यप्रपञ्चहि वाढला; आणि ही विविध राष्ट्रीय व्यवहार करण्यास अधिक कार्यक्षम झाली. अिङ्ग्रजी राजवटींत परकीयांच्या प्रेरणेने, पण आपल्याच पूर्वजांच्या कष्टाने, व्याकरण-कोशादि ग्रन्थ निर्माण होअून हिला निश्चित असें रूप आलें. पुढील काळांत ग्रन्थकारांनी, वर्तमानपत्रकारांनी आणि मासिककारांनी हिची स्तुत्य अशी सेवा केली आहे.

या आजच्या मराठी भाषेचें स्वरूप कसें आहे ! हिच्या व्याकरणाकडे जसें आपण लक्ष दिलें आहे, तसें हिच्या शब्दसम्पत्तीकडे दिलें आहे काय ! वाङ्मयाचा शब्दसङ्ग्रह हा अेकन्दर भाषा बोलणाऱ्याच्या शब्दसङ्ग्रहाचा अुत्कृष्ट सामान्यांश असला पाहिजे. हा सामान्यांश जितका मोठा तितकी लेखी भाषा अधिक प्रतिनिधिस्वरूप नि अधिक प्रभावी होते. आजची मराठी भाषा तितकी प्रतिनिधिस्वरूप आणि सम्पन्न आहे असें मला वाटत नाही. भाषेच्या निश्चित झालेल्या व्याकरणाला धक्का अगदी न लावितां प्रादेशिक बोलींतील शब्दांची चौकशी करून त्याचा स्वीकार करण्यानेच मराठी भाषेला प्रतिनिधित्व नि सम्पन्नता हीं पूर्णपणें प्राप्त होणार आहेत. याला सामुदायिक नि विस्तृत चौकशीची आवश्यकता आहे खरी; परन्तु मराठी भाषेच्या धुरन्धर लेखकांनी या प्रश्नाकडे पोचवावें तसें लक्षच पोचविलेलें नाही. ते प्रवाहपतिताप्रमाणे वागत आले आहेत; आणि विशेष दुर्दैवाची गोष्ट ही की, दाखवूनहि त्यांना वस्तुस्थिति दिसत नाही. आम्हां

लोकांची मनोवृत्तिच थोडी विलक्षण नि विपर्यस्त झालेली आहे. "ज्यांनी तिच्या (म्हणजे मराठी भाषेच्या) अभिवृद्ध्यर्थ निरन्तर अुत्साहाने झटावें त्यांच्यांत सुस्ती, कृतकृत्यताबुद्धि, पण्डितंमन्यता वगैरे दोष अखण्ड वसल्यामुळे तिची मोठीच हानि होअून ती क्षयाच्याच पन्थास दिवसेंदिवस लागत चालली आहे" असें निदान विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी बासष्ट वर्षांपूर्वी केलें. भाषेच्या स्वरूपाच्या दृष्टीने पाहतां सुधारणेला अद्यापि आरम्भ झालेला नाही. दिसावयाला ती पुष्ट दिसते परन्तु हें सशक्तपणाचें लक्षण नसून हें 'वातमूलक स्थौल्य'[२] आहे असें विष्णुशास्त्र्यांप्रमाणेच मलाहि वाटतें.

आपल्या मनोवृत्तींतील काही दोष विष्णुशास्त्र्यांनीच दाखविल्यामुळे त्यांची थोडी चिकित्सा केल्यास ती अनाठायीं होणार नाही. दोष दाखविण्याचें कार्य अप्रिय असलें तरी परिणामीं पथ्यकर आहे. तेव्हा तें टाळून चालणार नाही.

मोठेपणाची धुन्दी हा आपल्या मनाचा पहिला दोष आहे. पूर्वी मराठी स्वार-रावांनी तरवार चालवीत भीमथडीच्या तट्टाना सिन्धुनदीचें पाणी पाजिलें नि अेकप्रकारचें 'हिन्दवी स्वराज्य' केलें याचें स्मरण आपण ठेविलें आहे, नि याचा आपल्याला अभिमान वाटतो ही गोष्ट स्पृहणीय आहे परन्तु पूर्वजस्मृतीच्या धुन्दींत केवळ डोलून आपला अभ्युदय होणार नाही. या धुन्दीमुळे आपला दुहेरी तोटा होत आहे या अुन्मादात अितराविषयी तुच्छतेचे अुद्गार आपल्या तोण्डून निघून स्वाभाविकपणेंच त्यांचीं मनें दुखावतात आणि ते आपले वैरी होतात. ज्यांना आपण या प्रकारें हिणवितों ते कित्येक गोष्टींत आपल्यापेक्षा श्रेष्ठ आहेत. कोणांत सङ्घटना अधिक, कोणांत अर्थोत्पादनसामर्थ्य अधिक, तर कोणांत स्वभाषाभिमान अधिक आहे. आपल्या शेजाऱ्यांचे वा प्रतिस्पर्ध्यांचे हे सद्‌गुण आपल्याला न दिसण्याने सुद्धा आपला प्रगतीचा मार्ग तेवढा बिकट होतो. ते आपले शेजारी नि देशबन्धूच असल्याने, त्यांच्या न्याय्य आकाङ्क्षांविषयी सक्रिय

(१) निबन्धमाला, पृ. ३. (२) नि. मा. पृ. ६.

सहानुभूति व्यक्त करून त्यांच्याशी सख्य जोडल्याविना आपली उन्नति सुगम होणार नाही. कानडी-मराठीवादासारखे सीमाभागीं अपरिहार्यपणें अुद्भवणारे वाद तडजोडीने, पण स्वत्वत्यागाने नव्हे तर तत्त्वनिष्ठेने, आपले आपणच, तिसऱ्या पक्षाच्या मध्यस्थीविना मिटविले पाहिजेत. तसें आपण करूं शकलों तरच भावी अुत्कर्षाची आशा आहे.

या मोठेपणाच्या धुन्दीमुळे दुसरा तोटा होतो तो असा कीं काही करावयाचें राहिलें नाही अशा भ्रामक समजुतीने आपण सुखासीन, असावध नि निष्क्रिय होतों. सीमाभागीं होणारीं अतिक्रमणें आपणांस दिसेनाशीं होतात, तीं दिसलीं तरी तिकडे दुर्लक्ष होतें, आणि सर्वनाशाचें पाणी तोण्डानाकाशीं चढेपर्यन्त आपली सुरक्षितपणाची धुन्दी अुतरत नाही. पाच आणि दहा रुपयांच्या चलनी चिठ्ठ्यावर देवनागरी लिपी असली तरी मराठी भाषा नाही ! मराठीची ही अुपेक्षा कोणाच्या ध्यानांत येअून असह्य झाली आहे का ! त्याचप्रमाणे बेळगांव जिल्हा हा कानडी म्हणजे कर्नाटकाचा भाग आहे असें राष्ट्रसभेमध्ये जेव्हा ठरविण्यात आलें तेव्हा या जिल्ह्यांत मराठी भाषा बोलणारे लोक किती आहेत, ते कसे पसरलेले आहेत, त्यांचे हितसम्बन्ध काय आहेत, त्यांची या ठरावाला सम्मति आहे कीं नाही, नसल्यास त्या असंमतीला किती महत्त्व दिलें पाहिजे अित्यादि गोष्टींचा विचार खुळावलेल्या महाराष्ट्रीय राष्ट्रसभाभक्तांनी केला नसला तरी तो अितर महाराष्ट्रीयांनी करून योग्य दिशेने चळवळ करावयाला हवी होती की नाही ! राष्ट्रभाषा म्हणून हिन्दीचा जे लोक सर्वदूर प्रचार करीत आहेत, त्यांच्या प्रयत्नांना यश आल्यास प्रान्तिक भाषा अनवश्यक होअून रसातळाला जातील, आणि या हिन्दुस्थानाच्या मानगुटीस 'हिन्दुस्तानी' या नांवाने, पं. मदनमोहन मालवीयांची 'हिन्दी' नव्हे, तर शौकतअलींची[1] 'अुर्दू' मात्र

---

१ भारतीय साहित्यपरिषदेच्या अुद्देशाची भाषा ठरवितांना 'विकास' शब्द आला तो जवळजवळ शम्भर लोकांपैकी दोघांनाच कळला नाही अर्थात् या अल्पसङ्ख्याकांच्या सोयीसाठी 'विकास' शब्द मुळांत ठेवून फार तर 'तरक्की' हा शब्द कंसांत घालव-

असेल, अशी मला भीति वाटते. ही भीति साधार असेल वा नसेल, पण या प्रश्नाचा विचार आपण नको का करावयाला ! अतिव्यापी दृष्टि ही सङ्कुचित दृष्टीअितकीच अनर्थकारक असूं शकते. जिवन्त रहावयाचें असेल तर पाणीच पाहिजे, विश्वव्यापी आकाशाचा पार्थिव जीवनाला तादृश अुपयोग नाही.

सङ्कुचित दृष्टीचाहि दोष आपल्यांत आहेच. अेका अगदी छोट्या संस्थानात हिन्दु महासभेच्या अध्यक्षांचें आगमन व्हावयाचें होतें. त्याच्या थोडें पूर्वी मी तेथील विद्यालयांत बसलों होतों. अेका सुशिक्षित ब्राह्मण शिक्षकाने वर्तमानपत्रांतील ती वार्ता वाचून अुद्गार काढले : "हे कां येथे येत आहेत ! आमच्या या नगरांत (पण हें गांवच होतें म्हटलें तरी चालेल) तर हिन्दु-मुसलमानांचें पूर्ण सख्य आहे !" मला हे अुद्गार अैकून मनस्वी खेद वाटला. हें सख्य बिघडविण्यासारखा चढाअीचा वा अतिक्रमणाचा अुपदेश तर हिन्दुमहासभाध्यक्ष करीत नाही ना ! मग स्वत्वसंरक्षणाची सुद्धा चोरी असावी ! आणि अितर पक्षांचे पुढारी येअून जेव्हा धर्मोपदेशाच्या नांवाखाली सख्यविघातक मन्त्रदीक्षा देअून जातात, तेव्हा हे सख्याचे सुशिक्षित कैवारी कोठे पुढे येत नाहीत ते ! सख्य अवश्य हवें, पण तें समानतेचें नि प्रतिष्ठेचें हवें.

भाषा नि वाङ्मय याच्या क्षेत्रांतील हा दृष्टीचा सङ्कोच आपल्या अैक्याच्या नि अुन्नतीच्या आड येत आहे. पुणें, मुम्बअी, खानदेश, वऱ्हाड नि नागपूर कोठेहि पहा, साहित्यिक हा मर्यादित कक्षेच्या बाहेर

---

याला हवा होता. परन्तु आमच्या विपर्यस्त नि परधार्जिण्या वृत्तीला 'तरक्की' हा मुळांत घालून 'विकास' हा शब्द कंसात घालणे अिष्ट वाटलें ! ('हंस', मे १९३६ चा अङ्क पृ. ७६ पहा.) यावरून हिन्दीप्रसाराची चळवळ ही बहुजनसमाजाला समजणारी जी संस्कृतप्रचुर हिन्दी तिला सार्वत्रिक करण्यासाठी नसून अल्पसङ्ख्याकांची भाषा जी अुर्दू ती, कदाचित् थोडीशी पालटतां येअील या वेड्या आशेने, आसेतुहिमाचल नि आनगरग्राम बहुजनसमाजाच्या गळीं अुतरविण्यासाठी कशी आहे हें स्पष्ट होअील.

दृष्टि फेंकीत नाही.[1] पेणगङ्गा नि मान्जरा या नद्यांमधील प्रदेशांत—मराठ-वाड्यांत—राहणारे मराठी भाषा बोलणारे जे महाराष्ट्रीय लोक आहेत, त्यांची आपल्याला सतत जाणीव होत राहिली पाहिजे ती होत नाही. त्यांच्या निर्भेळ राजकारणाशीं साहित्यिकांचा जरी काही सम्बन्ध येत नसला तरी धर्म, भाषा नि संस्कृति या तीन गोष्टींत त्यांचें स्वत्व सुरक्षित राहील याविषयी शक्य ती चळवळ करण्याचें आपलें कर्तव्य साहित्यिकांनी तरी अखण्ड करीत राहिलें पाहिजे. या दिशेने[2] तिकडे जे जे प्रयत्न होत असतील त्यांचा आपण यथोचित परामर्श घेतला पाहिजे. अितकेंच नव्हे तर त्यांचा अुत्साह वाढावा यासाठी त्यांचा आपण गौरवहि केला पाहिजे. विपरीत परिस्थितींत कार्य करणाऱ्यांना स्थानिक सहानुभूति लौकर आणि अुघड मिळणें कठिण होतें, अशा वेळीं आपणच दूरदर्शीपणाने त्या मराठीच्या साहित्यभक्तांच्या सेवेची बूज करावयाला हवी.

या दृष्टिसङ्कोचामुळेच वाङ्मयनिर्मितीच्या वेळीं मूठभर अिङ्ग्रजी शिकले-ल्यांच्या व्यतिरिक्त जो फार मोठा मराठी समाज आहे त्यालाहि रिझवील नि जागवील असें वाङ्मय असलें पाहिजे, आणि थोड्याशा परिश्रमाने का होअीना, पण त्याला कळेल नि जिव्हाळ्याची, आपली वाटेल अशी भाषा असली पाहिजे, या गोष्टींचा आपल्याला विसर पडतो. हा विसर न पडेल तर भाषा अधिक सुबोध नि जातिवन्त होअील; आणि वाङ्मय अधिक व्यापक नि अधिक परिणामकारक होअील.

आपली फटकून वागण्याची वृत्तिहि याच दृष्टिसङ्कोचामुळे आली असावी.

---

१ या परधार्जिण्या आणि आत्मघातकी वृत्तीमुळेच कित्येकांना आधुनिक ग्रन्थां-तील प्रचलित मराठी भाषेव्यतिरिक्त 'प्रान्ततः विभिन्न मराठी'चा अभिमान अुपटतो. असा दोष मुसल्मानांत आढळत नाही. दक्षिणेकडील अुर्दू आणि अुत्तरेकडील अुर्दू म्हणून अुर्दूला द्विधा करण्याची बुद्धि त्यांना होत नाही.

२ अुदाहरणार्थ, तिकडील 'फटत्कार' हा कवितासङ्ग्रह गुणाने अिकडे 'प्रसिद्ध' होणाऱ्या काव्यसङ्ग्रहांच्या तोलाचाच आहे; पण तो आम्हांला ठाअूक होत नाही.

आपण लोकहितवादी बनलों तर आपोआप महादेव गोविन्द रानडे यांच्या-प्रमाणे सहकार्यतत्पर होऊं. तात्विक विरोध स्पष्टपणें आचरणांत आणूनहि आपल्याविषयी बहुजनसमाजाच्या मनांत जिव्हाळा उत्पन्न करतां येतो. बहुजनसमाजाविषयी खरें प्रेम असलें म्हणजे बहुजनसमाजाच्या मताला योग्य मान कोठे आणि किती द्यावयाचा तें आपोआप कळतें. बहुजन-समाजाच्या सर्वस्वीं आहारींहि जावें लागत नाही आणि बहुजनसमाजाशीं फटकूनहि वागावें लागत नाही.

आपल्यांतील विद्वान् लोक कित्येकदा आपल्याच साह्याने थोर होतात आणि आपल्याला दुरावतात. त्यांना बहुजनसमाजाचें सुतकसोयर काही रहात नाही. कित्येक लोक असे दिसतात की त्याना बहुजनसमाजाकडून मान तेवढा हवा असतो. नायकीची प्रतीक्षा असते, पण पायकीची शिक्षा आव-डत नाही. सहकार्याकडे—संमेलनाकडे—हे लोक सहसा फिरकावयाचे नाहीत. तापल्या तव्यावर आपल्या भाकरी भाजून घ्यावयाला शिकलेले लोक घरचें खाऊन सैन्याच्या भाकरी भाजावयाला कसे धजतील! त्यांतून जर का यांना सुदैवाने अेखादें अधिकाराचें पद मिळालें तर यांच्या अहंमन्यतेला सीमाच रहात नाही. पाच लोक स्वयंस्फूर्तीने अेकत्र बसून जें काही ठर-वितात तें लोकावर लादण्याची सत्ता त्याच्या हातीं नाही म्हणूनच की काय, त्यांच्या योजनेला विरोध करतांना या अेरावांची स्वातन्त्र्यलालसा नेमकी जागी होते. परन्तु स्वकीयांशी फटकून वागणारे हेच लोक वैयक्तिक स्वार्थासाठी परकीयाच्या पुढे लाळ घोटतांना आढळतात!

बहुजनसमाज सत्ताहीन आहे म्हणूनच त्याला ज्याप्रमाणे काही अधि-कारी धुडकावून लावूं शकतात, त्याचप्रमाणे हिन्दु समाज सोशीक आहे म्हणून काही लोक केवळ मनोरञ्जनासाठी त्याची विटम्बना करूं बघतात. बापडा कवि हा जसा अेक विनोदाचा विषय होअून बसला आहे, त्याच-प्रमाणे हिन्दूंच्या धार्मिक समजुतींचें विडम्बन हा काही कुचेष्टवन्तांचा मनो-रञ्जनाचा विषय झाला आहे. हेच कुचेष्टावन्त अितरांच्या वाटेस जात नाहीत.

कारण, ते आपल्याला निश्चेष्ट पाडतील अशी साधार भीति यांना वाटत असते. पावित्र्याची विटम्बना होत आहे म्हणून ज्या दिवशीं हिन्दु लोक आततायी होतील त्या दिवशीं यांच्या चेष्टा थाम्बतील. तेव्हा मात्र या टवाळांना वाक्स्वान्तत्र्याची आठवण होणार नाही. पण आपल्यांला वाक्स्वान्तत्र्याची चाड आहे. जिवन्त समाजात मतांचें द्वन्द्व हें सदैव चालूच रहाणार. दुसऱ्याला प्रिय नि पवित्र वाटणाऱ्या गोष्टीविरुद्ध तत्त्वासाठी प्रखर टीकाहि करावी लागणार. विरुद्ध मताचें खण्डन करावयाचें, त्या मताविरुद्ध लोकमत बनवावयाचें, लोकाचा दृष्टिकोनच फिरवावयाचा, म्हणजे निर्विकार युक्तिवादासह अुपहासाचाहि अुपयोग करावा लागतो. परन्तु तो साधन म्हणून करावयाचा असतो साध्य म्हणून करायचा नसतो; आपल्याला प्रिय असलेल्या लोकांचें मतपरिवर्तन करण्यासाठी असतो, केवळ हसूं पिकवून दीनाच्या हृदयाला घरे पाडण्यासाठी नसतो.

मराठ्यांच्या शौर्याचाहि प्रकार असा चमत्कारिक आहे. आपला गनिमी कावा सुप्रसिद्ध आहे; परन्तु तोहि कालान्तराने विपर्यस्त झाला आहे. यश मिळत आहे तोंपर्यन्त आपला लढाअू अुत्साह अटक मानीत नाही; परन्तु डाव अुलटला म्हणजे पळतां भुअी थोडी होते! झाडास बान्धिलें तर हे झाड घेअून पळून जातील असा आपला लौकिक पानपतापासून तरी आहेच आहे. खेतींत गाडून अुभे राहून शिस्तीने, जुटीने नि निकराने झुन्जत मरणें वा तसूतसूच हटणें, हें आपल्याला ठाअूक नाही. ही चिकाटीच्या झुन्जाची कला आपल्यांला शिकावयाची आहे. चालता काळ आहे तोंपर्यन्त कोपराने खणीत जाण्यांत स्वपराक्रम मानणारे वीर अपेश येअूं लागलें की दैवाला दोष देअून स्वस्थ बसावेत यात काही नवल नाही.

आपण काळवादी आहों, हा आपला सर्वांत मोठा दोष आहे. काळ सारें काही करितो, काळ अनुकूल झाला की सारें काही यथास्थित होअील, ही विचारसरणी आपण वैयक्तिक पोट भरण्याच्या अुद्योगांत अनुसरत

नाही; पण सार्वजनिक अुद्योगाचा प्रश्न निघाला की ती आपणांला अचूक आठवते. ही विचारसरणी आत्मघातकीपणाची आहे. यश थोडें येणें वा अुशिरा येणें हें कित्येकदा अशा गोष्टींवर अवलम्बून असतें की त्या गोष्टी व्यक्तीच्या आटोक्याबाहेर असतात. त्यामुळे यश वा कर्मफल हें व्यक्तीच्या अपेक्षेअितर्के वा व्यक्तीच्या डोळ्यांदेखत मिळेलच असें निश्चयेंकरून साङ्गतां येत नाही. तेव्हा ती चिन्ता करून व्यक्तीने व्यग्रचित्त होअूंच नये म्हणून "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाच न।" अशी शिकवणूक देण्यांत आली. नाहीतर, सिद्धि ही काही कालप्रभावाने होत नाही, ती 'कर्मजा'च आहे, असें स्पष्ट वचन आहे. काळ जर प्रतिकूल असेल तर तितकें यश नाही येणार, पण प्रयत्नांची पराकाष्ठा केल्याचें श्रेय मिळून तेवढें बळ तर वाढेल, आणि काळ अनुकूलच असल्यास प्रयत्नाच्या प्रभावाने सिद्धि तितकी त्वरित पावेल, असा विचार मनुष्याने कां करूं नये! काळावर विसम्बून रहाण्यांत पुरुषार्थाचें निर्मूलन होतें. काळावर विसम्बणारे लोकच सत्ताधीश व्यक्तींच्या तोण्डाकडे पहावयाला शिकतात. अितरांच्या प्रेरणेने आणि प्रयत्नाने झालेल्या अिष्ट गोष्टीलाहि राष्ट्राच्या भवितव्यतेच्या दृष्टीने काही महत्त्व नाही. स्वकष्टाने आणि सहकार्याने घडवून आणिलेल्या क्रान्तीला राष्ट्रीय महत्त्व आहे. कारण, ती क्रान्ति घडवून आणण्यात समाजशुद्धि होअून राष्ट्रीय बळ वाढतें. अुलट, परावलम्बनाने शेवटीं नाशच होतो. म्हणून महाराष्ट्र-विद्यापीठ स्थापन होअून प्रभावी व्हावयाचें असेल तर तें आपल्याच प्रेरणेने आणि आपल्याच सामुदायिक धनदानाने झालें पाहिजे असें मला वाटतें.

आपल्या मनोवृत्तींतील काही दोषांचा स्पष्ट अुल्लेख 'निबन्धमाला'-कारांनीच केल्यामुळे त्याच्याविषयी अितका विस्तार करावा लागला. दोष दाखविले की राग येणें स्वाभाविक आहे. माझ्यावर लोकांनी कितीहि राग काढला तरी चालेल, भाषास्वरूपाचा प्रश्न सार्वजनिक असल्याने त्याच्याकडे त्यांनी निर्विकार नि शोधक दृष्टीने पाहिलें की सारी जोड पावली.

विष्णुशास्त्री परभाषादूषणाला "क्षयाचें बीजें" मानितात. त्यांच्या मतें परभाषादूषण म्हणजे "आपल्या भाषेंत परभाषेंतील शब्दांचा अनिवार सङ्कर होणें व तिची मूळची रचना सुटून ती अगदी परकी जी अिङ्ग्रजी भाषा तिच्या धर्तीवर पडणें" हें होय. 'निबन्धमाला'कारांनी शब्दसङ्कराचा जरी अुल्लेख केला असला, तरी त्यांनी रचनाक्रान्तीचा जितका विचार केला तितका परभाषेंतील शब्दांच्या संसर्गामुळे होणाऱ्या अनर्थांचा केला नाही. रचनान्तरप्रकरणीं योग्य मर्यादा त्यांनी ओळखिली होती; कारण, "आपल्या भाषेंत जेथे अेखादा प्रकार नाही तेथे" आणि "ज्या कल्पना आपणात पूर्वीच्या नव्हत्या" त्या व्यक्त करितांना "अिङ्ग्रजीचें अनुकरण करण्यास चिन्ता नाही[3]" हें ते स्पष्टपणें म्हणतात; आणि म्हणूनच 'महत्त्वाकाङ्क्षा' आणि 'संशयाचा फायदा' या शब्दसमुच्चयांना त्यांचा विरोध असूनहि ते मराठींत मान्यता पावले आहेत.

वाक्प्रचार शुद्ध राखावेत याविषयी मुळीच मतभेद नाही. तिकडे लक्ष देण्याची आवश्यकता नाही, असें मीं कोठेहि प्रतिपादिलेलें नाही. अुलट, ज्या मार्गाने जा म्हणून भाषाशुद्धिवादी लोक साङ्गत आहेत, त्या मार्गाने गेल्यास केवळ शब्दसङ्करच टळेल असें नव्हे तर रचनाशुद्धि, वाक्प्रयोगशुद्धि हीहि अपरिहार्यपणें साधेल.

विष्णुशास्त्री म्हणतात "अिङ्ग्लिश[4] भाषेचा आम्ही द्वेष करीत नाही हें तर काय, पण आपल्या मराठीच्या अुत्कर्षास ती मोठेंच साधन होअील अशी आमची खात्री आहे." पण "मराठींत[5] अिङ्ग्रजीची भेसळ होअूं देणें हें आपणांस लज्जास्पद आहे. अितकेंच नव्हे, तर त्याच्या योगाने आपल्या सर्व प्रयत्नाचा शेवटीं विघातहि होणार आहे." "जर[6] सध्याप्रमाणे अिङ्ग्रजी शब्दांची व रचनेची आपल्या भाषेंत सतत भेसळ होत गेली...तर तिचें रूप पालटतां पालटतां असें होअील की ती अिङ्ग्रजीपासून निवडतां

(१) निबन्धमाला, पृ. ३. (२) नि. मा. पृ. ९६. (३) नि. मा. पृ. १०१. (४) नि. मा. पृ. ६. (५) नि. मा. पृ. ६. (६) नि. मा. पृ. ५.

येणार नाही; व तिच्या मूळच्या रूपाचा मागमूसही राहणार नाही."

शेवटच्या विधानात पापशङ्की अतिस्नेहामुळे अतिशयोक्ति झाली आहे; तरी त्याच्यांत विष्णुशास्त्र्यांची भाषाशुद्धीकडे पाहण्याची दृष्टि दिसते. मराठी भाषेचें भराभर होअूं घातलेलें रूपान्तर त्यांच्या डोळ्यांला चमत्कारिक वाटलें आणि म्हणून तें त्याना नकोसें झालें. परन्तु हेंच रूपान्तर जर अेकाअेकीं डोळ्यावर न येअील अशा मन्दगतीने चाललें असतें, तर मराठीचें 'स्वत्व म्हणजे निराळेपणा नष्ट होण्याच्या बेतात आहे' असें त्यांना वाटलें नसतें; आणि मराठी भाषेची होणारी हानिहि त्याच्या ध्यानांत आली नसती.

माझ्यासारख्या भाषाशुद्धिवाद्याची भूमिका वेगळी आहे. जी क्रान्ति आपण सहेतुकपणें, मागे नि पुढे पाहून घडवून आणितों, तिच्यामुळे आपलें बाह्यरूप कितीहि पालटलेलें दिसलें तरी आपलें स्वत्व नष्ट होत नाही; अुलट, तें अधिक प्रभावसम्पन्न होतें. सावरकरादि सुधारक धर्माच्या नि संस्कृतीच्या सुधारणेसाठी जे प्रहार करीत आहेत ते यशस्वी झाल्यास जी क्रान्ति होअील, ती आपण आपल्या अभिवृद्धीसाठी केली असें होअील. हे घाव देवपण आणणाऱ्या टाकीचे आहेत. या प्रहारांत आणि सोमनाथावर सुल्तान महमूदाने घातलेल्या घावात महदन्तर आहे. परन्तु जी क्रान्ति आपण घडवून आणीत नाही, तर दुसऱ्यांनी केलेली केवळ अुदासीनपणें स्वीकारितों, ती स्वत्वाचा नाश केल्याविना रहात नाही. अशी अनिष्ट क्रान्ति मुङ्गीच्या पायाने होत असली तरी विचारवन्ताला ती अविलम्बें अुमगायाला पाहिजे. भाषाशुद्धिवादीहि अिङ्ग्रजीचा वा फार्सीचा द्वेष करीत नाहीत; ते स्वभाषेवर मात्र अधिक प्रेम करितात. शब्दसङ्करापासून कोणतीहि भाषा अगदी अलिप्त राहूं शकत नाही हेंहि ते जाणतात. परन्तु परभाषेंतील शब्दांची कुरघोडी आपण आपल्या विपर्यस्त नि अभिमानशून्य मनोवृत्तीमुळे करून घेत आलों आहों; तिच्या ओझ्याखाली कित्येक मराठी शब्द नि वाक्प्रचार मेले आहेत आणि कित्येकांचा जीव जात आहे म्हणून ती आता नकोशी झाली आहे. हा विचार विष्णुशास्त्र्यांना शिवलाच नव्हता

आणि खिस्ताब्द १९२५ मध्ये विनायकरावजी सावरकर यांनी जेव्हा मराठी भाषेच्या शुद्धीकरणाचें प्रथम शिङ्ग फुङ्कलें तेव्हा त्यांनाहि हा विचार तितका महत्त्वाचा वाटला नाही.

" 'इष्टेट', 'इस्कूर', 'पाइण्ट', 'रजिष्टर' वगैरे पुष्कळ मञ्जुळ शब्द अितक्यांतच घरोघर होअून बायकांपर्यन्त व पोरांपर्यन्तसुद्धां गेले आहेत !" ही गोष्ट विष्णुशास्त्री मान्य करितात, पण त्यांचें त्यांना भय वाटत नाही. तथापि "पर्ण[2] आमचा मुख्य रोख त्यांच्यावर नव्हे" असें जें ते म्हणतात, त्यावरून या बायकांपोरांपर्यन्त जाअून पोचलेल्या शब्दांवर त्यांचा मुख्य रोष नसला तरी गौणत्वें का होअिना पण रोष होताच, असा निष्कर्ष काढावयाला प्रत्यवाय नाही असें दिसतें. पुढे जेव्हा ते म्हणतात की "वरील शब्द[3] कितीहि मराठींत आले तरी त्यांपासून तीस तादृश भय नाही," तेव्हा त्यांच्या विचारात विसङ्गति दिसून येते. असे अिङ्ग्रजी शब्द जर मराठींत 'कितीहि' म्हणजे असङ्ख्य आले तर मराठी भाषेचें स्वरूप अगदी पालटल्याविना राहील का ! तेच अितरत्र म्हणतात की, "अिङ्ग्रजी शब्दांची व रचनेची आपल्या भाषेंत सतत भेसळ होत गेली...तर तिचें रूप पालटतां पालटता असें होअील की ती अिङ्ग्रजीपासून निवडतां येणार नाही; व तिच्या मूळच्या रूपाचा मागमूसही राहणार नाही." ही भीति जर खरी असेल तर "वरील शब्द मराठींत कितीहि आले तरी त्यांपासून तादृश भय नाही" हें म्हणण्याचा काय अर्थ ?

पण विष्णुशास्त्री म्हणतात की "अेक तर ते (शब्द) बोलून चालून परकी पडले, तेव्हा त्यांस खुद्द मराठीच असें कोणी म्हणणार नाही, व त्यांचीहि तींत घुसण्याची अिच्छा नाही." पण विष्णुशास्त्री मागे काय होअून गेलें आहे याचा विचार न करितांच भोळेपणाने भविष्य वर्तवीत आहेत. आज या शब्दांना 'खुद्द मराठी' असें कोणी म्हणणार नाही; पण हेच

---

(१), (२) नि (३) नि. मा. पृ. ९६. (४) नि. मा. पृ. ५. (५) नि. मा. पृ. ९६.

शब्द अेकदा जिह्वाग्रीं रूढ झाले नि लेखणीच्या द्वारा वाङ्मयांत पाय पसरूं लागले, तमेंच मराठी प्रत्ययोपसर्गांचे संस्कार त्यांच्यावर झाले, म्हणजे प्रा.

१ लघुकथांतून आणि कादम्बऱ्यांतून सवाद देतांना जी अिङ्ग्रजीमिश्रित मराठी भाषा लिहिण्याची प्रथा पडत आहे तिचा निषेध करावा तितका थोडाच होणार आहे. ज्यांना मराठी येतें पण अिङ्ग्रजी येत नाही, अशा वाचकांनी काय करावें ? अुदाहरणार्थ, 'प्रतिभा' (३।२) या पुढारलेल्या पाक्षिकांतील 'लीना' ही गोष्ट पहा. लीनाच्या तोण्डी पुढीलप्रमाणे भाषण आहे :

"I was thoroughly disgusted with them ! The hungry wolves ! त्यांचे माझ्या बुद्धिमत्तेबद्दल व कलेसम्बन्धी सारें बोलणें म्हणजे–nothing but just a prologue to their devouring passion ! मला हें प्रथम कळत नव्हतें, पण पुढे कळूं लागले. म्हणूनच मी तेथें मिसळले पण सगळ्याना अेका हाताचे अन्तरावर ठेविलें. पण शरदचे तसे नव्हतें. He did not long to devour me up. माझ्या सौन्दर्याला तो भुकेला नव्हता. He only accepted it. Oh ! he is such a great artist ! तुला माहीत नाही. I adore him !" १० (पृ. ११).

वरें, वर्णनांतहि परकी शब्द कसे येतात ते पहा. "जयन्ती डिलिव्हरी केस करून आली की तडक आंतल्या खोलीत जावयाची. वॉश वगैरे घेअून कपडे बदलून मग स्वस्थ पडायची.पण आज ती अितकी थकून गेली होती की अेक पाअूल अुचलून बेडरूममध्ये जावयाची सुद्धा तिची अिच्छा होअीना.पहाटे चार वाजल्यापासून आज ती अेका केसवर सारखी अुभी होती. शिवाय ती केसहि अॅब्नॉर्मल. केस करितांना तिला काही वाटलें नाही "—"बाअीसाहेब," मदनने 'खत' नेण्यासाठी हाक मारली. "हां रखा है वो खत टेबलपर, लेके जाव और बाअीसाहेबकू सलाम बोलना." (पृ. ९).

"पण आज ती अितकी थकून गेली होती की" हे शुद्ध मराठी आहे हे तरी सुदैवच; नाही तर "आज तिला अितके अेक्झॉशन् आले होतें की" अशीच भाषा पडावयाची !

ही जयन्ती मुम्बअी नगरांत मदन नांवाच्या नोकराशी अुर्दू बोलते, ही गोष्टसुद्धा चिन्तनीय आहे ! अुर्दूतच अेकप्रकारचा करडेपणा, प्रताप आहे तो मराठींत नाही, अशी जी आमची खुळी समजूत आहे तिचें हे प्रत्यन्तर आहे.

खुळा बेटा शेक्स्पियर की त्याने वास्तववादाच्या मागे लागून अिङ्ग्रजी प्रेक्षकांसाठी 'ज्यूलियस सीझर' हे नाटक लॅटिन भाषेमध्ये रचिलें नाही ! साम्प्रत जी ही गङ्गाजमनी मराठी भाषा लिहिली जात आहे तिचें मराठी लेखकांना काहीच वाटत

[redacted]न मल्हार जोशी[2] यांच्यासारखे समदर्शी पण्डित त्यांना आपले मानूं लागतात आणि त्यांचें समर्थन करूं लागतात त्याची वाट काय ! 'खुद्द' हा शब्द तरी अेकदा कोठे 'खुद्द मराठी' होता ! पण आज तर तो 'खुद्द मराठी' म्हणून अपरिहार्य होअून बसला आहेना ! "त्याचीहि तींत घुसण्याची अिच्छा नाही" असें शास्त्रीबुवा कसें म्हणूं शकतात ! त्यांची अिच्छाच नाही मग ते घुसतात कसे ! 'खुद्द' हाच शब्द मराठींत कसा घुसला ! काही लोकांना ज्याप्रमाणे राज्यें कमावण्याची अिच्छा नव्हती—व्यापारच करावयाचा होता; पण दैवयोगाने राज्यें आपण होअून त्याच्या गळ्यांत पडलीं असें म्हणतात, तसाच प्रकार या शब्दांच्या प्रकरणींहि होत असेल कोणी सांगावें ! अशा रीतीने राज्यें दुसऱ्याच्या गळ्यांत घालणाऱ्यांची जी मनोवृत्ति असेल तीच अशा परकीय शब्दांना त्यांची अिच्छा नसतांहि आपल्या भाषेंत आग्रहाने ओसरीच नव्हे तर माजघर देणाऱ्या महोदारांची असली पाहिजे !

पुन्हा विष्णुशास्त्री म्हणतात, "शिवायें[2] दुसरें असें की त्यांतून कित्येकांचें मराठींत असणाऱ्या शब्दांनी कामहि होणारें नव्हे; यास्तव लाम्बलचक नवे शब्द जे अुगीच श्रम घेअून ओतून काढावे त्यांपेक्षा हेच कां असेनात !" परभाषेंतून मराठींत आलेल्या शब्दांपैकी खरोखर असे किती

---

नाही. 'नथिंग सीरियस !' हाच अेका सुशिक्षित प्राध्यापक मराठी लेखकाच्या लघुनिबन्धाचा मथळा आहे ! साराच थिल्लरपणा !

१ क्रान्ति होअून हे नवें वळण अेकदा पडलें की मग तिचे समर्थन विष्णुशास्त्रीसुद्धा करितात. अुदाहरणार्थ ते म्हणतात, "मुसलमानांच्या भाषेंतून आपल्या भाषेंत काही नवीन शब्द येअून व तीस नवें वळण लागून तींत झोकदारपणा व आवेश हे गुण मात्र जास्त आले. तेव्हा त्या भाषेच्या मिसळण्याने आपल्या भाषेचें अहित न होतां हितच झालें यांत संशय नाही" (नि.मा. पृ.५). या समजांतील भ्रामकपणा मीं मागेच दाखवून दिला आहे आणि श्री. नरसोपन्त केळकर यांनी या कामगिरीला 'छन्दोरचने'च्या परीक्षणांत मान्यताहि दिली आहे.

२ निबन्धमाला, पृ. ९६.

आहेत की मराठींत असणाऱ्या शब्दांनी त्यांचें कामच झालें नसतें ! असे शब्द केव्हाहि फारच थोडे असणार. चिपळूणकर जेव्हा 'खुद्द मराठी' असा शब्दप्रयोग करितात, तेव्हा त्या ठिकाणीं' खुद्द'चें काम 'शुद्ध'ने झालें नसतें का ! अितरत्र 'खुद्द'चें काम करावयाला 'स्वतः', 'जात्या' अित्यादि शब्द सज्ज आहेत; 'वगैरे'चें काम करावयाला 'अित्यादि' आणि 'खुशाल'चें काम करावयाला 'सुखेनैव' हे शब्द काय सिद्ध नाहीत! "ते[1] खरे शब्द आहेत किंवा त्यांच्यापेक्षा शुद्ध मराठी असे शब्द सापडतील की नाही हा विचार कोणीहि करीत नाही व करण्याची गरजहि कोणास पडत नाही", अशी हाकाटी करणारे विष्णुशास्त्री स्वतः न कळत तेंच पाप करितात ! 'शिवाय'-च्या ठिकाणीं 'त्यांतून'ची योजना शास्त्रीबुवांनी केली असती तर अर्थबोध व्हावयाला काय अडचण पडली असती ! येथे तर 'अुगीच श्रम घेअून' लाम्बलचक नवे शब्द ओतून काढावयाचे नव्हते, मराठी शब्दाची केवळ आठवण ठेवावयाची होती. मग भाषेंत विद्यमान असलेल्या मराठी शब्दाची विस्मृति कशाने झाली ? अर्थात् असावधपणाने वा ज्यांची "आंत घुसण्याची अिच्छा नाही" त्या शब्दांच्या मोहनीमुळे. असें कशाने होतें या प्रश्नाकडे तितकें खोल लक्ष दिलें नाही म्हणून.

"लाम्बलचक नवे शब्द जे अुगीच श्रम घेअून ओतून काढावे त्यापेक्षा हेच कां असेनात!" असें जेव्हा विष्णुशास्त्री म्हणतात तेव्हा त्यांनी स्वावलम्बनाचें रहस्य ओळखिलें नव्हतें असें म्हणणें प्राप्त होतें. स्वदेशी कापड जर तलम निघूं शकलें नाही तर जाडीभरडी खादी वापरावयाची, पण परदेशी स्पर्शसुखद कापडाला शिवावयाचें नाही, या बाण्याने वागतांना 'सार्वजनिक काकां'नी जी दृष्टि ठेविली होती तीच सार्वजनिक हिताची आहे. कष्ट न करतां अुसनवारी करून मिरवणें म्हणजे काही अभिमानास्पद व्यापार नव्हे. अुलट, स्वावलम्बनाने केलेले कष्ट वाया जात नाहीत. भाषेची सर्गशक्ति टिकते नि वाढते. पुत्रजन्मोत्सवाची सर दत्तविधानाला कशी येअील !

---

१ नि. मा. पृ. १००

विष्णुशास्त्री म्हणतात की "अिङ्ग्रेजांसं जर आमचे khutput, bandobast, pacca, ghee असे शब्द चालतात, तर आम्हासहि बूक, टेबल नाटपेड वगैरे शब्द खुशाल चालवून घेतां येतील." चालवूनच घ्यावयाचें असें ठरल्यावर काहीहि सुखेनैव चालवून घेता येअील. या कलेंत आपला लौकिक फार प्राचीन काळापासून आहे ! पण विष्णुशास्त्र्यांना हा प्रश्न सुचला नाही की khutput, bandobast, pacca, ghee हे शब्द शिष्ट भाषेत आणि विदग्ध वाङ्मयांत कधी आढळतात काय ? आणि या शब्दांनी अिङ्ग्रजी भाषेतील पूर्वीच्या काही शब्दांची गळचेपी केली आहे काय ! मुळीच नाही. पण फार्सी, अिङ्ग्रजी शब्दांनी मराठी शब्द नष्ट करून टाकिले आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे.

"अिङ्ग्रेजी शब्दाची व रचनेची आपल्या भाषेत सतत भेसळ" होअूं देणें विष्णुशास्त्र्यांना अनर्थावह वाटत होतें हें निःसंशय आहे. परन्तु या प्रश्नाच्या दोन अङ्गापैकी शब्दसङ्ग्रहाचा त्यांनी तितकासा खोल विचार केला नाही. तथापि "शब्दबहिष्कार म्हणजे भाषाशुद्धि नव्हे" असें त्यांनी बजाविलें होतें म्हणून 'सह्याद्रि' मासिकांत श्री. क्षीरसागर म्हणतात त्याप्रमाणे त्यांनी बजाविलेलें कोठेहि दिसत नाही.

पण निबन्धमालाकारांनी या अनिष्ट अशा दुहेरी भाषादूषणाची कारणें मोठ्या मार्मिकपणाने साङ्गितलीं आहेत. "अिङ्ग्रेजी[२] भाषेचा सार्वत्रिक अभ्यास त्यास (भाषादूषणास) कारण झाला हें अेक अघडच आहे" असें साङ्गून ते पुढे लगेच म्हणतात, "परभाषेचा केवळ संसर्गच मराठी भाषेस बाधक झाला असें म्हणतां येत नाही, तिच्या दुर्दशेचें खरें कारण आपल्या लोकाच्या मनांत तिजविषयी मुळीच अभिमान नसणें हें होय. तिसरें कारण अुपेक्षा, किम्बहुना तिरस्कारहि म्हटला असता चालेल."

आज सुशिक्षित लोक मराठी भाषेचा तिरस्कार करीत आहेत असें मला वाटत नाही. त्यांना तिचा मुळीच अभिमान नसेल असेंहि म्हणतां

(१) निबन्धमाला, पृ. ९६. (२) नि. मा. पृ. ९७-९८.

नाही. परन्तु मूलगामी अभिमानाच्या अभावीं अद्यापि तिची अुपेक्षा
ा आहे यांत तिळमात्र सन्देह नाही. विद्यापीठाच्या परीक्षांना मराठी हा
ाय केवळ आवश्यक केल्याने ही स्थिति सुधारेल, असें विष्णुशास्त्र्यांसहि
ले नाही आणि मलाहि वाटत नाही. हा अुपाय कृत्रिम आहे म्हणून
ला यश येत नाही अशी स्थिति नसून, मराठीचे सूत्रधार नि विद्यार्थी
ना मराठीचा खरा अभिमान नाही, हें खरें अपयशाचें कारण आहे.
भिमान नाही, पोटतिडीक नाही, कष्ट करावयाला नकोत, व्यावहारिक
ार्थ साधावयाचा असतो अित्यादि विविध कारणांनी जो तो पळवाट
धून काढतो. जे हा विषय स्वेच्छेने घेतात ते फारसे कष्ट करावयाला
कोत म्हणून घेतात. मराठी ही आपली जन्मभाषाच आहे, तेव्हा तिचा
शेष अभ्यास तो काय करावयाचा असतो ! चार ओळी खरडावयाला
हीच श्रम घ्यावे लागत नाहीत, या अैटींत ते परीक्षेला बसतात. बरें,
क्षक कडक दोळू पहातील तर त्यांना वृतिच्छेद होण्याची भीति असते;
ाणि विद्यापीठाने विकल्पाला थारा दिल्याने विद्यार्थी या विषयाला राम-
म ठोकतील हीहि भीति असते. कित्येकांची संस्कृतभक्ति ही अेकनाथाच्या
द्वान् चिरञ्जीवासारखी असल्याने ते वस्तुतः मराठीचे प्रच्छन्न हितशत्रुच
तात. मुम्बअी विद्यापीठांत मराठीविषयाधिकारी समितीचा नव्या शुद्ध-
खनास विरोध आहे याविषयी चिन्ता नाही, पण जुन्या शुद्धलेखनाचें तरी
ग्य प्रकारें पालन होत आहे काय ? मुळीच नाही. सारी अनास्था आहे !

मराठीच्या मानाने संस्कृताचाच अभ्यास अधिक होतो. संस्कृताचा
भ्यास होतो ही गोष्ट काही अनिष्ट नाही; पण संस्कृताचें ज्ञान निकडीचें
ाही. कालिदास-भवभूतीपेक्षा ज्ञानेश्वर, अेकनाथ, तुकाराम अधिक जव-
ळचे आहेत. म्हणून मराठीचा साङ्गोपाङ्ग अभ्यास अवश्य आहे. तो न
ाल्याने मराठी शब्द आणि मराठी रचना हीं मागे पडतात; आणि
ुवर्णमध्य', 'नकाश्रु'सारखे 'अर्धजातीय शब्द' "ज्यांचा अर्थ अिङ्ग्रजी

(१) नि (२) निबन्धमाला, पृ. ९६.

आणि उच्चार मराठी; असे अर्वेकव्वे...शेंकडो शब्द" मराठींत उतरतात! 'डिअर-वॉटर' म्हणजे 'मृगजळ' हा शब्द जसा अिङ्ग्रजींत हास्यास्पद होअील, तसेच 'सुवर्णमध्य' आणि 'नकाश्रु' हे खरोखर हास्यास्पद वाटले पाहिजेत. हे हातार्शी असणारे आणि पुढे पुढे करणारे शब्द अिङ्ग्रजी असोत वा अरबी-फार्सी असोत वा संस्कृतहि असोत, ते न वापरतां ज्यांनी मराठी वाङ्मयांत नि मराठी प्रान्तिक बोलींत नेटका प्रपञ्च केला आहे, त्या मराठी शब्दांचा शोध करून त्यांना जवळ केलें पाहिजे. परकीय शब्दांवरील बहिष्काराची चळवळ ही या रायवळ मराठी शब्दांच्या शुद्धीसाठी नि पुरस्कारासाठी आहे. 'खुशाल' हा शब्द वापरावयाचा नाही असा निश्चय केल्याविना 'सुखरूप,' 'सुखेनैव' अित्यादि शब्दांची अुपस्थिति होत नाही. जेथे मूळचे मराठी शब्द नसतील तेथे ते मराठीसंस्कृतांतील प्रत्ययोपसर्गांच्या साह्याने साधून घ्यावेत.

या अिष्ट चळवळीला सुशिक्षितांचा विरोध कां! कारण अुघड आहे. मराठीचें भाषादूषण सुशिक्षितानींच केलें आहे. त्यांना स्वाभिमान नाही; आणि त्यांचें मराठीचें ज्ञान तोकडें; पण सुशिक्षित झाल्यामुळे आलेली 'पण्डितंमन्यता' मोठी असें कोणी स्पष्ट म्हटलें की सन्ताप येतो. तथापि अनेक वर्षांच्या जडलेल्या सवयीचा बीमोड करावयाचा म्हणजे अत्यन्त कष्ट पडतात; आणि निश्चयाचें बळ लागतें. तेव्हा विरोध करून तो तत्त्वासाठी आहे हें भासविणें हाच मार्ग सोयीचा नि सुखाचा ठरतो. मराठी भाषेचा नि वाङ्मयाचा जर सार्वत्रिक नि साङ्गोपाङ्ग अभ्यास होअूं लागेल तर हा विरोध तत्काळ भुअीसपाट होअील. तोंपर्यन्त काय करावयाचें हा निकडीचा प्रश्न आहे. तोंपर्यन्त या विरोधकांच्या आक्षेपांचें साधार खण्डन करून परकीय शब्दांवरील बहिष्काराची चळवळ निकराने चालू ठेविली पाहिजे.

पहिला आक्षेप 'मूले कुठारः' या प्रकारचा आहे. मराठींत रूढ झालेल्या परकीय शब्दांनी समानार्थी मराठी शब्द मारिले आहेत हा "केवळ

प्रचारान्धतेमुळे झालेला भ्रम आहे" असें क्षीरसागर हे ठासून साङ्गत आहेत. ही ठोकून देण्याची कला मला तशी अवगत नसल्याने मी पुन्हा या प्रश्नाचा विचार केला. श्री. नरसोपन्त केळकर हे मराठींतील पहिल्या प्रतीचे लेखक आहेत याविषयी तर वाद नाही. त्याचप्रमाणे ते कोणत्याहि दुमीने खुळावलेलेहि नाहीत—रसिक आहेत, भाषासौष्ठवाकडे[१] लक्ष पुरविणारे आहेत. तेव्हा ज्यांत अनेक विषयाचा परामर्श घेण्यात आला आहे असें त्याच्या ग्रन्थांतील अेक विस्तृत प्रकरण घेअून तें भाषेच्या दृष्टीने सूक्ष्मपणाने पारखून पहावयाचें असें मीं ठरविलें. "लो. टिळक याचें चरित्र" खण्ड १ ला, यांतील 'टिळकापूर्वीचा महाराष्ट्र' हा तिसरा भाग अभ्यासासाठीं मी निश्चित केला. हा भाग ४६ पृष्ठांचा आहे. तो वाचून पाहिल्यावर भाषाशुद्धीची चळवळ अत्यवश्य आहे याविषयीं सन्देहच राहिला नाही.

अखेर (शेवट, शेवटीं), अमदानी (राजवट), कमी असणें—होणें (अुणावणें), कायमचा (सदाचा, शेवटचा), खुद्द (स्वतः), खुशाल (बिनधोकपणें, बेधडक), खेरीज (व्यतिरिक्त, वगळून), जमीन (भुअी, भूमि, क्षेत्र), तयार (सिद्ध, सज्ज), दिवाण (प्रधान), देखील (सुद्धा), नफा (लाभ), नुकसान (तोटा), पेशा (धन्दा, वृत्ति), बरोबर (सह, समागमें, अचूक, योग्य), बदलणें (पालटणें), बाजू (कड), मदत (साह्य), माहीत

१ काही वाक्यांवर टीका करावयाचाहि मोह होतो. "अिङ्ग्रजांशीं अड्कितपणाने वागणें व अप्रसिद्धीची धूळ खात पडणें या गोष्टीची कमाल झाली" (पृ ५३). येथे 'कळस' हा शब्द कां सुचूं नये ? "अिनाम कमिशन, नक्त नेमणुकांची कारवाअी, दारूचा प्रसार, जङ्गलांची वाढ वगैरे बाबतींत राज्यकारभाराची कद्दर भासूं लागली होती" (पृ. ८०). 'कद्दर' याचा अर्थ योग्यता, प्रतिष्ठा असा आहे. येथे हा शब्द करडेपणा या अर्थाने योजिलेला दिसतो ! "लोकमताची जशी त्यांनी पर्वा केली नाही तशीच सरकारच्या अवकृपेचीहि त्यांनी पर्वा केली नाही" (पृ. ९०). 'पर्वा' हा अेकच शब्द अेका वाक्यांत दोनदा वापरण्यापेक्षा 'चिन्ता' हा शब्द अेकदा तरी आठवला असता तर बरें झाले असतें.

(ठाऊक), माहिती (ज्ञान), व (आणि), वगैरे (अित्यादि), शहर (नगर), शिवाय (विणें), सुरू (चालू), सुरुवात (आरम्भ), हजार (सहस्र), हल्ली (सध्या, साम्प्रत), हुशार (बुद्धिमान्, तरतरीत) हे शब्द वैपुल्याने आढळतात, तर पुढे कंसांत दिलेले समानार्थी शब्द अत्यन्त वैरल्याने आढळतात. 'मदत' हा शब्द वारंवार पुढे येतो नि त्याचा पुरस्कार होतो; पण 'साह्य' हा असहायपणें मागे अेकीकडे खितपत पडतो. 'शिवाय', 'व', 'वगैरे हीं अव्ययें पदोपदीं दिसतात; पण 'वाचून', 'विणें' हीं अव्ययें चुकूनहि पुढे येत नाहीत. 'वांचून' आणि 'विणें' हीं अव्ययें अेकअेकदाच आणि तींहि केळकरांनी पूर्वीच्या लेखकाच्या दिलेल्या पुढील अवतरणांतः—"... पाहून कोणास आनन्द झाल्यावांचून रहाणार आहे!" (पृ.६९) आणि "असा बुद्धिमान् मुलगा शिक्षणाविणें फुकट दवडला जाअूं नये" (पृ.८४) हा जो पक्षपात नरसोपन्तांसारख्या कसलेल्या लेखकाच्या कृतींत न कळत अुतरतो त्याचा अर्थ हा की वर दिलेले परकीय शब्द अितके जवळचे झाले आहेत की समानार्थी मराठी शब्द अपरिहार्यपणें दुरावतात आणि त्यांची अुपस्थितिच होत नाही. स्वकीय मराठी शब्द न आठवणें म्हणजे तो मरणें होय! हे स्वकीय मराठी शब्द मरूं नयेत अशी जर आपली अिच्छा असेल तर त्यांना जवळ करून त्यांचे प्रतिस्पर्धी जे परकीय शब्द त्यांना दूर ठेवल्यावांचून गत्यन्तर नाही.

पण कोणी म्हणतात की "मराठी भाषेमध्ये जे परकीय शब्द येता...

---

१ 'जम बसलेला नाही' या वाक्प्रयोगात 'जम' हा शब्द अगदी अपरिहा... वाटतो ना? पण १८७२ मधील ज्ञानप्रकाशांतून जो अुतारा ७४ व्या पृष्ठावर देण्य... आला आहे त्यांत "पण अद्यापि लोकांत बस बसलेला नाही," असें वाक्य आ... तसेंच ८६ व्या पृष्ठावरील भाषेंत "बाजारांत, गुजरींत, चव्हाट्यावर, अड्डया... गर्दींत ..." या ठिकाणीं गुजरी हा शब्द आहे: पण 'मी गुजरींत गेलों' असा वाक्... योग सुप्रसिद्ध विम्डबनकारांना विडम्बनास्पद वाटतो!

२ प्रा. कृ. पां. कुळकर्णी यांचें या वर्षी म्हणजे खिस्ताब्द १९३६ मध्ये ... येथे भरलेल्या शारदोपासकसम्मेलनांतील भाषाशुद्धीवरील भाषण.

ते असेच अगदी बारीक छटांचे सङ्केत दाखविण्याकरिता येत असतात; आणि तेच शब्द काढून टाकिले तर त्या बारीक छटा दाखविण्याच्या बाबतींत आपली कुचम्बणा होअील, आणि तेवढ्या दृष्टीने भाषेत वैगुण्य येअील.'' पण अशा परकीय शब्दांची सङ्ख्या फारच लहान आहे. अशा अत्यन्त थोड्या शब्दांना प्रवेश असावा म्हणून अितर बहुसङ्ख्य शब्दांना धुडगूस घालूं देणें म्हणजे अराजकता माजविणें होय. रामराज्य, स्वराज्य असे शब्द असतांना 'शाही'चें स्तोम कां ! 'राज्य' हा शब्द चाङ्गल्या अर्थाने येतो तो 'शाही'च्या ठिकाणीं वापरता येत नाही असा सूक्ष्म भेद कोणी भासवितात; पण तो कोणी पाळतात का ! या सूक्ष्म अर्थच्छटेंत काही अर्थ असता तर केळकरांनी बाजीरावशाही, टेम्पलशाही याच्या जोडीने मराठेशाही हा शब्द कशाला वापरला असता ! का त्याना मराठेशाही हा शब्द वापरून काही सूक्ष्म, अनिष्ट अर्थच्छटा व्यक्त करावयाची होती ! 'बारीक' आणि 'सूक्ष्म' यांत तरी काय अर्थभेद आहे ! 'जरूर' हा शब्द 'अवश्य' च्या ठिकाणीं वापरून विशेष काय साधतें !

अर्थाच्या सूक्ष्म छटा दाखविणारे थोडे परकी शब्द अेक वेळ चालतील; स्थूलार्थ व्यक्त करणारे शब्द स्वकीय मराठीच असले पाहिजेत; अर्थाच्या सूक्ष्म छटा व्यक्त करावयाच्या प्रसङ्गांपेक्षा स्थूलार्थ व्यक्त करावयाचे प्रसङ्ग किती तरी अधिक येतात. या अधिक प्रसङ्गीं जर परकी शब्द वापरले गेले तर त्यांचें पौनःपुन्य तितकें वाढून तें त्यांची अुपस्थिति तितकी लौकर होण्यास कारणीभूत होतें. 'बळें', 'हट्टाने', 'जाणूनबुजून', 'बुद्धया' या शब्दांच्या अर्थांत भेद दाखवितां येतील; परन्तु त्या सर्वांच्या ठिकाणीं 'मुद्दाम' हा शब्द चालतो ! स्वाभाविकपणेंच तो लौकर नि वारंवार आठवतो. अितर शब्द मागे पडतात, लोप पावतात. आपण स्वकीय शब्दांचें कार्यक्षेत्र मर्यादित करून त्याचा ठिकठिकाणीं कोण्डमारा करितों आणि परकी शब्दांना सञ्चारस्वातन्त्र्य देअून त्याना दिग्विजयाचा मार्ग सुगम करून देतों हें विपरीत नाही काय !

प्रा. कृ. पां. कुळकर्णी म्हणतात, "दोन संस्कृतींचा मिलाफ होअूं लागला म्हणजे शब्दांची येरझार सुरू होते. नव्या शब्दांना थोपवितां येत नाही व जुन्या शब्दांचें अुच्चाटन करतां येत नाही. शब्द हे आपोआप मरत असतात व आपोआप अुत्पन्न होत असतात. प्रत्येक शब्दाला अेक-प्रकारचा सङ्केत असतो. हा अगदी स्वतन्त्र आहे. त्यावर कोणाचीहि हुकमत चालत नाही. सङ्केत हा शब्दाचा पृष्ठवंश आहे. सङ्केत नाहीसे झाले म्हणजे जुने शब्द नाहीसे होतात. म्हणून प्रयत्नाचा आटोकाट केला तरी शब्दांचा जीर्णोद्धार होणें शक्य नाही. जोंपर्यन्त शब्दांच्या मागील सङ्केत जागा आहे तोंपर्यन्त शब्दांची हकालपट्टी केली तरी ते शब्द मरणार नाहीत." तात्पर्य काय की शब्दांचें जननमरण हें मानवाधीन नसल्याने मानवाने शब्दसृष्टींत ढवळाढवळ करूं नये !

पण या पृष्ठवंशवाद्यांच्या युक्तिवादांत मुख्य दोष हा आहे की ते मनुष्याला निर्माल्यवत् मानितात. निसर्गावर जेथे मनुष्याची थोडीफार सत्ता चालूं शकते तेथे ती काय मानवी गोष्टीवर चालणार नाही ! मनुष्य हा भाषेवर स्वामित्व गाजवूं शकतोच शकतो. व्यक्तीची सत्ता मात्र अितकी थोडी चालू शकते की ती शून्य आहे असें अेक वेळ म्हटल्यास धकेल; कारण भाषा ही अेका व्यक्तीची नसून लक्षावधि, कोट्यवधि व्यक्ती मिळून होणाऱ्या समाजाची असते. या समाजाला का भाषेवर सत्ता गाजवितां येत नाही ? भाषा जर मनुष्यसमाजनिरपेक्ष असती तर तिचें स्वरूप सर्वत्र अेकविधच आढळलें असतें; पण तसें होत नाही. अमेरिकन अिङ्ग्रजीमध्ये 'रेल्वे' न म्हणतां 'रेल्रोड' म्हणतात. 'रेल्रोड' हाच शब्द त्यांना वापरावासा वाटतो. 'रेल्वे' या शब्दाच्या मागे असलेला सङ्केत जर स्वतन्त्र आणि सर्वसत्ताधीश आहे तर तो अमेरिकन लोकांच्या पुढे कां लङ्गडा पडतो ? खिस्ताब्द १८७० नन्तर जर्मन भाषेंतून 'आडे'ची सहेतुकपणें हकालपट्टी होअून 'वीडर्झेअन्'ची प्राणप्रतिष्ठा झाली ती कशी होअूं शकली ? 'आडे' या शब्दाच्या मागील सङ्केत काही तेव्हा नष्ट झाला नव्हता. तो शब्द सुबोध

नि सुटसुटीत असूनहि जर्मन लोकांना तो नको होता. त्यांच्यांत पुरुषार्थ, जूट नि निश्चय हीं असल्याने ते शब्दाच्या आहारीं जाऊं शकले नाहीत. स्वतःला नको असलेल्या शब्दाची त्यांनी यशस्वी रीतीने अुचलबाङ्गडी केली!

शब्दाचा पृष्ठवंश जो सङ्केत तो मानवांनीच निर्माण केलेला असतो हें आपण विसरूं नये. समाजाच्या स्थितींत कालावधीने अन्तर पडतें तेव्हा काही शब्दांचें प्रयोजनच नष्ट होतें. अुपनयनाचा संस्कार पूर्णपणें लोपला की मुंज, जानवें हे शब्द आपोआपच लुप्त होतील; पण लङ्गोटी हा शब्द राहील!

परन्तु सर्वच शब्दांना असा स्वाभाविक मृत्यु येतो असें नाही. सार्वत्रिक जीवनकलह हा शब्दांतहि दिसतो. 'बुद्धया' नि 'मुद्दाम' या दोन्ही शब्दांच्या मागे अेकच सङ्केत आहे. याच्यांत कलह चालू होतो. समाज आपलें साह्य ज्या पक्षाला देतो त्याचें पारडें खाली जातें. आम्ही जर पक्ष-पात करून 'मुद्दाम'ला साह्य केलें तर 'बुद्धया' हा शब्द वर जाअील, तो हळुहळू दिवङ्गत होअील, हें भाकित वर्तवावयाला काही ज्योतिषी नको. 'बुद्धया' हा शब्द जर मेला तर त्याचें कारण त्याच्या पृष्ठवंशांत काही दोष झाला हें नसून आमचा पक्षपात हेंच कारण आहे. 'जरूर' हा शब्द जर आम्ही सहस्रावधि वेळा वापरला आणि 'अवश्य' हा शब्द चुकून केव्हा तरी वापरला, तर 'अवश्य' शब्द अवश्यमेव मरेल. परन्तु या शब्दांच्या पौनःपुन्याचें प्रमाण जें आम्ही अुलटवूं शकूं तें जर आम्हीं अुलटविलें, तर या शब्दांचें भवितव्यहि अुलटेल याविषयीं शङ्काच नको.

हे सङ्केत अुत्पन्न करणें जर समाजाच्या हातीं नसतें तर भाषेंत नवे नवे शब्द निर्माणच कसे झाले असते! 'अन्' हें रूप सोयीसाठी मी प्रथम कवितेंत वापरलें; अपरिचयामुळे त्याच्यावर टीका झाली, टवाळी झाली. पण त्याची अुपयुक्तता हळुहळू पटली आणि आता तें शिष्ट भाषेंतहि रूढ

१ 'व'च्या ठिकाणीं सावरकर द्विमात्रक 'नी' वापरीत असत. अेकमात्रक अुभयान्वयी अव्ययाची अवश्यकता असल्याने मी 'नि' हें रूप वापरायला आरम्भ केला. आता सावरकरहि हेंच ऱ्हस्व रूप वापरूं लागले आहेत.

होत आहे. 'सङ्केत' हा असा सहकार्याने अुत्पन्न करतां येतो. 'फ्लॉवर-पॉट' हा अुच्चार कानीं पडतांच जें वस्तुचित्र डोळ्यांपुढे अुभें राहतें तें कशाने अुभें राहतें? या अुच्चारांतच काही गूढ शक्ति असती तर अिङ्ग्रजीचा जेथे गन्धहि नाही अशा ठिकाणींहि हा शब्द अुच्चारतांच हें चित्र अुभें रहावयाला हवें. पण तेथे काहीच चित्र डोळ्यांपुढे येत नाही. असें कां होतें? 'फ्लॉवर-पॉट' हा शब्द आम्ही अैकतों आणि विशिष्ट आकाराची नि विशिष्ट अुपयोगाची वस्तु आम्ही पाहतों, म्हणून त्या शब्दाच्या मागे तो सङ्केत अुभा होतो. अुद्या असें समजा की जेथे या वस्तू प्रथम दिसतात तेथे त्यांना 'फुलपात्र' या शब्दाने सम्बोधण्यांत आलें तर 'फुलपात्र' या शब्दाच्या मागे तोच सङ्केत अुभा राहील की नाही? अवश्य अुभा राहील. आता 'फुलपात्र' या शब्दाच्या मागे आज विशिष्ट आकाराच्या पाणी पिण्याच्या भाण्ड्याचा सङ्केत अुभा आहे हें मी जाणतों. पण तो नव्या सङ्केताला बाधक होअीलच असें नाही. अेका शब्दाच्या मागे अनेक सङ्केत असूं शकतात. तसें नसतें तर भाषेंत अनेकार्थी शब्दच नसते. 'बरोबर' हा अेकच शब्द जर सङ्गें, योग्य, बिनचूक, नेमका या अनेकार्थांनी चालतो तर 'फुलपात्र' हा द्व्यर्थी कां चालूं नये?

या चळवळीचें वैयर्थ्य सिद्ध करण्यासाठी म्हणून जो अैतिहासिक पुरावा पुढे करण्यांत येतो तो लागू नसतो अथवा लटकाच असतो. असे प्रयत्न आजपर्यन्त करण्यात आले नि ते फसले हें जरी घटकाभर खरें मानिलें, तरी तेवढ्यावरून पुन्हा प्रयत्न करूं नये, जें जें होअील तें तें पहावें, हा निष्कर्ष काढणें शहाणपणाचें ठरत नाही. पूर्वी यश आलें नाही म्हणून पुढे येणार नाही असें थोडेंच आहे? आणि पुन्हा, निष्फलतेच्या भीतीने कर्तव्याचा त्याग करणें योग्य होअील का? वस्तुत: असे प्रयत्न पूर्वी झालेलेच नाहीत. जैमिनीच्या काळीं आजच्या सारखा प्रयत्न करण्याची आवश्यताच नव्हती; आणि यादवांच्या ऱ्हासानन्तर महाराष्ट्रांत जेव्हा अशी आवश्यकता अुत्पन्न झाली, तेव्हा अेखाद्या व्यक्तीला या अुपायाची अन्धुक कल्पना

आलेली असली तरी प्रयत्न असा झालाच नाही.

जैमिनीच्या वेळच्या वादाचें स्वरूप आजच्या वादाच्या स्वरूपाहून अगदी भिन्न होतें. ज्या संस्कृत भाषेंत काही अनार्य शब्द आले होते ती तेव्हा आर्यांची, जेत्यांची भाषा होती. मराठी ही जित महाराष्ट्रीयांची भाषा आहे. आर्यांनी अनार्य स्त्रियांशीं विवाह केले त्यामुळे काही अनार्य शब्द संस्कृतघरांत शिरले. अरबीफार्सी स्त्रियानी मराठी पुरुषाचे संसार थाटून त्याचे प्रपञ्च वाढविल्यामुळे का हे अरबीफार्सी शब्द घरांत घुसले आहेत ! मुसल्मानांनी महाराष्ट्रावर काही काळ राज्य केलें, आणि त्यांचे शब्द वापरण्यात मराठी लेखकांना अेकप्रकारची विद्वत्ता नि प्रतिष्ठा वाटली, म्हणून हे अरबी-फार्सी शब्द मराठींत माजले आहेत. पुन्हा, जे अनार्य शब्द संस्कृतांत आले त्यानीं मूळच्या संस्कृत शब्दांना मागे रेटिलें काय ! नाही. 'पिक' कोकिलाला खाअूं शकला नाही, 'पिलु' हस्तीला हात दाखवूं शकला नाही, अशा स्थितींत जेत्या आर्यांनी दाखविलेल्या औदार्याचा धडा जित अशा महाराष्ट्रीयांनी कसा गिरवावा !

शिवकालीं अष्टप्रधानांचीं नांवें संस्कृत ठेवण्यांत आलीं होतीं, यावरून त्या थोर छत्रपतीच्या मनांत ही कल्पना पुसट पुसट येअून गेली असावी. पण त्या प्रकरणीं जर त्याचें स्पष्ट काही धोरण असतें तर आज्ञापत्रांतून काही अुलेख मिळाले असते, आणि मग चिटणिसांची पत्रव्यवहारांत त्या धोरणाविरुद्ध वागण्याची प्राज्ञाच नव्हती. तेव्हाचा पत्रव्यवहार पाहतां तसें काही धोरण असेलसें वाटत नाही. जर प्रयत्नच झाला नाही तर त्याला यश आलें नाही या म्हणण्यात काही अर्थ नाही.

साम्प्रत सौन्दर्यवादाचे दिवस आहेत. तेव्हा ज्ञानप्रकाशकारहि अुपदेश करितात की " भाषाशुद्धीच्या मागे काय लागतां ! भाषासौष्ठवाकडे लक्ष द्या." परन्तु भाषासौष्ठव कशांत आहे याचा कोणी विचार करीत नाही. परकीय शब्द नकोत म्हणून नवीन निर्मिण्यांत आलेले शब्द कित्येकदा सुबोध, समर्पक नि उच्चारसुलभ नसतील; परन्तु तेच वापरले पाहिजेत

असा काही ज्यांनी त्यांना निर्माण केलें त्यांचा आग्रह नाही. अितरांनी अधिक समर्पक नि सुटसुटीत शब्द अवश्यमेव निर्माण करावेत.

परन्तु कित्येकदा केवळ अपरिचयामुळेच काही गोष्टी विरूप वाटतात. प्रथम जेव्हा मानेच्या खाली लोळणारे केस कापलेली, लाण्ड्या परकाराची नि उघड्या जङ्घांची आङ्ग्ल युवती मला मुम्बअीस दिसली, तेव्हा मला असाच धक्का बसला आणि सौन्दर्याची विटम्बना झाली असें वाटलें ! आता डोळ्यांना सवय झाली. अशा केशवेषाच्या स्त्रिया सुस्वरूपहि दिसतात; काही कुरूपहि वाटतात. तेव्हा अमुक अेक शब्द शब्दसौष्ठवाच्या दृष्टीने टाकाअू ठरवितांना अपरिचयामुळे होणारी फसगत ध्यानांत घेतली पाहिजे. अेका बङ्गल्याचें नाव 'विनायक-घर' असें मी प्रथम वाचलें तेव्हा मला सुद्धा कसेसेंच वाटलें. आश्रम, निवास, धाम, कुटीर अित्यादि संस्कृत आणि व्हिला, लॉज अित्यादि अिङ्ग्रजी शब्दांशीं सुपरिचय असलेल्या मला 'घर' हा घरगुती शब्द कसासाच वाटला ! परन्तु माजघर, शेजघर, देवघर, घण्टी-घर अित्यादि शब्दांत आढळणारा सुबोध आणि सुटसुटीत शब्द बङ्गल्याचें नांव म्हणून शोभावयाला काय अडचण आहे ! साङ्गलीचें 'अेक्स्टेन्शन', नागपूरचें 'क्रॅडॉक टौन,' मुम्बअीचें 'प्रॉस्पेक्ट हाअुस' या शब्दांप्रमाणे 'विनायक-घर' हा शब्द अुच्चारकठिण तरी नाहीच नाही.

सौन्दर्योपासना अवश्य आहे, पण ती कोणी आणि केव्हा करावी ! जेव्हा स्वास्थ्य आणि सामर्थ्य असेल तेव्हा ! मिरविण्यापेक्षा मिळविण्याचा विचार प्रथम केला पाहिजे. पोटाला कोरडें खाअून केसाला फुलेल पाजणें हें रसिकत्व नव्हे, हें रोगट मनोवृत्तीचें लक्षण आहे.

स्वत्वसंरक्षणदाद्याची भूमिका या सविस्तर विवेचनावरून स्पष्ट होअील. ही चळवळ स्वत्वसंरक्षणाची आणि स्वत्वसंवर्धनाची आहे. आमच्या भूमिके-वरून हवी ती क्रान्ति करावयाला वाव आहे. आम्ही अप्रागतिक नाही. पण कोणतीहि क्रान्ति आपणच आपल्या हितासाठी घडवून आणिली पाहिजे असा आमचा आग्रह आहे. परकीय शब्दांवरील बहिष्कार हें

स्वकीयांची आठवण व्हावी म्हणून योजावयाचें अेक साधन आहे, हें आमचें साध्य नव्हे. आमचा रोष अरबी-फार्सीवर आहे आणि अिङ्ग्रजीवर नाही, परकीय शब्दांवर आहे आणि परकीय रचनेवर नाही असें मुळीच नाही. आपलेपणाने मराठी वाङ्मयाचा, भाषेचा नि बोलींचाहि साङ्गोपाङ्ग अभ्यास होअील, तर ही चळवळ करावीच लागणार नाही.

'भाषाशुद्धि' हा शब्द मला स्वतःला मान्य नाही. यावरून तात्कालिक साधनाचा थोडा बोध होतो; पण जें साधावयाचें आहे त्याचा बोध होत नाही. या शब्दामुळे घोटाळाहि होतो. धर्मशुद्धि या अर्थी शुद्धि हा शब्द स्वीकारवाचक आहे, तर भाषाशुद्धीमध्ये तो बहिष्कारवाचक होतो. अिङ्ग्रजीतील 'प्यूरिझम्' या शब्दाचें हें निवळ भाषान्तर आहे !

'भाषाशुद्धि' हा शब्द वापरला की काही लोकांना आता सोवळें-ओवळें माजणार अशी भीति वाटते. त्यांना ज्या सोवळ्याओवळ्याची चिन्ता वाटते तें आमच्याजवळ नाही. मराठी भाषेला आम्हांला 'सोवळी गङ्गाभागीरथी' करावयाची नाही, असें आश्वासन आम्ही देतों. परन्तु ती 'अखण्डसौभाग्यवती'हि झालेली आम्हांला पहावणार नाही !

काही लोकांचा या शब्दाला विरोध आहे तो निराळ्या कारणासाठी आहे. 'भाषाशुद्धि' हा शब्द योजिल्याने आपण 'स्वतःव्यतिरिक्त अितर सर्व जनतेवर अशुद्धत्वाचा नि पतितत्वाचा आरोप" करितों अशी भीति 'ज्ञानप्रकाश'कारादि लोकाना वाटते. 'प्यूरिझम्' हा शब्द वापरतांना हा चमत्कार कां घडून येअूं नये ! चॉसरला जेव्हा दुसरा अिङ्ग्रज लेखक "Thou well of English undefiled" असें म्हणतो तेव्हा नाही कोणाचा पित्तप्रकोप होत ! परकीयांच्या भावना दुखावतील या भीतीने आम्हांला किती पछाडलें आहे याचें हें अुत्कृष्ट अुदाहरण आहे. आणि नवलाची गोष्ट ही की आपण मिअून जों जों जपतों तों तों काही लोकांच्या भावना अधिकाधिक हळव्या होतात. अुद्या आम्ही घरीं कोरान्न खाल्लें तरी सुद्धा या लोकांच्या पोटांत दुखूं लागेल; आणि आम्हांला केवळ यक-

ल्याने जरी झोप आली तरी त्यांचा निद्रानाश होओील ! मग या स्वाभाविक क्रियाहि करूं नयेत अथवा केल्या तर दुसऱ्यांच्या डोळ्यांवर येणार नाहीत अशा रीतीने चोरून कराव्या, असाहि अुपदेश करावयाला आमचे काही शान्तिब्रह्म स्थितप्रज्ञ चुकणार नाहीत ! हा भ्याडपणा पार टाकून दिला पाहिजे. सत्याग्रह हा निर्भीड असतो. आपल्या घरांत आपला संसार करावयाला जर चोरी होणार असेल तर मी

"डुमडुमत डमरु ये, खणखणत शूल ये !
शङ्ख फुङ्कीत ये येअि रुद्रा !"

असेंच मनोभावानें त्या 'शङ्कर' लयकर्त्याचें आवाहन करीन.

शेवटीं विनन्ती हीच की महाराष्ट्राचा विचार करा, मराठीचा साङ्गोपाङ्ग अभ्यास आपुलकीने करा, आणि प्रभावसम्पन्न व्हा.

# ९ भाषाशुद्धीची घोषणा[१]

दोन मरस नि मनोरञ्जक कार्यक्रमांच्या मध्ये माझें भाषण ठेवण्यांत आलें आहे ही माझ्यावर अेक आपत्तिच आहे. रुचिपालट व्हावा म्हणून कदाचित् हें भाषण असें मध्ये ठेवण्यांत आलें असेल; पण अशा सम्मेलनांतून अध्यक्षीय भाषण गाळूनच टाकलें तर तें मला वाटतें मुख्य पाहुण्याच्या आणि श्रोतृसमाजाच्याहि सुखाच्या दृष्टीने फार अिष्ट होअील. या कॉलेजांत मी आज प्रथम आलों आहें. परन्तु अनन्त काणेकर, के. नारायण काळे, गाङ्गल अित्यादि या कॉलेजातून बाहेर पडलेल्या साहित्यिकांच्या कृतींनी या कॉलेजाविषयीं माझ्या मनांत अेक प्रकारची आपुलकी कधीच अुत्पन्न झालेली आहे. अशा कॉलेजांतील मराठी वाङ्मयमण्डळाच्या वार्षिक सम्मेलनापुढे जें भाषण करावयाचें त्याच्यासाठी मी अेका प्रतिष्ठित विषयाची, रसव्यवस्थेचें वैयर्थ्य या विषयाची निवड केली होती. पण माझ्या विषयीं सहानुभूति बाळगणाऱ्या माझ्या येथील मित्रांनी अशी भीति व्यक्त केली की हा विषय जड होअील. याने अजीर्ण होअील. मला आपली ओळख बेताचीच असल्याने माझ्या हितचिन्तकावर विसम्बून मी आयत्या वेळीं तो विषय गाळीत आहें. मी अेक प्रचारक आहें हें आपण जाणतांच. पण आपल्या पाहुणचाराचा दुरुपयोग करून माझा प्रचार आपणांवर लादावा अशी माझी मुळीच अिच्छा नव्हती नि नाहीहि. तथापि निरुपाय म्हणून, आयत्या वेळीं विषयाची निवड फिरविल्यामुळेच मला आवडत्या विषयासम्बन्धी चार शब्द बोलावे लागणार आहेत.

आज सकाळीं दादरकडून बी. बी. च्या गाडीने मी चर्नीरोडला येत असतां

---

१ सेण्ट्झेविअर कॉलेजांत, ता. १९ सप्टेम्बर १९३७ या दिवशीं मराठी वाङ्मयमण्डळाच्या वार्षिकसम्मेलनप्रसङ्गी केलेलें अध्यक्षीय भाषण.

सहज माझी दृष्टि अेका पाटीकडे गेली. अेका डब्यावर For Women 'स्त्रियोने माटे' अशी पाटी होती. अिङ्ग्रजी आणि गुजराथी या दोन भाषांमध्ये दिलेली सूचना पाहून मला काही चमत्कारिक वाटलें नाही; पण 'स्त्रियांच्यासाठी' अशी सूचना मराठींत कां नाही याचें मात्र नवल वाटलें. मग मी सगळ्याच पाट्या पाहूं लागलों, तों त्या गुजराथी आणि अिङ्ग्रजी या दोनच भाषांत आढळल्या. रूळ ओलाण्डूं नयेत, पुलावरून जावें, या अर्थाची पाटीहि मराठींत नाही! का मराठी लोकाना या धक्क्यां-वर जावेंच लागत नाहीं?—[रङ्गभूमीवरील श्रोत्यांतून नाटककार वर्तक यांनी मध्येच विचारलें 'का ते मेले तरी चिन्ता नाही'?] महाराष्ट्रांत पाटी मराठी नसावी हें जितकें विचित्र, तितकेंच या अुणीवेची जाणीव या महाराष्ट्री-यांना नसावी हेंहि विचित्र आहे. चलनी नोटांवर पाच रुपये अशी मराठी भाषा तेवढीच नाही हें आपल्या ध्यानांत आलें आहे काय! भाषेविषयी आपण किती असावध आहों हें यावरून दिसून येअील. स्वतन्त्र देशांत जेथे भाषा-भाषांचा थोडाफार कलह आहे तेथे ही अनास्था दिसून येते काय!

बेल्जियम हें अेक स्वतन्त्र राष्ट्र आहे पण तेथे फ्रेञ्च नि फ्लेमिश या दोन भाषा चालतात. फ्लेमिश विभागांत ट्रॅमचें तिकिट देणाऱ्याने कोठें जायचें म्हणून जर फ्रेञ्च भाषेंत प्रश्न केला तर अुतारू अुत्तरच देत नाही. ज्या त्या भागांत सार्वजनिक सेवकांनी ज्या त्या भागाचीच भाषा बोलली पाहिजे, स्टेशनाच्या नांवाच्या पाटीवरील नांवांमध्ये ज्या त्या भागांतीलच नाव प्रथम पाहिजे,अित्यादि गोष्टींना तेथील लोक महत्त्व देतात. फ्लेमिश भाषा बोलणाऱ्यांसाठी ॲण्टवर्प येथे नवें विद्यापीठ स्थापिलें जात असतांना त्यांना तें नको; फ्लेमिश भागांतील घेण्ट या प्राचीन फ्रेञ्च विद्या-पीठाचें फ्लेमिशीकरण झालें पाहिजे असा फ्लेमिश भाषा बोलणाऱ्यांचा आग्रह आहे. अेकाच राष्ट्रांत अेका भाषेचें दुसऱ्या भाषेवर अतिक्रमण होत आहे आहे कीं काय हें ते लोक डोळ्यांत तेल घालून पहात असतात. व्यवहा-राच्या सोयीसाठी दोन भाषा शिकले असतांनाहि सुशिक्षित विद्वान् लोक

आपल्याला मातृभाषेव्यतिरिक्त दुसरी भाषा येत नाही म्हणून स्पष्ट सांग-तात. कां तर अमुक भाषा आता बहुसङ्ख्य लोकांना कळते, तेव्हा अितर भाषांच्याकडे सर्कार आंकडेशास्त्राच्या बळें दुर्लक्ष करूं लागेल याची त्यांना भीति वाटते; सर्कार लोकनियुक्त असूनहि ही भीति वाटते. ही जी स्वत्वसंरक्षणाची जागरूकता बेल्जम, आयर्लण्ड, झेकोस्लोव्हाकिया अित्यादि युरोपांतील देशांत दिसते ती हिन्दुस्थानांत दिसूं लागतांच आपल्या स्वातन्त्र्य वीरांना न्यूनगण्ड दिसूं लागतो ! अलीकडे 'व्यक्ति आणि वाङ्मय' या नांवाचें, क्षीरसागर यांचें जें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे, त्याच्या प्रस्तावनेंत श्रीयुत माडखोलकरांनी म्हटलें आहे की परकीयाच्या आक्रमणाविषयीची हिन्दूंची ही भीति वाङ्मयाच्या क्षेत्रांत अुदात्ततेचा आणि वीरवृत्तीचा आभास अुत्पन्न करणारें भाषाशुद्धीचें भम्पक नाव घेअून अलीकडे प्रकट झाली आहे ! निर्वीरमुर्वीतलं केल्यावर जगज्जेत्याची निश्चिन्त आत्मविश्वासी वृत्ति होते ती या प्रस्तावनाकारांची झालेली दिसते ! जागरूक असायला पाहिजे कीं नाही, परकीयांच्या आक्रमणाची भीति आहे कीं नाही याचा आपणच विचार करा.

आणि हा विचार प्रत्येकाने करावयाला पाहिजे. पूर्वी मराठी राज्यांत सर्दारांना जहागिरी सीमाप्रदेशांत देत असत. परचक्रापासून प्रथम या खासगी मिळकतीची नासाडी होण्याची भीति असल्याने सर्दारांना स्वार्था-साठी का होअीना पण सीमास्थानी डोळ्यांत तेल घालून जागें रहावें लागे. भाषेच्या सीमाप्रदेशांत असे वंशपरम्परा जहागिरदार नाहीत; आणि ते तसे नकोहि आहेत. भाषेचा प्रश्न प्रत्येकाचा जिव्हाळ्याचा आहे. तो केवळ विद्वानांचा वा सर्वज्ञ सम्पादकांचा नाही. भाषच्या शब्दसम्पत्तीची आपण स्वत्वसंरक्षणाच्या, स्वत्वसंवर्धनाच्या, स्वाभिमानाच्या नि स्वावलम्बनाच्या दृष्टीने पाहणी करा आणि पुढील प्रगतीच्या मार्गाची आखणी योग्य दिशेने करा. वाहवून जाअूं नका, हुरळूनहि जाअूं नका.

देशांत अेक भाषा असल्यावाचून तें राष्ट्रच होअूं शकत नाही अशी

सोयीची अडचण आपल्या आङ्ग्लप्रभूंनी दाखवून दिली की आपण लगेच राष्ट्रत्व आणण्यासाठी स्वभाषेवर पाणी सोडायला सज्ज होतों; आणि दुसरे तितके राष्ट्रीय नसल्याने आपली भाषा सोडण्याला वा पालटण्याला न सजल्यास त्यांचीच भाषा आपण आपली मातृभाषा म्हणून सेवायला पुढे धावतों ! स्वित्झर्लॅण्डादि कित्येक देशात अनेक भाषा असूनहि ते देश स्वातन्त्र्य, स्वराज्य आणि सुराज्य याचा अुपभोग घेत आहेत याचा आपणांला विसर पडतो. ही हुरळणूक आत्मघातकीपणाची आहे.

अलीकडे वर्तमानपत्रांतून खेडूत आणि किसान हे शब्द वावरूं लागले आहेत. या शब्दांना का हुरळता ! वल्लभभाअी पटेल आणि जवाहरलाल नेहरू याच्या जिव्हाग्री ते पुनीत झाले आहेत म्हणून ! मराठी शेतकऱ्याचें पुण्य सम्पलें कीं काय ! शेताचा आळशी धनी यालाहि कायद्याच्या भाषेंत शेतकरी म्हणतात; म्हणून स्वतः शेतात खपून धान्य पिकवणाऱ्यासाठी शब्द हवा असला, तर अितरांच्या तोण्डचा न घेतां, नगराच्या बाहेर पडा, शेतें कसणाऱ्यांनाच भेटून विचारा म्हणजे ते कर्दा हा शब्द साङ्गतील. हुरळून बहुजनसमाज परकी शब्द वापरूं लागला म्हणजे स्वकीयांविषयी आपुलकी अुणावते. खेडूत हा कर्द्याहून अधिक प्रतिष्ठित होअून बसतो. रहाटापेक्षा चर्खा असाच लब्धप्रतिष्ठ होऊन बसला आहे. असें झालें म्हणजे नामवन्त विचारी लेखकांचीहि दिशाभूल होते. श्री. नरसोपन्त केळकर याना [पहा सह्याद्रि ३-१-३०] हातरहाट हा शब्द आठवतो तरी; पण 'टकळी'च्या प्रभावामुळे 'चाती' हा शब्द आठवतच नाही.

सुशिक्षित पदवीधरांच्या घरात यज्ञोपवीताच्या सुतासाठी आता चात्या फिरत नाहीत; आणि जाळीं विणण्यासाठीं कोळी लोक अद्यापि चात्या फिरवीत असले तरी त्यांच्याशी आमचा काही सम्बन्ध येत नाही. चाती नाही तर नाही, पण टकळी मात्र देशभर चालत राहिल्याने नरसोपन्तांना टकळी हाच शब्द आठवतो ! श्रीयुत काकाजी कालेलकर हे पहावें तों सङ्घटना, सङ्घटित अशीं मराठी रूपें न वापरतां सङ्गठना, सङ्गठित

अशीं परकी रूपें वापरतात. हाहि या वेडगळ नि आत्मघातकी दुरळ-णुकीचाच परिणाम आहे.

म्हणून परकी गोष्टींनी दुरळून जाअूं नका असें माझें प्रथम साङ्गणें आहे. मराठी भाषेचें सामर्थ्य ओळखण्यास शिका. मातृभाषा येतेच आहे, तींत काय शिकायचें आहे, अशी भलतीच समजूत करून घेअूं नका. ज्यांनी मराठी वाङ्मयांत संस्मरणीय अशी भर टाकिली आहे त्यांनीहि मराठी भाषेचा नीट अभ्यास केलेला नाही हें विसरूं नका. स्वाभाविकपणें येत असलेलें तुटपुन्जें मराठी आणि अुच्चशिक्षणक्रमांत शिकावेंच लागलेलें संस्कृत अेवढ्या भाण्डवलावर त्यांनी आपला वाङ्मयप्रपञ्च थाटला आहे. संस्कृत ग्रन्थांचाहि अभ्यास मराठींतील आपल्या नडी भागविण्याच्या दृष्टीने झालेला नसतो. आपण आपलें वाङ्मय अिङ्ग्रजीचा ज्यांना गन्ध नाही अशा बहुसङ्ख्य मराठी लोकांसाठी लिहिलें पाहिजे, याचा त्यांना विसर पडतो. शुद्ध मराठी जाणणाऱ्या लोकांना सुवर्णमध्य, नक्राश्रु हे शब्द कळणें शक्य आहे काय ? श्री. नरसोपन्त केळकर यांच्या दृष्टीस कालिदासाने रघुवंशाच्या आठव्या सर्गात वापरलेला 'मध्यमक्रम' हा शब्द मी आणतांच त्यांना मात्र तो शब्द अधिक सुवर्णमय वाटला. प्राचीन ग्रन्थांचें वाचन करितांना ही दृष्टि ठेवली तर केवढी सम्पत्ति हातीं लागेल ! परवाच अेका व्याख्यानानन्तर आभार मानतांना श्रीयुत पाण्डुरङ्ग वामन काणे यांनी आपले शब्द आपण मरूं द्यावेत हें अिष्ट नाही असें स्पष्टपणें साङ्गताना 'प्राङ्न्याय' आणि 'अेकच्छायाश्रित' या न्यायदानाच्या परिभाषेंत अुपयोगी पडणाऱ्या दोन शब्दांची आठवण करून दिली. असे शब्द मराठी वाङ्मयांत काही थोडेथोडके सापडणार नाहीत. आपल्या 'व्यक्ति आणि वाङ्मय' या ग्रन्थांत लोकहितवादींच्या अन्तरङ्गाचा आणि लेखनप्रपञ्चाचा अुत्कृष्ट परिचय करून देणारे श्रीकृष्ण केशव क्षीरसागर यांना 'अम्मलबजावणी' या शब्दाला मराठी प्रतिशब्द कोणता म्हणून विचारलें तर साङ्गतां येईल की नाही याविषयी मला शङ्का वाटते. पण त्यांच्याच ग्रन्थांत त्यांनी जे लोकहितवादींचे अुतारे दिले आहेत त्यांतील

अेका अुताऱ्यांत 'वहिवाट' हा शब्द अम्मलबजावणी या अर्थानें वापरलेला दिसेल. लोकहितवादी म्हणतात की "पार्लमेण्ट हे कायदे फर्मावितात तेव्हा राजा त्याबरहुकूम वहिवाट करितो". [पृ. २०]

ग्रन्थांचाच अभ्यास या दृष्टीने केला पाहिजे असें नव्हे. अशिक्षितांच्या बोलीचाहि अभ्यास तितक्याच महत्त्वाचा आहे. पूर्वी सुशिक्षितांच्या घरांत अशिक्षित बायकांची भाषा अशुद्ध असली तरी घरगुती मराठी वळणाची असे. स्त्रिया विदुषी होतांक्षणीं त्यांची भाषा पुरुषांच्या भाषेअितकीच कृत्रिम आणि आङ्ग्लशब्दमिश्रित अशी होअूं लागली आहे. हें सुशिक्षितांना अत्यन्त लाञ्छनास्पद आहे. आता अशिक्षितांच्या भाषेंतच आपल्याला मराठमोळा आढळणार आहे. राव सावरकर यांना शिकारी शब्द वापरावयाचा नाही, तेव्हा मृगयु हा शब्द सुचतो, पण पारधी हा मराठी शब्द आठवत नाही. भाषाशुद्धिमण्डळालाहि चेहरा या शब्दाला प्रतिशब्द सुचवितांना संस्कृत शब्द सुचतात पण मराठी तोण्डवळा आठवत नाही. अशी विपर्यस्त स्थिति आहे. येरवाळी, नदीबूड, गाळवट अित्यादि भूमिविषयक आणि अितर शब्द तर आपण अशिक्षितांच्या भाषेंतूनच शिकले पाहिजेत.

शब्दसिद्धीच्या प्रकरणींहि आपली अनास्था दिसून येते. ग्रान्थिक भाषेंत येणाऱ्या नडी भागविण्यासाठी आपल्या विद्वानांनी सहानुभूतीसारखे जे शब्द सिद्ध केले आणि मर्यादितच का होअीना जें स्वावलम्बन प्रगट केलें त्यासाठी त्यांचें आपण आभारी राहिलें पाहिजे. पण मराठीची म्हणून निराळी अशी शब्दसिद्धि आहे हें आपण विसरूं नका. या मराठी शब्दसिद्धीप्रमाणे जर शब्द सिद्ध करण्यांत आले तर ते सुटसुटीत नि अर्थपूर्ण होतात असा अनुभव आहे. जलान्तःसञ्चारिणी नौका या मालगाडीसारख्या शब्दापेक्षा पाणबुडी हा शब्द तत्काळ रूढ झाला. या यशाचें रहस्य मराठी शब्दसिद्धीच्या वैशिष्ट्यांत आहे. अग्निरथापेक्षा आगगाडी हाच शब्द मराठी आहे आणि रूढहि झाला आहे. परन्तु व्यवहारांत सहस्रावधि नडी येणार त्या

भागविण्यासाठी मराठी शब्दसिद्धीप्रमाणे शब्द न बनविण्यांत आल्यामुळेच अिङ्ग्रजी शब्द घुसून अपरिहार्य होअून बसले. 'अिलेक्ट्रिक टॉर्च' या अुच्चारकठिण शब्दापेक्षा विजेची दिवटी हा श्रेयस्कर आहे कां नाही पहा. 'बल्ब'ला फुगा कां म्हणत नाही! प्रत्ययांचा अुपयोग करून त्यांना जिवन्त ठेविलें तर किती तरी नवे शब्द सिद्ध करतां येतील. 'मेहनताना' मधील 'आना' हा प्रत्यय दुसऱ्या कोणत्या शब्दांत आढळतो! पण कष्टावळ हा शब्द वापरला तर हुण्डणावळ, शिवणावळ अित्यादि किती तरी शब्दांत असलेला '–आवळ' हा प्रत्यय वापरलेला आहे हें तत्काळ ध्यानांत येतें.

आपल्या लोकांत आळस आणि हुरळणूक हीं वाढलीं. मराठी शब्दांची, प्रत्ययोपसर्गांची विस्मृति होअूं नये, स्वकष्टाने स्वतःच्या पायावर अुभें राहून आपण आपल्या नडी भागाविण्यास शिकावें, या स्वावलम्बनाने आपला पराक्रम वाढावा म्हणून अेक प्रकारची कृत्रिम अडचण अुत्पन्न करण्यासाठी आमची परकी शब्दांवरील बहिष्काराची घोषणा आहे. खुशाल हा शब्द वापरावयाचा नाही असें मनाशीं ठरवून स्वतःला अडचणींत घातल्याविना 'सुखरूप' हा शब्द आठवत नाही असा अनुभव आहे. तेव्हा बहिष्काराच्या घोषणेने बिचकून जाण्याचें कारण नाही.

बेगडी अैट, अुसनी श्रीमन्ती आपल्याला नको. सौन्दर्यलालसा ही स्पृहणीय असली तरी स्वावलम्बन अधिक महत्त्वाचें आहे. म्हणून साङ्गतों, मिरविण्यापेक्षा मिळविण्याची महत्त्वाकाङ्क्षा बाळगा. शहाजीमहाराज आपल्या अेका पत्रांत विजापूरच्या आदिलशहास म्हणतात "की आम्ही गैरहिसाबी जाजती सोसून कम-अिजतीन व गैरमेहेरबानीन पेशजीहि खिदमत केली नाही व पुढेहि न करूं." ही भाषापद्धति नव्हे तर या भाषेंतील स्वाभिमान हा आपण घेतला पाहिजे. राष्ट्रसेवा करायला आम्ही सजूं नये असें नाही; पण अप्रतिष्ठा केव्हाहि सहन करतां कामा नये.

# १० आमचा साहित्यसंसार[1]

'आमचा साहित्यसंसार' या मथळ्याचा अेक लेख प्रा. श्री. ना. बनहट्टी यांनी भारतीय साहित्यपरिषदेचें मराठी मुखपत्र जें 'विहङ्गम' मासिक त्याच्या डिसेम्बर १९३६ च्या अङ्कात लिहिला आहे. या लेखांत त्यांनी भाषाशुद्धीच्या चळवळीचें फार समतोल बुद्धीने परीक्षण केलें असून हा लेख प्रतिपक्षाला हटकून विचार करावयास लावील अशा आहे. तात्त्विक वादविवाद जर अशा रीतीने चालतील तर त्यांत पडण्यास कोणालाहि अुल्हास वाटेल; नि तत्त्वबोध व्हावयालाहि फारशी अडचण पडणार नाही.

भाषाशुद्धिवाद्यांची, निदान माझी तरी, भूमिका श्री. बनहट्टींना अद्यापि कळलेली नाही, हें आरम्भींच साङ्गून टाकिलें पाहिजे. अिङ्ग्रजी-फार्सी शब्दांचा बहिष्कार हें स्थूल मानाने भाषाशुद्धीच्या चळवळीचें स्वरूप आहे असें त्यांना वाटतें. परन्तु हें अेक तात्पुरतें साधन आहे, साध्य नव्हे. खरें अुद्दिष्ट याहून व्यापक नि निराळें आहे. ही भाषाविषयक जागृति आहे, स्वाभिमान नि स्वावलम्बन या दृष्टीने ही भाषेची पाहणी नि पुढील मार्गाची आंखणी आहे. यांत स्वभाषाभिमान आहे, स्वदेशाभिमान आहे, पण स्वजात्यभिमान कोठेहि नाही. मराठी भाषेला स्वभाषा मानून मराठी बोलणाऱ्यांना जे आपले समजतात अशा लोकांच्या समुदायाचा अभिमान बाळगून त्यांच्या अभ्युदयाची काळजी वाटणें हें मला तरी सङ्कुचित स्वार्थाचें वा जात्यन्धतेचें वाटत नाही. श्री. विनायकराव सावरकर हिन्दुधर्माभिमानी आहेत, मलाहि स्वधर्माभिमानशून्यता हें काही सुसंस्कृतपणाचें किंवा राष्ट्रीयत्वाचें द्योतक आहे असें वाटत नाही. तथापि भाषाशुद्धिप्रक-

---

१ हें अुत्तर लोकशिक्षण मासिकाच्या आक्टोबर १९३७ च्या अङ्कांत आलें होतें. मूळ लेख माझ्या अवलोकनांत फार अुशीरा आल्यामुळे अुत्तराला अुशीर झाला.

रशी सावरकराचा दृष्टि जशी स्वधर्माभिनिवेशाची आहे तशी माझी नाही; माझी दृष्टि स्वाभिमानी स्वभाषासमुन्नतीची आहे, हें मी आज दहा वर्षें तरी स्पष्टपणें दाखवून देत आलों आहें. ज्याला तिकडे बुद्धया काणाडोळा करावयाचा असेल त्याने सुखेनैव करावा.

मराठी भाषेची तीन अङ्गांनी हानि झालेली आहे. बोलींत जेवढे शब्द असतात ते सारेच ग्रान्थिक भाषेंत असतात असें नाही. परन्तु मराठीच्या ग्रान्थिक भाषेंत असे किती तरी शब्द आहेत की जे आता प्रचारांतून पार गेले आहेत. हे सगळे स्वाभाविक मरणाने मेले असतील असें मला वाटत नाही. कित्येक आमच्या अुपेक्षेमुळेच मागे पडून नाहीसे झाले आहेत.

अशिक्षित समाजाच्या मराठी बोलींत किती तरी प्रभावसम्पन्न नि कार्यक्षम असे शब्द आहेत; पण संस्कृतीच्या खोट्या कल्पनेमुळे आम्हांला त्यांचा अुपयोग करणें हीनतेचें लक्षण वाटतें. ज्यांच्या बोलींत हे शब्द आहेत ते हळूहळू शिकले की त्यांनाहि असेंच वाटूं लागतें आणि मग हे निरपराध शब्दहि नाहीसे होतात. 'धकणें', 'गावणें' अित्यादि शब्द मी वापरतों, तर त्याच्याविरुद्ध हाकाटी होते. हाकाटीची चिन्ता केली नाही तरी अेकट्याच्याने काय होणार ! येथे सामुदायिक चळवळीचें सामर्थ्य पाहिजे. नाही तर या अशिक्षितांच्या बोलींतील मराठी शब्दांचें भवितव्य काही शुभ नाही.

कालान्तराने नवनव्या नडी अुपस्थित होतात, नवनव्या शब्दांची आवश्यकता भासूं लागते. हे शब्द कोठून तरी आयतेहि घेतां येतात; आणि स्वावलम्बनाने नि स्वकष्टाने मराठी प्रत्ययोपसर्ग नि शब्द यांच्यापासून साधतांहि येतात. दोन्ही मार्गांनी कार्यसिद्धि होते; पहिला मार्ग सोपा आहे, दुसरा मार्ग आरम्भीं तरी कष्टाचा आहे. पण पहिल्या मार्गाने गेल्यास भाषेचें नवनवे शब्द निर्माण करण्याचें सामर्थ्य घटतें. अर्थात् दुसरा मार्गच श्रेयस्कर आहे याविषयी वाद नाही.

आता मेल्या अर्धशतकांत मराठींत नवीन शब्द अगदीच निर्माण

करण्यांत आले नाहीत असें नाही. सुशिक्षितांनी संस्कृत शब्दघटकांपासून आपणांला हवे असलेले शब्द—वातावरण, सहानुभूति यांसारखे—सिध्द करून घेतले. मराठीच्या शब्दसम्पत्तींत ही नवीन पडलेली भर स्पृहणीय नाही असें मी म्हणत नाही. या शब्दसिद्धींत जी स्वावलम्बनाची प्रवृत्ति दिसून आली तिचेंहि मी अभिनन्दन करितों. पण ही स्वावलम्बनी शब्द-सिद्धि सुशिक्षितांना ग्रान्थिक भाषेंत येणाऱ्या अडचणीपुरती झाली; आणि तिने संस्कृत प्रत्ययोपसर्गांचा नि शब्दांचा परामर्श घेतला. असंस्कृत मराठी शब्दांपासून 'आगकाडी', 'आगगाडी'सारखे अेरव्हीच्या व्यावहारिक अड-चणी भागविणारे शब्द थोडेच निर्माण झाले. व्यावहारिक अडचणी भागविणाऱ्या शब्दांचीच तर नड पदोपदीं असते. पुनः मराठी शब्दघट-कांचा वारंवार अुपयोग न करण्यांत आल्याने मराठी शब्दसिद्धि मागे पडली. भाषेची सर्गशक्ति तितकी क्षीण झाली. लेखकांचें, ग्रन्थकारांचें काम कसें तरी चालत आलें. मराठी शब्दसम्पत्तीची पाहणी करण्याची नडच त्यांना कधी भासली नाही. संस्कृत भाषेचा अभ्यास झाला; पण मराठी भाषेकडे नि वाङ्मयाकडे जें दुर्लक्ष झालें त्याचा हा विपरीत परिणाम झाला.

मराठी भाषेची अशी तीन अङ्गांनी हानि चालली आहे. (१) मराठी वाङ्मयांत येणाऱ्या शब्दांच्याकडे दुर्लक्ष होत आहे; (२) अशिक्षित समा-जाच्या बोलींतील प्रचलित नि अर्थपूर्ण अशा शब्दांच्याकडे दुर्लक्ष होत आहे; आणि (३) मराठी शब्दघटकांच्याकडे नि शब्दसिद्धीकडे दुर्लक्ष होत आहे. अुलटपक्षीं, ग्रान्थिक भाषेंत येणाऱ्या अडचणीपुरती का होअीना, पण संस्कृतांतून नवे शब्द सिद्ध करून घेअून योजण्याची प्रवृत्ति काही लेख-कांत आहे. परन्तु या मर्यादित प्रवृत्तीचा परिणाम व्यवहाराच्या भाषेवर अद्यापि होत नाही. आधुनिक मराठींत अिङ्ग्रजी शब्द सुशिक्षितांच्या जिव्हाग्रीं बळावून तेथून ते अशिक्षितांच्याहि जिव्हाग्रीं येअूं लागले आहेत नि ते दृढमूल होअूं पहात आहेत. अशा वेळीं सामाजिक जागृतीची, सार्वत्रिक स्वावलम्बनाची अत्यन्त आवश्यकता आहे. ग्रान्थिक भाषा अेकन्दरीने पाहतां

अद्यापि शुद्ध आहे अेवढ्यावर सन्तुष्ट न रहातां सर्व सुशिक्षितांचा दृष्टिकोण पालटेल, त्यांचें त्रिविध दुर्लक्ष नाहीसें होअील आणि आमची व्यवहाराचीच भाषा अधिक मराठी होअील अशी काही तरी व्यापक चळवळ पाहिजे आहे. अिङ्ग्रजी-फार्सी शब्दांवरील बहिष्काराची घोषणा ही सार्वत्रिक जागृति आणण्यासाठी केलेली आरडाओरड आहे. आमच्या वृत्तींत योग्य तो पालट झाला, आमची अुदासीनता नि परधार्जिणेपणा हीं नाहींशीं झालीं, सङ्घर्षामुळे शब्दांचें दळणवळण आणि जनन-मरण हीं स्वाभाविकपणेंच होअूं लागलीं की मग चिन्ता करावयाचें काही कारण अुरणार नाही.

स्वकीयांची आम्हांला आठवण न होतां परकीयांची होते आणि खुळावून आम्ही परकीय शब्द कसे वापरतों याचें अगदी अलीकडील अुदाहरण देतों. महाराष्ट्रांतील शेतकऱ्यांच्या अेका संस्थेचें नांव 'खेडूत-सङ्घ' असें आहे. तें आता वर्तमानपत्रातून झळकूं लागलें आहे. 'शेतकरी-सङ्घ' न म्हणतां गुजराथींतून 'खेडूत' हा शब्द घेण्याची आवश्यकता का भासावी? हा राजकारणांतील झोक्याचा परिणाम आहे काय? कदाचित् 'शेतकरी' याचा अर्थ 'शेती करणारा' असा न होता 'शेताचा स्वामी' असा होअील अशी भीति वाटत असल्यास मराठींत शेत कसणाऱ्याला 'कर्दा' शब्द आहे तो न आठवतां 'खेडूत' कां घ्यावासा वाटतो! मराठींत 'किसान', 'कास्तगार' अित्यादि शब्द कां डोकावूं लागले आहेत! 'रहाटा'पेक्षा 'चर्खा' हा शब्द कां प्रसृत झाला आहे! श्री. नरसोपन्त केळकरांना 'हातरहाट' हा शब्द आठवतो; पण आता जागृति झाल्यावरहि 'चाती' हा शब्द आठवत नाही; ते 'टकळी' शब्द वापरतात. हा कशाचा परिणाम आहे! श्री. काकाजी कालेलकर 'सङ्घटना', 'सङ्घटित' याच्या ठिकाणीं मराठींत 'सङ्गठना', 'सङ्गठित' हीं अशुद्ध रूपें कशामुळे वापरतात! खुळावून अनेक लोक अेखादा शब्द वापरूं लागले की नरसोपन्तांच्यासारख्या कलावान् सुज्ञ लेखकाचीहि दिशाभूल होते!

वक्त्यांना नि लेखकांना मराठी शब्दांची आठवण ठेवावयाला लावणें,

त्याना वाङ्मयांतील अुपयुक्त शब्द शोधून काढावयास लावणें, आणि त्यांच्या-मध्ये आपल्या अडचणी आपल्या पायावर अुभें राहून दूर करण्याची प्रवृत्ति अुपजविणें, हे या भाषाशुद्धीच्या चळवळीचे हेतु आहेत. "अमुक शब्द वापरूं नका" असें म्हणून अडचण अुत्पन्न झाल्यावांचून प्रयत्न होत नाही; आणि प्रयत्नावांचून मराठी शब्दांची अुपस्थिति होत नाही. अशा स्थितींत वेशीवर दुःख टाङ्गण्याप्रमाणे बहिष्काराची घोषणा ही करावीच लागते.

अिङ्ग्रजी शब्दांचा वाद मिटणें बनहट्टी यांना जितकें सोपें वाटलें तितकें मला वाटत नाही. "साधारणपणें कोणीहि विचारी मनुष्य लिहूं लागला असतां अिङ्ग्रजी शब्दांनी व्यक्त होणाऱ्या कल्पनेस मराठी प्रतिशब्द शोधून काढण्याची आणि अुपलब्ध नसेल तर संस्कृतांतून नवा बनवून वापरण्याची धडपड करितो" हें बहुतांशीं खरें आहे. पण बोलतांना तो तशी काहीच धडपड करीत नाही आणि प्रवाहपतिताप्रमाणे वागून पर्यायाने बोली दूषित करावयाला साह्य करितो हेंहि तितकेंच खरें आहे. पुनः त्याला संस्कृत शब्द आठवतात, मराठी शब्द आठवतातच असें नाही. सावरकरांना 'शिकारी' नको तेव्हा 'मृगयु' आठवतो, पण 'पारधी' आठवत नाही ही स्थिति अनर्थावह आहे. 'शिकारी'पेक्षा मला 'मृगयु' चालेल; परन्तु 'पारधी' मागे पडत असला तर हा 'मृगयु' नको. तेव्हा अिङ्ग्रजी शब्द मराठी भाषा बोलतांना आम्ही मुळीच वापरणार नाही अशी शपथ घेअून तिला जागणारे सुशिक्षित जेव्हा सहस्रावधि निघतील तेव्हाच अिङ्ग्रजीचा प्रश्न मिटण्याच्या मार्गाला लागेल. तोंपर्यन्त मराठीवरील हें भयङ्कर सङ्कट टळत नाही.

अिङ्ग्रजी शब्दांच्या प्रकरणीं बनहट्टी माझ्याहून अधिक आशावादी असले तरी चिन्ता नाही. त्यांनी व्यवहाराची मराठी बोली शुद्ध करण्याच्या कामीं परिश्रम घ्यावेत आणि येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठी मराठी शब्द शोधून वा बनवून लोकांच्या पुढे पुढे करावेत. मी त्यांचा फार फार ऋणी होअीन. तें कार्यहि भाषाशुद्धीच्याच क्षेत्रांतील आहे. कार्याला आरम्भ

केल्यावांचून त्यांनाहि अडचणींची जाणीव होणार नाही.

बनहट्टी यांना अिङ्ग्रजी शब्दांचें अुच्चाटन सामान्यत: इवें आहे, पण फार्सी शब्दांचें अुच्चाटन अगदी नको. यांत विसङ्गति आहे असें म्हणण्यांत त्यांना अेक मोठाच हेत्वाभास दडलेला दिसतो. ते म्हणतात, "अेखादी नापसन्त गोष्ट पुढे घडून येणारी असेल तर तिचा आगाअू बन्दोबस्त करणें हें अगदी योग्य. परन्तु तीच गोष्ट जर अगोदरच होअून चुकली असेल तर ती अुलथवून टाकली पाहिजे असें त्यावरून निष्पन्न होत नाही." अेखादी अनिष्ट गोष्ट पुढे घडून येणारी असेल तर तिचा वेळींच परिहार केला पाहिजे हें योग्य. परन्तु ती गोष्ट अनिष्ट आहे हें आपण परिणामाकडे दृष्टि देअूनच म्हणतों ना! मग अनिष्ट गोष्ट घडून येणारी असली म्हणजे तिचे वाअीट परिणाम होण्याची भीति असते; आणि ती होअून चुकली की तिचे वाअीट परिणाम होअूं शकत नाहीत असें बनहट्टी यांना वाटतें काय! जर वाअीट परिणाम झाले असले वा होत असले तर ती अनिष्ट गोष्ट होअून चुकली अेवढ्यासाठी तिची गय करावी काय! ती अुलथवून टाकिली पाहिजे हें ओघानेच येतें. तिच्यापासून वाअीट परिणाम होत नसले तर तिला अनिष्ट म्हणणेंच चुकीचें आहे. झालेली गोष्ट अुलथविणें अशक्य असल्यास ती गोड करून घेण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति असते; परन्तु तेवढ्याने ती गोष्ट जात्या मधुर ठरत नाही. बनहट्टी आपल्या विचारसरणीच्या पुष्टयर्थ अेक दृष्टान्त देतात: "वधूवरांचा विवाह परस्परसम्मतीनेच घडून आला पाहिजे असें तत्त्व प्रतिपादन करणारा सुधारक लग्न न केलेल्या तरुणांना आपला अुपदेश अवश्य करील. परन्तु अेखाद्या तरुणाचें काही दडपणामुळे अथवा चुकीमुळे त्यास असम्मत असलेल्या वधूशीं लग्न होअून चुकलें, आणि त्यानन्तर त्या दाम्पत्याने चिरकाल अेकत्र नान्दणूकहि केली तर अशा स्थितींत तोच सुधारक नवऱ्याला बायकोस टाकून देण्याचा अुपदेश कधीहि करणार नाही, आणि त्याने केला तरी तो संसारी पुरुष त्यास मुळीच मान तुकवणार नाही." हें

अुदाहरण लागूच पडत नाही. संम्मतिविवाहाचा अुपदेश कां करावयाचा, तर त्यापासून पुढे सुख होण्याचा सम्भव अधिक म्हणून. आता अेखाद्याचें लग्न त्याला असम्मत अशा वधूशीं झालें, पण संसार पुढे सुखाचा चालला तर अशा स्थितींत नवऱ्याची पूर्वीची असम्मतिच चुकीची ठरते सम्मतिविवाहाचें जें अुद्दिष्ट तेंच साधलें असल्याने "बायकोला टाकून दे" असा अुपदेश कोणताहि सुधारक करणार नाही. परन्तु समजा, संसार दीर्घकाल चालला आहे, मुलेंबाळेंहि झालीं आहेत पण सुख नाही, अत्यन्त असुख आहे, अशा स्थितींत कोणता सुधारक 'बन्धमोक्ष' करून घ्या म्हणून साङ्गणार नाही! आणि सोय असल्यावर कोणतें माणूस तिचा अुपयोग करून घेणार नाही! तेव्हा जे दुष्परिणाम होतील या भीतीने अिङ्ग्रजी अथवा अितर परकीय भाषांतील घुसूं पाहाणाऱ्या शब्दांस आंत येअूं देअूं नये असें बनहट्टी यांनाहि वाटतें तेच दुष्परिणाम झाले आहेत, होत आहेत, यासाठी फार्सी भाषेंतील पूर्वीच येअून बसलेल्या शब्दांचेंहि अुच्चाटन करणें अवश्य आहे, असें प्रतिपादन करणे यांत कोठेंहि विसङ्गति नाही. अन्याय होअूं देअूं नये, होत असल्यास त्याचा प्रतिकार करावा; पण जो अन्याय मागे होअून गेला, पचला, त्याचें निराकरण करण्याचा प्रयत्न वर्तमानकालीं कशाला! अुगीच वाअीटपणा कशाला घ्या! अशी वृत्ति कित्येक लोकात आढळते तीच बनहट्टी याच्या विचारसरणींत दिसत आहे.

'फॅशन्' आणि 'मिशन्' या दोनच शब्दांवर भाष्य करून परकीय शब्द हे स्वकीय शब्दांना मागे सारून पुढे आलेले नाहीत असें सिद्ध करण्याचा प्रयत्न बनहट्टी यांनी केला आहे. ते म्हणतात "हे दोन्ही ज्या विशिष्ट कल्पनांचे द्योतक आहेत त्या कल्पना सुसंस्कृत व्यक्तीच्या मनांत व सामाजिक व्यवहारांत असल्याच पाहिजेत अितक्या सामान्य आहेत. तथापि त्यांचे समानार्थक शब्द आपल्या भाषेंत नाहीत हेंहि तितकेंच खरें आहे. अिङ्ग्रजी भाषेचा परिचय होण्यापूर्वी आपल्यांत 'फॅशन्स' नव्हत्या असें थोडेंच आहे! त्याचप्रमाणें शङ्कराचार्य, मध्वाचार्य, रामदास यांसारखे

जबरे स्वमतप्रचारक होअून गेले असतां 'मिशन्' या शब्दाने व्यक्त होणारी वस्तु आपल्यांत नव्हती असें म्हणण्याचें धारिष्ट कोण करील !''

परन्तु येथे अेक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे ती ही की अेखादी गोष्ट अस्तित्वांत असली तरी सम्भाषणांत ती अुल्लेखित होतेच असें नाही, आणि ती सम्भाषणांत अुल्लेखित झाली तरी ती ग्रान्थिक भाषेंत येतेच असें नाही. पूर्वीच्या काळीं वेळोवेळीं काही गोष्टी तात्पुरत्या प्रचारांत येअून नामशेष झाल्या असतील; परन्तु पुष्कळ लोकांनी अेखाद्या गोष्टीचा पुरस्कार वा स्वीकार हा सोय म्हणून नव्हे, तर हुरळून दिखाअू सामाजिक प्रतिष्ठेसाठी करावा, या प्रकाराला नाव देण्याची आवश्यकता भासली नसेल. तथापि 'फॅशन्' हा शब्द प्रचारात येअूं लागून या प्रकाराला मराठी नाव देण्याची आवश्यकता भासूं लागली त्या वेळीं 'ढङ्ग' प्रथा' 'प्रचार', 'खूळ' वा 'टूम' यापैकी अेखादा शब्द चप्खल नसूनहि 'फॅशन्' या अर्थाने वापरावयाला आरम्भ करण्यास अडचण नव्हती. तसा प्रयत्न अेकाने केला असता, पुष्कळांनी केला असता, म्हणजे तोच शब्द आज चप्खल वाटला असता. 'आगगाडी' हा शब्द तरी कोठे अितका अन्वर्थक आहे ! परन्तु तो 'बाष्पयन्त्राकृष्ट-रथमालिका' या अन्वर्थक शब्दापेक्षा अधिक स्वीकरणीय वाटतो ना ! 'फॅशन्' या सामान्य अर्थाने 'प्रथा' हा शब्द रूढ होअूं शकला असता; आणि चाङ्गल्या नि वाअीट अर्थांनी 'टूम' नि 'खूळ' हे शब्द रूढ होअूं शकले असते. हे रूढ होअूं शकले नाहीत याला कारण 'फॅशन्' शब्दाची मोहनी हेंच होय. मग 'फॅशन्'ने 'प्रथा', 'खूळ' नि 'टूम' यांना मागे सारून, म्हणजे पुढे येअूं न देतां, स्थान पटकावलें असें म्हणण्यात चूक कोठे आहे !

आणि 'मिशन्' या शब्दाची तर कल्पनाच नवीन आहे. पूर्वी मतप्रसार, पन्थप्रसार होत असे यांत वाद नाही. परन्तु तो बहुशः मठाधिपतीकडून अथवा त्याच्या शिष्यांकडून होत असे. अर्थात् मतप्रसारकाचा किंवा मतप्रसारक संस्थेचा अुल्लेख स्वामी वा शिष्य वा मठ या शब्दाने होअूं शके.

आपत्तिनिवारणाच्या, शिक्षणदानाच्या वा रुग्णोपचाराच्या मिषाने धर्माचा प्रसार करण्यासाठी निघालेल्या संस्था तेव्हा नव्हत्या, आणि हें काम करणारे वेतनधारी सेवकहि नव्हते. पुढे अिङ्ग्रजांच्या अशा संस्था हिन्दुस्थानांत काम करूं लागल्या, तेव्हा त्यांच्या विरुद्ध काम करणारे 'आश्रम' हिन्दुस्थानांत स्थापन होअून बलिष्ठ झाले असते तर न जाणों' 'आश्रम', 'आश्रमी' या शब्दांनाच नवीन अर्थ प्राप्त झाले असते. परन्तु परकीयांच्याच संस्थेचा आणि त्या संस्थेंतील प्रचारकांचा अुल्लेख करण्याची पाळी आमच्यावर आल्याने विशेषनामाप्रमाणे 'मिशन्', 'मिशनरी' हे शब्द योजण्यांत येअूं लागले.

'मिशन्'ची कल्पनाच नवीन असल्याने 'मिशन्' या शब्दाने प्राचीन अेखादा शब्द मारिला नाही हें मान्य आहे. 'फॅशन्' शब्दाची स्थिति तशी नाही. तरी 'मिशन्'सारख्या अेक दोन शब्दांच्या अुदाहरणांवरून फार्सी शब्द हे मराठी शब्दांस मारून रूढ झालेले नाहीतच असें अनुमान काढणें तर्कशुद्ध नाही हें बनहट्टींना तरी सुचवायला नको. ते म्हणतात की "'फॅशन्'च्या नि 'मिशन्'च्या अर्थाचा वाक्यप्रयोग आपल्या भाषेंत मूळचा नाही. त्या शब्दांनी व्यक्त होणाऱ्या कल्पनातन्तुसमूहाची स्वतन्त्र जुळणी करून त्यास अेक विशिष्ट नांव देण्याची आवश्यकता अिङ्ग्रजांचा परिचय होअीपर्यन्त आपल्या समाजास भासत नव्हती. हाच युक्तिवाद रुळलेल्या फार्सी शब्दांना लाविला तर असें अनुमान क्रमप्राप्त होअील की त्यांपैकी बहुसङ्ख्य शब्द त्यांचे समानार्थक प्रतिशब्द भाषेंत त्या वेळीं अस्तित्वांत नसल्यामुळे प्रचारांत आले असले पाहिजेत."

पण हातच्या कांकणास आरसा नको. शब्दांची निवड न करतां पुष्कळसे फार्सी शब्द घेअून त्यांपैकी बहुसङ्ख्य शब्द त्यांचे समानार्थक प्रतिशब्द भाषेंत त्या वेळीं अस्तित्वांत नसल्यामुळेच प्रचारांत आले आहेत कीं काय ते पाहूं. अुदा. 'ज'काराने प्रारम्भ होणारे शब्द घेअून पारखून पाहूं. शब्दांच्या पुढे कंसांत त्यांचे मराठी प्रतिशब्द दिले आहेत. अेकूण शब्द ६७ आहेत ते येणेंप्रमाणेः—जकात (पट्टी), जखम (घाव, क्षत, दुखापत), जर्जी

(मोठा, भव्य), जड--जवाहीर (सोनें-रत्नें), जनानखाना, जनाना (अन्तःपुर), जनानी (बायकी, स्त्रैण), जनावर (प्राणी, पशु,) जप्त (राजाधीन), जबर (भारी), जबर्दस्त (भारी, बलाढ्य), जबानी (साक्ष), जबाब (अुत्तर), जबाबदार (अुत्तर-दायी), जबाबदारी (भार, 'वक्तव्यता'),जम्बिया (सुरा), जम (बस), जमणें (मिळणें, अेकवटणें), जमाखर्च (आयव्यय), जमात (जात, सङ्घ), जमादार (नाअीक), जमाना (काळ), जमाबन्दी (सारा-निश्चय), जमाव (मेळा), जमीन (भुअी, भूमि, भूपृष्ठ), जय्यत (भारी, सम्पूर्ण), जरतारी (सोनसळी, सोनकाडी), जरब (धाक, दरारा), जरा (अम्मळ), जरूर (अवश्य, आवश्यकता), जल्सा (गाणें-वाणें, गाण्याची बैठक), जलद (सत्वर), जलाल (जळजळीत), जवान (तरुण), जवाहीर (रत्नसङ्ग्रह), जहर (विष), जहागीर (राजदत्त भूमि), जहाज (तारूं), जहा-म्बाज (कर्तृत्ववान्, कर्कशा), जागा (स्थळ, पदवी), जादा (अधिक, विशेष), जादू (माया, गारूड), जानी (जिवलग), जाया (घायाळ, निकामी), जामा-निमा (वेष), जामीन (प्रतिभू, बन्धक, लग्नक), जायबन्दी (घायाळ, निकामी), जारी (चालू, आवेश), जालीम (प्रखर), जासूद (दूत), जाहीर (प्रकाशित), जाहिरात (प्रसिद्धि, घोषणा), जिकीर (घासाघीस, त्रास), जिन्दगी (सम्पत्ति, सर्वस्व), जिन्नस (वस्तु), जिना (शिडी, सोपान), जिम्मा (भार, 'वक्तव्यता'), जिराअीत (शेती), जिरें (धान्यविशेष), जिल्हई (अुजळा), जिल्हा (प्रांतविभाग), जीन (पलाण), जुजबी (किरकोळ), जुलूम (अन्याय, पीडा, बलात्कार), जेर (खाली, गतत्राण), जोडा (पायताण), जोर (बळ).

समानार्थक प्रतिशब्द मराठी भाषेत पूर्वी अस्तित्वांत नसल्यामुळेच जे प्रचारांत आले असे फार्सी शब्द या ६७ शब्दांपैकी किती आहेत ? असे शब्द बहुसङ्ख्य तर नाहीतच, अुलट सारे पांचसहाच ! तेहि राज्यव्यव-विषयी आहेत;—जप्त जमाखर्च, जमाबन्दी, जहागीर, जामीन, जिल्हा. प्राचीन परम्परा मोडल्यामुळे आणि ती मोडल्यानन्तर स्वराज्यांतीहि तिचा

शोध न घेतल्यामुळेच प्रायः हे शब्द रूढ झाले. नाही तर या पांचसहा शब्दांच्या ठिकाणीं जुने शब्द रूढ होअूं शकले असते. ज्याची कल्पनाच नवीन आहे असा शब्द अेकच आहे. तो 'जाहिरात' हा होय पण कल्पना अिङ्ग्रजी काळांतील असूनहि 'मिशन्'प्रमाणे 'अॅड्व्हर्टैज्मेंट्' हा अिङ्ग्रजी शब्द घ्यावा न लागतां 'जाहिरात' (= प्रकाशित गोष्ट) हा फार्सी शब्दच नवीन अर्थानें योजून नड भागवितां आली हें विशेष चिन्तनीय आहे. अितर शब्दांचे प्रतिशब्द काही नव्याने निर्माण करून दिलेले नाहीत. त्यांतील कित्येक अद्यापि प्रचलित आहेत. परन्तु त्यांचें पौनःपुन्य फार्सी शब्दांच्या पौनःपुन्याहून अुणें आहे. 'तारूं' हा शब्द क्वचित् वापरला जातो; पण 'जहाज' हाच बहुशः येतो याविषयीं दुमत होणार नाही. फार्सी शब्द अर्थाच्या विशिष्ट छटेच्या अभिव्यक्तीसाठी भाषेंत आले असें समर्थन जे करितात त्यांना असें दिसून येअील की असा अपरिहार्य शब्द यांत अेकहि नाही. 'बस बसणें' हा वाक्प्रयोग पूर्वी वर्तमानपत्रांत होत असे. सातार्‍याकडील बोलींत तो अजूनही टिकाव धरून आहे, अशा स्थितींत 'जम' डोअीजड झाला आहे तो 'बस'ला मारूनच याविषयीं काय शङ्का आहे ! 'भुअी' हा शब्द असाच 'जमिनी'च्या प्राबल्यामुळे नामशेष होअूं पहात आहे. 'गाणें-वाणें' हा महानुभाव-वाङ्मयापासूनचा जुना शब्द मेल्यासारखाच आहे. अितर मराठी शब्दांचा निकराने पुरस्कार झाला नाही तर ते हळू हळू नामशेष होत जातील अशी भीति पूर्वेतिहास पहातां साधार वाटते.

बहुतेक फार्सी शब्द जुन्या मराठी शब्दांस मागे सारून मराठी भाषेंत घुसून अपरिहार्य होअून बसले आहेत हें सिद्ध करण्यासाठी शुद्धिवादी लोक अलीकडील लेखकांच्या लिखाणांत वापरलेल्या फार्सी शब्दांकडे बोट दाखवून त्यांच्या ठिकाणीं संस्कृतोत्पन्न शब्द कसे वापरतां आले असते हें दाखवितात. परन्तु या योगाने प्रमेय सिद्ध होत नाही, असें बनहट्टी यांचें म्हणणें आहे. कारण, दोन्ही जातींचे शब्द लेखकांस सारखेच स्वकीय वाटत

असल्याने त्यांच्यापैकी त्यांच्या मनास जो ज्या वेळीं योग्य वाटेल तो ते वापरतात." आता लेखकांत शब्दांविषयी स्वकीयपरकीय भाव नसेल; परन्तु अगदी समानार्थी शब्दांच्या प्रकरणीं ते योग्यायोग्यता पाहून निवड करितात हें त्यांचें म्हणणें धाडसाचें आहे. वक्त्यांच्या आणि लेखकांच्या हातून न कळत जो पक्षपात होत आहे तो कशामुळे होत आहे हें त्यांना पटवून दिलें पाहिजे. बनहट्टी यांनी पृष्ठ ९६ वरील पहिल्या स्तम्भांत 'अुपाय' आणि 'अिलाज' असे दोन्ही शब्द वापरले आहेत. ते म्हणतात "......तें (आक्रमण) ज्यांच्या योगाने हटेल असे अुपाय सुचवा; अितरत्र कोठे अन्यायाने, जबरीने अुर्दूभाषा लादली जात असेल तर त्याच्या प्रतिकारासाठी अिलाज शोधून काढा." आता अिलाज-अुपाय हे दोन्ही शब्द अगदी समानार्थी आहेत. त्यांनी प्रथम 'अुपाय' कां वापरला आणि नन्तर 'अिलाज' कां वापरला याला त्या शब्दांच्या योग्यायोग्यतेचें काही कारण असल्यास त्यांनी दाखवून द्यावें. मला अेवढेंच वाटतें की 'अुपाय' या शब्दाची प्रथम अुपस्थिति झाली; आणि नन्तर लगेच पुन्हा तो शब्द वापरणें तितकेंसें कलादृष्टया युक्त न वाटल्याने त्याच्या लागोपाठच सुचणारा 'अिलाज' हा शब्द योजण्यांत आला. 'अिलाज' हा शब्द प्रथम सुचला असता तर याच कारणासाठी 'अुपाय' हा पाठीमागून वापरण्यांत आला असता. तेव्हा असें म्हणतां येअील की, या दोन शब्दांविषयी बनहट्टी यांच्या मनांत स्वकीय-परकीय भाव नाही; दोन्ही शब्दांची अुपस्थिति सारखीच होते; तेव्हा या शब्दांपुरता तरी त्यांच्या हातून पक्षपात होत नाही. परन्तु याप्रमाणे अितर शब्दांच्या प्रकरणीं त्यांचीच स्थिति काय होते याचाहि विचार केला पाहिजे. याच लेखांत 'बाजू' हा शब्द बनहट्टी यांनी १० वेळां वापरला आहे, "दुसऱ्या बाजूचे वीरहि" (९०।१), "त्या बाजूची अधिकृत कैफियत" (९१।१), "शिवाय अुलट बाजूने"(९२।१), "बाजूस" (सारून) (९३।२), "याच प्रश्नाची दुसरी बाजू" (९४।१), "निदान बाजूस सारून" (९४।१) "स्वकीय शब्द बाजूस सारून"(९४।१), "कोण-

त्याहि बाजूने पाहिलें असतां" (९७।२), "बाजूस सारलें" (९८।१). आता या दहाहि ठिकाणीं 'बाजू' हा शब्द जो वापरण्यांत आला तो अितर शब्दांची अुपस्थिति झाली असताहि योग्यतम शब्द म्हणून वापरण्यात आला अशी बनहट्टी यांची समजूत आहे काय ! बुद्धया प्रयत्न केला तर अितर शब्द आठवतील, पण लिहितांना ते आठवूनहि त्याज्य मानण्यांत आले असें मला वाटत नाही. "दुसऱ्या बाजूचे वीरहि", "त्या बाजूची अधिकृत कैफियत", "शिवाय अुलट बाजूने" या तीन ठिकाणांपैकी अेकाहि ठिकाणीं 'पक्ष' हा शब्द कां सुचला नाही ! "याच प्रश्नाची दुसरी बाजू", "कोणत्याहि बाजूने पाहिलें असतां," या दोन ठिकाणांपैकी अेखाद्या ठिकाणी 'अङ्ग' हा शब्द शोभला नसता काय ! "बाजूस सारणें" हा शब्दप्रयोग चारदा करण्यांत आला आहे. पण अेकदा तरी 'कड' या शब्दाची कद घेण्याची बुद्धि कां झाली नाही ! अेकीकडेस सारणें याचा अर्थ बाजूस सारणें असाच होत नाही का ! आता लेखकाने 'बाजू' हा शब्द वापरावयाचाच नाही असा निश्चय केला असता तर 'पक्ष' तीनदा वापरण्यांत आला असता, 'अङ्ग' दोनदा आला असता आणि 'कडेस' हा चारदा आला असता.या तीन निरनिराळ्या अर्थांनी 'बाजू'शब्द दहादा आला की अर्थोत्पत्तींत काहीच अन्तर न पडतां'बाजू'या शब्दाचें पौनःपुन्य वाढतें,तितका तो बळावतो आणि अितर शब्द तितके कडेला पडतात. येथे तर काही विशिष्ट अर्थच्छटा व्यक्त करण्याचा प्रश्न नाही ना !—स 'हरकत' असणें वा नसणें हा शब्दप्रयोग तीनदा आला आहे. येथे 'चिन्ता' वा 'अडचण' हा शब्द घालतां आला असता. पूर्वी घालीत असत. अलीकडेच 'हरकत' हा शब्द अपरिहार्य होअून बसला आहे.—'स हरकत घेणें' (९७।२) याला 'आडकाठी घालणें' हा साधा मराठी शब्दप्रयोग कां सुचूं नये !

अगदी समानार्थी शब्दांतसुद्धा न कळत पक्षपात होतो तो असा. जी स्थिति बनहट्टींची तीच सर्वांची. शब्द भाषेंत अद्यापि आहेत, कोणी योजिले तर अर्थ कळतो, पण योजना व्हावयाला त्यांची अुपस्थितिच होत

नाही ! स्वकीय शब्दांची अुपस्थिति न होणें म्हणजेच ते मागे पडून नष्ट होण्याच्या पन्याला लागणें होय. स्वकीय शब्दांची अुपस्थिति न होतां परकीय शब्दांची अुपस्थिति होणें हेंच विपर्यस्त आहे. परकीय शब्दांनीं मराठी शब्दांना मागे रेटलें, मारलें ही अलङ्कारिक भाषा आहे; वस्तुतः आम्हीच आमच्या हातून न कळत होणाऱ्या पक्षपाताने स्वकीयांचें वैर अुगवीत आहोंत.

तेव्हा प्रत्येक लेखकाने नि वक्त्याने स्वतःच्या मनाशीं विचार करावयाचा आहे की भाषेंत रूढ झालेल्या फार्सी शब्दांची अुपस्थिति किती वेळां होते आणि समानार्थी मराठी शब्दांची कितीदा होते. जे शब्द भाषेंतून नष्ट झालेले नाहीत ते सुद्धा प्रयत्नानेच आठवतात. या नष्ट न झालेल्या पण होअूं घातलेल्या शब्दांना बळ यावें म्हणून समानार्थी परकीय शब्दांवर बहिष्कार घालून नड अुत्पन्न करावयाची आहे. अशी नड अुत्पन्न करून सुशिक्षितांना तरी विचार करावयास लाविल्याविना गत्यन्तर नाही.

बनहट्टी विचारतात, "ज्या चळवळीचें समर्थन करण्यासाठी चिपळूणकरांसारख्या स्वाभिमानाच्या पुतळ्यास, टिळकांसारख्या प्रखर शास्त्रवेत्त्यास आणि केळकरांसारख्या कुशल विचारवन्तास स्वाभिमानशून्य प्रवाहपतित वा अविचारी ठरवावें लागतें, अशा चळवळीस महाराष्ट्रीय सुशिक्षित समाज कशी मान तुकवील !" पण या प्रकरणीं स्वतःच साक्ष देण्यास न. चिं. केळकर हे "कुशल विचारवन्त" विद्यमान आहेत. 'सह्याद्रि' मासिकाच्या जानेवारी १९३७ च्या अङ्कांत त्यांनीं "भाषाशुद्धीकरणांतील तारतम्य" या मथळ्याचा लेख लिहिला असून त्यांत ते म्हणतात. "करावयाच्याच म्हटल्या तर खालील दोन्ही गोष्टी मला करतां येतातः—(१) न कळत, चालढकलीने, आळसाने किंवा सवयीने परकीय शब्द घालून प्रबन्ध असा सजवावा की वाचकांना तो अुत्कृष्ट अभिजात मराठी भाषेचा प्रकार वाटावा; अथवा (२) परभाषादूषणाची जागृति आणि स्वभाषाशुद्धीची आस्था मनांत ठेवून प्रयत्नाने, कष्टाने शक्य तितके स्वकीय शब्द घालूनच आपलें मनोगत प्रकट करावें. या दोहोंपैकी

पहिली गोष्ट अितरांबरोबर मीहि आजवर करीतच आलों आहे....मला न कळत किंवा सवयीमुळे किंवा नडीमुळे असें घेडगुजरीशब्दमिश्रित वाङ्मय मीं गेल्या चाळीस वर्षांत डोङ्गरभर लिहिलें आहे. आता प्रस्तुतचा लेख जो भाषाशुद्धीकरणाच्या वादावर मी लिहीत आहें तो वर साङ्गितलेल्यापैकी दुसरा प्रकार होय....जी गोष्ट माझी तीच अितर लेखकांचीहि मी समजतों. म्हणजे त्यांनी थोडा प्रयत्न केल्यास त्यांनाहि असें निरपवाद लिहितां येअील....तत्त्वप्रतिपादन करून स्वतः त्याप्रमाणे आचरण करणें ही स्वभाषेची दुहेरी अुपासना पटवर्धनांना जर साध्य होअूं शकते तर आम्हां अितर लेखकांना ती साध्य कां होअूं नये ! म्हणजे जागृतीची व प्रयत्नांची अुणीव आहे असेंच बहुशः म्हणावें लागेल....भाषाशुद्धीचें तत्त्व मान्य करणाऱ्यांपैकी मी असून शक्य तोंवर व्यवहारांत अुतरविण्याची तत्परता यापुढे मी ठेवणार आहें...." आपली साक्ष द्यावयाला चिपळूणकर, टिळक हे दुर्दैवाने विद्यमान नाहीत! नाही तर त्यांची साक्ष आणि नम्रपणाने त्यांची अुलटपरीक्षाहि मी अवश्यमेव घेतली असती.

आता अेकाच गोष्टीचा विचार राहिला. बनहट्टी म्हणतात की, "मुसल्मान समाजाचा हिन्दु समाजाशीं, विशेषतः त्यांतील अशिक्षित म्हणजे विचार न करतां भाषा वापरणाऱ्या समाजाशीं, घनिष्ठ संसर्ग अनेक शतकें चालू राहिल्यामुळे साहाजिकच कित्येक सहस्र मुसल्मानी शब्द मराठींत घुसले आणि ते अगदी साध्या हरघडीच्या व्यवहारांतल्या कल्पना दर्शविणारे असल्यामुळे अगदी घसटींतले होअून गेले." परन्तु ही विचारसरणी अुपयोगी पडत नाही. हे सहस्रावधि फार्सी शब्द अशिक्षितांच्या बोलींत कसे शिरले अेवढेंच यावरून कळतें. ते सुशिक्षितांच्या, सुसंस्कृतांच्या बोलींत शिरून अेक वेळ समानार्थी मराठी शब्दांचा विसर पडेल पण त्यांचा पडणार नाही असे प्रसिद्ध कसे झाले याचा उलगडा बनहट्टी यांच्या विचारसरणीवरून होत नाही. 'अिराखत' हा शब्द असाच कुणब्याअूभाषेंत शिरला आहे; परन्तु तो नित्याची, हरघडीची कल्पना दर्शविणारा

असूनहि शिष्ट कां झाला नाही ! तसेंच मुसल्मानी समाज जेतृस्थानीं असतांना जी क्रान्ति स्वाभाविकपणेंच झाली, तिच्या अुलट क्रान्ति तो अल्पसङ्ख्य समाज जितस्थानीं आल्यावर कां नाही झाली ! अुत्तर अुघड आहे. मराठी लोक जेते झाल्यावरहि पूर्वीच्या अितकेच मराठीविषयी अुदासीन राहिले. मराठी भाषेंतून फार्सीचें जें थोडेंफार निष्क्रमण झालें आहे तें हिन्दु आणि मुसल्मान दोघेहि जित झाल्यानन्तर, नवशिक्षणक्रमांत संस्कृताला मिळालेल्या महत्त्वामुळे झालेलें आहे, तें काही मराठी भाषेविषयीच्या जागृतीमुळे झालेलें नाही.

महाराष्ट्रांत राहून ज्यांना मराठीविषयी आपुलकी वाटत नाही, ज्यांना आपले हितसम्बन्ध अितर महाराष्ट्रीयांहून वेगळे आहेत असें वाटतें, त्याची चिन्ता खरोखरीच आम्ही कां वहावी ? त्यांनी आमच्याविषयी साशङ्क रहावें तरीहि आम्ही त्यांना आमच्यांत येअूं देअून गोन्धळ अुडवूं द्यावा हें मला तरी कधीहि पटणार नाही. जळगांवच्या सम्मेलनात काकाजी कालेलकरांच्या ठरावावरील अुपसूचना भरसभेंत मान्य झाली असतांना मतनोन्दणीची मागणी करून गोन्धळ माजविणारा मनुष्य अ-मराठी, अ-महाराष्ट्रीयच होता असें कळतें. ती अुपसूचना अमान्य झाली असती तरीहि मला चिन्ता नव्हती. पूर्वी सम्मेलनाचा सभासद होण्याचें ज्यानें नाकारिलें (कारण, त्याची जन्मभाषा म्हणे मराठी नाही) तो खादीभक्त शेवटल्या घटकेला काकाजींच्याविरुद्ध अुपसूचना मान्य होते हें पहातांच सदस्यत्वाचे पैसे देतो आणि ते पैसे स्वागताध्यक्षांच्या खिशांत पडतांच मतनोन्दणीची मागणी करितो, या घटनेचें रहस्य महाराष्ट्रीयांनी ओळखावयाला पाहिजे. मराठीला स्वभाषा मानून महाराष्ट्रीयांना जे स्वकीय मानतील त्यांचा धर्म पहाण्याची आम्हांला आवश्यकता नाही. ते आमचेच आहेत. परन्तु महाराष्ट्रांतील मुसल्मानांची भाषा मराठी असली पाहिजे, अशी सदिच्छा केवळ आम्ही करून अुपयोग काय ! गुजराथेंत अुलट कोणती क्रान्ति होत आहे त्याचा बनहट्टी यांनी अवश्य शोध घेअून पहावा आणि योग्य तो धडा घ्यावा.

भाषाशुद्धीची ही चळवळ सिद्धीस जाणें अशक्य असल्यामुळे कार्य-कर्त्या व्यक्तींचा निष्कारण अुत्साहव्यय करविणारी आहे, असें बन-हट्टींना वाटतें. माझा अुत्साहव्यय होत आहे याविषयी वाद नाही. अङ्गी-कृत कार्य अेकीकडे सारूनहि मला भाषाशुद्धीविषयी लेखनभाषण करावें लागतें. परन्तु हा अुत्साहव्यय मी निष्कारण, अनाठायीं समजत नाही. जी जागृति मला झाली ती अितरांनाहि करून देणें हें माझें कर्तव्य आहे. कार्य सिद्धीस जावें अशी माझी अुत्कट अिच्छा आहे. परन्तु यशःप्राप्ति अशक्य वा विलम्बित आहे म्हणून कर्तव्यविमुख तर मला होतां येत नाही. माझी मनोदेवता मला हेंच साङ्गते की

"कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन"

# ११ भाषाशुद्धीकरणाचें तारतम्य[१]

'भाषाशुद्धीकरणाचें तारतम्य' याच मथळ्याचा 'सह्याद्रि' मासिकाच्या जानेवारी १९३७च्या अङ्कांत प्रकाशित झालेला श्री. नरसोपन्त केळकर यांचा लेख अितक्या प्राञ्जळपणाने, समतोलपणाने आणि खेळकरपणाने लिहिलेला आहे की वादग्रस्त प्रश्नांविषयी होणाऱ्या लिखाणात त्याला जोड सापडणार नाही.

अेका धुरन्धर लेखकाच्या मतात झालेलें हें परिवर्तन पाहून भाषाशुद्धिवादी लोकांना समाधान होअील. या लेखाचा समारोप करतांना मला अुद्देशून केळकर लिहितात की "अेकन्दरीने त्यांचें भाषाशुद्धीचें तत्त्व मान्य करण्याला चिन्ता वाटत नाही. मात्र त्यांनी लक्षांत ठेवावें की तत्त्वांत त्यांनी जिङ्कलें तरी तपशिलांत त्यांना बरीच हार खावी लागेल." हा जो त्यांनी माझा गौरव केला आहे आणि ही जी सूचना त्यांनी मला देअून ठेविली आहे त्याकरिता मी त्यांचा फार आभारी आहें. याच लेखांत ते अितरत्र म्हणतात "या कामीं मी तत्त्वनिष्ठ तथापि व्यवहारप्रेमी, अुपयुक्ततावादी, 'परिवर्तनी' आहें. ही माझी भूमिका स्पष्ट केल्यावर, मी कोणते परकी शब्द घातले असता सावरकर-पटवर्धनाच्या मतें दोषी होणार नाही याविषयी गमक म्हणून त्यांनीच सूत्ररूपाने किंवा अुदाहरणें देअून मला साहाय्य करावें अशी मागणी करण्याचा अधिकार मला प्राप्त होतो असें वाटतें." हें साहाय्य त्यांना मिळावें म्हणून 'तपशिला'चा विचार करण्यासाठी मी हा लेख लिहीत आहें.

केळकरांनी भाषाशुद्धिविरोधकांचें जें म्हणणें सूत्ररूपाने माण्डलें आहे त्याचा विचार केळकरांच्याच या लेखाच्या भाषाशैलीच्या अनुरोधाने

---

[१] हा लेख सह्याद्रीच्या अेप्रील १९३८ च्या म्हणजे अगदी नव्हाळ अङ्कांत प्रकाशित झाला आहे.

करूं. याच लेखाची भाषाशैली विचारांत घेण्यास विशेष कारण आहे. हा लेख केळकरांनी विशिष्ट दृष्टीने लिहिलेला आहे. ते म्हणतात "हा लेख लिहितांना काही थोडा प्रयत्न केल्याने, मला वाटतें, मला असा लेख लिहितां आला आहे की माधवराव पटवर्धन हे त्यांतील अेकाहि शब्दाला दूषण ठेवणार नाहीत, आणि तितक्यापुरतें तरी स्वभाषादूषकांच्या माळेतून माझें नांव ते वगळतील."

केळकरांनी प्रतिपक्षाचें म्हणणें पुढीलप्रमाणे माण्डलें आहे. "देशधर्म यांना सम्पन्न-सबळ करण्याच्या कामीं विवेक चालवून आपण अवश्य तें परक्याचें साहाय्य घेतल्यास दूषण लागत नाही. तसेंच भाषेच्या कामींहि समजावें. समजा, हिन्दुस्थानाला शत्रूशीं अुघड लढावयाचें आहे. आणि तो शत्रु अशीं शस्त्रास्त्रें वापरतो की तीं आपणांला सिद्ध करतां येत नाहीत. तर आपण काय करूं ! अेखादा मित्रदेश पाहून त्याकडून द्रव्य देअून, ऋणानुबन्ध दाखवून किंवा याचना करून तीं मिळवूंच कीं नाही ! मुख्य हेतु युद्धांत जय मिळविण्याचा. तो साधला म्हणजे मग त्याचीं साधनें आपण कोठून मिळविलीं याला महत्त्व रहात नाही. स्वदेशांत जीं शस्त्रास्त्रें निर्माण होअूं शकतील त्यांनीच युद्ध करूं हें म्हणणें सारासार विचाराला धरून नाही. धर्माची गोष्ट घेतली तरी तेंच. निर्गुणपूजा सर्वस्वी स्वावलम्बी. पण सगुणपूजा म्हटली म्हणजे तिला साधनसम्भार लागतोच. तो सम्पादतांना आपण परदेशी वस्तूंवर बहिष्कार घालतों कीं सगुणपूजोपचार चाङ्गला सजावा म्हणून जें मिळेल तें घेअून तो सजवितों ! तीच गोष्ट भाषेची. काही परकीय शब्द अनिवार्य होण्याअितके रूढ झाले आहेत. विचार आणि विचारपद्धति दोन्ही नवीन असल्यामुळे तीं जिकडून आलीं तिकडून त्यांलगत त्यांचे शब्दहि आले; आणि आपलें काम सहजासहजीं भागलें. किंवा अर्थांचे बारीक भेद, श्लेष व्यक्त करण्याच्या कामीं स्वकीय शब्दांपेक्षा परकीय शब्द निश्चितपणें अधिक समर्थ असे दिसून आले तर ते शब्द कां न घ्यावे !"

प्रतिपक्षाचें हें 'म्हणणें माण्डतांना 'विवेक चालवून' आणि 'अवश्य तें' असे महत्त्वाचे शब्द केळकरांनी योजिले आहेत. वस्तुतः विवेक चालविण्यांत येत नाही आणि अवश्य नाही असें परक्याचें साहाय्य घेण्यांत येत असतें म्हणून तर या परावलम्बन वाढविणाऱ्या घातुक मनोवृत्तीविरुद्ध मोठ्याने हाकाटी करावी लागते. लढाअीला तोण्ड तर लागलें, अवश्य ती शस्त्रसामग्री देशांत होत नाही, आणि विजय तर सम्पादन केलाच पाहिजे, अशा समयीं परदेशांतून योग्य ती शस्त्रसामग्री आणविणें अगत्याचेंच आहे. त्याविषयी मतभेद होणें शक्य नाही. परन्तु भाषाप्रकरणीं परकी शब्द घेतांना सदाच अशी युद्धासारखी निकडीची स्थिति असते काय ! पुन्हा, जय मिळविण्याचा हेतु साधला म्हणजे मग त्याचीं साधनें कोठून मिळविलीं याला महत्त्व राहत नाही हें खरें. परन्तु दूरदर्शी राजकारणी लोक केवळ, अेक वेळ कसा का होअीना पण जय मिळाला ना असा प्रश्न करून स्वस्थ बसत नाहीत, तर भिन्न भिन्न परिस्थितींत राष्ट्र समर्थ कसें होअील आणि स्वसंरक्षणास सिद्ध कसें राहील याची चिन्ता करून ते आपलें धोरण आंखतात तें का ! शस्त्रास्त्रांच्या पुरवठ्यासाठी सदैव परराष्ट्रांवर अवलम्बून रहाणाऱ्या देशाचें भविष्य वर्तवायला कोणी ज्योतिषी नको. ज्या अिटलीच्या सैन्यावर मोठा निर्णायक विजय हबशी सैन्याने चाळीस वर्षांपूर्वी मिळविला होता त्याच अिटलीच्या सैन्याने अद्यापि शूर असलेल्या हबशी लोकांचें साम्राज्य पादाक्रान्त करून टाकावें हें कशाचें द्योतक आहे ! भर अडचणीच्या प्रसङ्गीं परकीय राष्ट्रांनी शस्त्रास्त्रें पुरविलीं नाहीत कीं सर्वनाश ठेवलेलाच. यासाठीच जपानमध्ये लोखण्ड आणि दगडी कोळसा यांची निपज नसतांहि हें चिमुकलें राष्ट्र स्वराष्ट्रसंरक्षणाची सर्व साधनसामग्री स्वदेशांत स्वकष्टाने सिद्ध करतें. 'जो दुसऱ्यावरी विश्वासला त्याचा कार्यभाग बुडाला'च म्हणून समजावें. प्रसङ्गविशेषीं जी गोष्ट करावी लागते ती केव्हाहि अपवादरूपच मानिली पाहिजे आणि वैरल्यानेच केली पाहिजे. परन्तु भाषा-शुद्धीचे विरोधक आप-

द्धर्मालाच धर्म म्हणून आचरणांत आणीत असतात.'

सगुणपूजोपचाराचा दृष्टान्तहि लागू पडत नाही. पूजा चाङ्गली सजावी म्हणून मिळेल तें घेऊन ती सजवावी हें धोरण अिष्ट ठरणार नाही. काही शिष्ट लोक सकाळीं फिरून परततांना निःसङ्कोचपणें अितराच्या फुलझाडांना नागवून आपला सगुणपूजोपचाराचा साधनसम्भार सिद्ध करितात. त्यांचा सगुणपूजोपचार घरांत शोभून दिसला तरी त्यांच्या कृतीचें बाहेर जगांत समर्थन करितां येअील काय? आपल्या अेखाद्या करणीने आपलें समाधान झालें, तरी तेवढयाने भागत नाही. त्या कृतीचा समाजावर जो परिणाम होतो त्याच्या अिष्टानिष्टतेवरून आपल्या करणीची अिष्टानिष्टता ठरविली पाहिजे. शब्दयोजनेच्या प्रकरणीं हीच कसोटी लावायला पाहिजे असा माझा आग्रह आहे. विचार नि भावना अत्यन्त परिणामकारक रीतीने प्रकट करण्याची भाषेची शक्ति वाढविणें म्हणजे भाषेचें हित साधणें होय असें जें केळकर म्हणतात तें युक्तच आहे. आता वक्त्याचा नि लेखकाचा आशय योग्य रीतीने श्रोत्यांस नि वाचकांस कळला की त्यांच्यापुरतें भाषेचें कार्य झालें. त्याचप्रमाणे घेणाराला आवडणारी वस्तु देणारा योग्य मूल्याने देअूं शकला की त्यांच्यापुरता व्यवहार यशस्वी झाला असें म्हणतां येअील. परन्तु या देवघेवीचा परिणाम राष्ट्राच्या सम्पत्तीवर, अर्थोत्पादनसामर्थ्यावर काय होतो हें पहाणें जसें अगत्याचें आहे तसेंच अेकमेकांचे आशय अेकमेकांना कळविण्याचें कार्य भाषेकडून होत असलें—आणि कोणत्याना कोणत्या तरी रीतीने न्यूनाधिक प्रमाणांत तें होतच असतें—तरी त्या रीतीचा परिणाम भाषेची शब्दसम्पत्ति नि नवशब्दप्रसवशक्ति वाढवण्यांत होतो की अुणावण्यांत होतो हें पहाणेंहि अगत्याचें आहे. ही दृष्टिच आजपर्यन्त नव्हती. लेखक केवळ अुपयुक्ततादी असत आणि काही थोडे फार कलाप्रेमीहि असत. ही स्थिति अद्यापिहि सर्वत्र आहे. तेव्हा ही दृष्टि लेखकांना यावी आणि त्यांनी विवेक करावा म्हणूनच माझी परकीय शब्दांवरलि बहि-

ष्काराची घोषणा आहे. नड भासली की ती भागवायला पाहिजे ही गोष्ट खरी. तसें करतांना आपण अवश्य तें परक्यांचें साहाय्य घेतल्यास दूषण लागत नाही असें भाषाशुद्धिविरोधकांचें म्हणणें आहे. आता केळकरांच्याच लेखांत परकी शब्द किती आहेत आणि ते अवश्य आहेत की काय तें पारखून पाहूं या.

फार्सी शब्द २५ असून ते पुढीलप्रमाणे आहेतः— कबूल, कमर, कमी करणें, कारकून, कारखानदार, कारखाना, खर्चगारा, खुलासा, गर्दी, चर्खा, जरूर, दुकान, दुकानदार, फक्त, फरक, बरोबर, बारीक, माल, माहीत, मौज, व, वगैरे, समजी, सामान आणि हजार.

अिङ्ग्रजी शब्द ८ असून ते पुढीलप्रमाणे आहेतः— अिन्स्पेक्टर, कमिटी, फ्लॅनेल, मोटार, शर्टिङ्ग, सर्ज आणि स्वेटर.

गुजराथी शब्द १ च शब्द असून तो टकळी हा आहे.

केळकरांसारख्या सर्वमान्य लेखकाने प्रतिज्ञापूर्वक शुद्ध लिहिलेल्या लेखांत २५ शब्द फार्सी यावेत ही स्थिति चिन्तनीय आहे. यांतील कित्येक शब्द मूलतः फार्सी आहेत याची जाणीव नसणें हें कशाचें लक्षण बरें ! स्वभाषेचा साङ्गोपाङ्ग अभ्यास होत नाही हा दोष तितकासा व्यक्तीचा नसून अभ्यासक्रम आंखणाऱ्या अधिकारी शिक्षणसंस्थेचा आहे. अिङ्ग्रजी भाषेचा साङ्गोपाङ्ग अभ्यास अळेंबळें करून घेण्यांत येत असल्याने सुशिक्षित मनुष्याचा स्वभाषेपेक्षा अिङ्ग्रजी भाषेशीं अधिक परिचय होतो. हा परिस्थितीचा दोष आहे हें मान्य. परन्तु परिस्थिति जितकी विपरीत तितकी अधिक काळजी आपण घ्यायला हवी कीं नाही ! मला स्वतःला अेवढेंच दाखवून द्यावयाचें आहे की साम्प्रतच्या विपरीत स्थितींत मराठीच्या अभ्यासाकडे नामवन्त लेखकांचेंहि दुर्लक्ष झालेलें आहे; आणि त्याच्याकडून निर्वाहापलीकडे भाषेचा विचार करण्यांत आलेला नाही.

केळकरांनी भाषादूषकांचे जे प्रकार मार्मिकपणाने वर्णिले आहेत त्यांपैकी (१) "आपण योजितों ते शब्द परकी आहेत हें मुळांत ज्ञानच

नसणारे अज्ञानी", (२) "हें ज्ञान असतांहि सहजासहजीं त्या ज्ञानाचा विसर पडणारे विसरभोळे", (३) "हें ज्ञान असतां रूढींच्या प्रवाहांत असहायपणें वाहून जाणारे दुर्बळ", आणि (४) "रूढीच्या प्रवाहांतून तरूनं जाण्याची शक्ति असणारे पण चालढकल करणारे अुपेक्षाशील" हे चार प्रकार पहिले होत. यांचा भाषाशुद्धीला तत्त्वतः विरोध नाही. केळकरांनी वर्णिलेले अितर प्रकारचे जे भाषादूषक आहेत ते भाषाशुद्धीचे थोडेफार विरोधक असून त्याचाच समाचार घेणें येथे कर्तव्य आहे. (५) "परकी शब्द पदरीं पडले ते पवित्र झाले नाहीत; पण ते कोणत्याहि स्वकीय शब्दापेक्षा अर्थ अधिक स्पष्टपणें (निदान सध्या तरी) व्यक्त करण्यास अुपयोगी पडतात म्हणून त्याना निरुपायाने स्वीकारणारे ते अुपयुक्ततावादी होत, (६) शब्द परकी खरे, आणि अर्थ अधिक विशद करण्याचा प्रश्नहि नाही, पण त्याच्या अुपयोगाने प्रबन्ध अधिक रमणीय होतो म्हणून त्याचा स्वीकार करणारे ते कलाप्रेमी होत, (७) परकी शब्द पदरीं पडले, पचनीं पडले, पवित्र झाले असें म्हणणारे ते वितण्डवादी होत, आणि (८) परकी शब्द जितके अधिक घेता येतील तितके घ्यावे आणि थोड्याबहुत मराठीकरणाच्या संस्करणाने किंवा सवयीने ते आपलेसे करून किंवा मानून स्वभाषा अधिक समृद्ध करण्याचा पराक्रम करावा असें म्हणणारे ते आक्रमणाकाङ्क्षी होत." केळकर हे 'आक्रमणाकाङ्क्षी' तर नाहीतच, आणि आता ते 'वितण्डवादीहि' राहिले नाहीत. "नकळत, चालढकलीने, आळसाने किंवा सवयीने परकीय शब्द घालून प्रबन्ध असा सजवावा की वाचकाना तो अुत्कृष्ट अभिजात मराठी भाषेचा प्रकार वाटावा, ही गोष्ट अितराबरोबर मीहि आजवर करीत आलों आहें" अशी जरी त्यांनी स्वतःविरुद्ध साक्ष दिलेली आहे तरी आता ते स्वतःस तसे 'कलाप्रेमी' म्हणवीत नसावेत. "मी तत्त्वनिष्ठ तथापि व्यवहारप्रेमी, अुपयुक्ततावादी, 'परिवर्तनी' आहें" असें ते म्हणतात. तेव्हा त्यांच्या तत्त्वनिष्ठ तथापि व्यवहारप्रेमी अुपयुक्ततावादाच्या अनुरोधाने त्यांनी वापरलेल्या परकी शब्दांची

चिकित्सा केली पाहिजे.

या शब्दांना पर्याय आहेत :--कबूल (मान्य), कमी करणें (माघार घेणें), खर्चणारा (वेचणारा), खुलासा (स्पष्टीकरण), गर्दी (दाटी), चर्खा (सूत-रहाट), जरूर (अवश्य), फक्त (केवळ, मात्र), फरक (भेद, अन्तर), बरोबर (समवेत), बारीक (सूक्ष्म), माहीत (ठाऊक) व (अन्, नि), वगैरे (अित्यादि), हजार (सहस्र). या पन्धरा शब्दांपुरतें असें म्हणतां येअील की त्याच्या ठिकाणीं पुढे कंसांत दिलेले पर्याय योजण्यांत आले असते तर भाषा मुळीच दुर्बोध वा हास्यास्पद झाली नसती. शङ्केला वाव राहूं नये म्हणून मुळांतील प्रयोग पहा—'चूक कबूल करून' (७-१), 'परकी शब्द योजण्यास कमी करणार नाही' (१०-१), 'अेक रुपयाचें खनिज तेल खर्चणारे' (११-१), 'स्पष्ट व विधायक खुलासा' (१०-१), 'परकीय शब्दांची गर्दी' (५-२), 'चर्ख्यांतील लोखण्डी सामान' (९-२), 'साङ्गणें जरूर आहे' (१०-२), 'फक्त दहा टक्के' (९-१), स्वदेशी-विदेशी मालांत काहीच फरक करीत नाहीत' (९-१), 'अितरांबरोबर करीतच आलों आहें' (७-२), 'बारीक भेद' (७-१), 'माहीत असलेले शब्द' (७-२), 'स्वधर्म व स्वदेश, (६-१), 'वगैरे वस्तु' (९-१), 'पांच हजार रुपयांच्या मोटारींत' (११-१), (कंसांतील पहिला आंकडा पृष्ठाचा असून दुसरा स्तम्भाचा आहे.)

हे १५ शब्द मराठींत रूढ झालेले आहेत खरे. पण ते रूढ होण्याला आमच्या निष्काळजीपणापेक्षा त्यांचा काही गुण कारणीभूत झालेला दिसत नाही. हे काही नवीन अर्थ वा अर्थांच्या नवीन सूक्ष्म छटा व्यक्त करण्याकरिता आलेले नाहीत.

मला अशी शङ्का येते की केळकरांनी गर्दी हा शब्द दाटी या शब्दाची द्विरुक्ति टाळण्यासाठी योजिला असेल; आणि वस्तुस्थिति तशी असल्यास, नि प्रथम अुपस्थिति दाटी या शब्दाचीच झाली असल्यास, त्याची योजना क्षम्यच नव्हे तर समर्थनीयहि ठरेल. अुरलेल्या १४ शब्दां-

पैकी 'व' हा शब्द बोलींत रूढ नसून केवळ लेखी भाषेंत रूढ आहे हें चमत्कारिक वाटतें पण असें आहे खरें. कोकणांतील अेक-दोन जिल्हे वगळल्यास द्वितीयेचा प्रत्यय '–स' याचीहि हीच स्थिति आहे. सम्भाषणांत तो क्वचितच योजिला जातो; पण लेखी भाषेंत तो अगदी रूढ आहे. असो; 'आणि' या त्रिमात्रक शब्दापेक्षा आंखूड नि सुटसुटीत असा शब्द हवा असल्यास त्याच शब्दाचीं 'अन्', 'न्', 'नि' हीं तीन रूपें बोलींत रूढ आहेत जसें: 'तो अन् मी', 'सदा न् कदा', 'तें न् तेंच', 'तो नि मी'. पण आपली वृत्ति अितकी विपर्यस्त झाली आहे की आपल्या बोलींत रूढ असलेले आपले शब्द आपणांला तितके सम्भावित वाटत नाहीत, आणि बोलींत रूढ नसलेला वा क्वचितच आढळणारा 'व' हा परकी शब्द मात्र अवश्य वाटतो! हजार हा शब्द तर सहस्र या प्राचीन शब्दाला मागे सारूनच डोअीजड होअून बसलेला दिसतो.

कमर (१७–२), कारकून (११–१), कारखानदार (९–२), कारखाना (९–२), दुकान (८–२), दुकानदार (८–२), माल (९–१), मौज (१०–१), समअी (८–१) आणि सामान (९–२) हे १० शब्द असे आहेत की यांना मराठी पर्याय प्रयत्नपूर्वक शोधावे वा निर्मावे लागतील; आणि त्यांची योजना केल्यास ती चमत्कारिक नि हास्यास्पद वाटेल. 'समअी' हा शब्द विशिष्ट प्रकारच्या वस्तूचें नांव असल्याने क्षम्य नि अनिवार्य आहे. ती वस्तुच अुद्या प्रचारांतून गेली की तो शब्दहि जाणार. 'कमर' हा अेकच शब्द असा आहे की जो पूर्वीच्या कड (कटि, कडदोरा) आणि माज (मध्य, माजपट्टा) या दोन मराठी शब्दांना मागे सारून अनिवार्य होअून बसलेला आहे. तेव्हा केवळ भाषाशुद्धिवादी प्रचारकाने या १० शब्दांच्या ठिकाणीं जुने वा नवे मराठी पर्याय योजिले पाहिजेत. लोक हसतील याचा विचार त्याने करूं नये. ज्या प्रमाणांत त्याने योजिलेले पर्याय सुबोध नि सुटसुटीत असतील त्या प्रमाणांत ते लोकमान्य ठरण्याचा सम्भव आहे; आणि ते तसे न ठरले तरी त्याला तत्त्वार्थी घरसोड

करितां येत नाही. परन्तु केळकरांसारखे जे लेखक अुपयुक्ततावादी आहेत त्यांनी कमर हा शब्द वगळून अितर ९ शब्द वापरले तर तें क्षम्य होअील.

अिङ्ग्रजी ८ शब्दांपैकीं फ्लॅनेल, सर्ज, स्वेटर हे तीन शब्द विशिष्ट वस्तूंचे वाचक आहेत तेव्हा ते वापरायला चिन्ता नाही. पण फ्लॅनेल हा नवा शब्द वापरल्याने पूर्वीचा 'बनात' (तोहि मूळचा मराठी नाहींच) मागे पडतो हें अिष्ट नाही. आपलें जुने तें निष्कारण टाकावें आणि नव्याने खुळावून तें घ्यावें ही वृत्ति स्वसंरक्षणास बाधक आहे. 'शर्टिङ्ग' हा शब्द वापरण्याची आवश्यकताच नव्हती. केळकर कोटाचें कापड म्हणतात मग सदऱ्याचें कापड म्हणावयाला काय अडचण आहे ! 'अिन्स्पेक्टर' आणि 'कमिटी' हे शब्द रूढ असले तरी अनिर्वाह्य नाहीत. 'देखरेख-करी' वा 'अवेक्षक' आणि 'समिति' हे शब्द काम करावयास सिद्ध असतांना 'अिन्स्पेक्टर' आणि 'कमिटी' यांना जवळ करून बळावूं देतां कामा नये. राहता राहिला 'मोटार' हा अेकच शब्द. ज्यांनी शोध लावून मोटारगाड्या निर्माण केल्या त्यांनीच त्यांलगत हा शब्दहि पाठविला. परन्तु वस्तु परदेशी असली की तद्वाचक शब्द परदेशीच असला पाहिजे असा नियम नाही. आगगाड्या, तारायन्त्रें हीं काही हिन्दुस्थानांत निर्माण झालीं नाहीत. पण तद्वाचक शब्द मराठींत निर्माण होअूं शकले. 'स्टोव्ह'ला मग तेलचूल कां म्हणूं नये ? बायसिकलला दुचाकी म्हणण्यांत काही अर्थ नाही कारण, रेकले हे सुद्धा दुचाकीच असतात. पण ज्या गाडीच्या चाकाला गति पायाने दिली जाते त्या गाडीला पाणचक्की, पवनचक्की या शब्दांच्या धर्तीवर पायचाकी गाडी वा पायचाकी म्हटलें तर तें किती सार्थ होअील ! शिवण्याचीं, छापायचीं यन्त्रें सुद्धा पायचाकी असतात. मोटारीला मी धूरचाकी हा शब्द १९२४-२५ मध्ये योजिला होता. तो रूढ होण्याचा फारसा सम्भव नाही; पण अधिक चाङ्गला शब्द अधिक प्रभावी लेखकांस

---

१ प्रतिभेच्या ता. १ सप्टेम्बर १९३६ च्या अङ्कांत श्री. विवेक (मनोहर महादेव केळकर) यांनी भाषाशुद्धीवर जो लेख लिहिला आहे त्यांत 'स्ट्रेचर'ला

सुचणार नाही आणि सुचलाच तर तो महाराष्ट्रास रुचणार नाही असें थोडेंच आहे! असे प्रयत्न करीत राहिल्यानेच मराठी प्रत्ययोपसर्गांची नि शब्दसिद्धीची शक्ति जिवन्त राहते. आणखीहि अेक लाभ होतो. अेखादें नवीन ज्ञान आपण परभाषेंतून घेतलें की त्या परभाषेंतील शब्द ध्यानांत राहिल्यास तें ज्ञान आत्मसात् झालें असें आपल्याला वाटतें. परन्तु स्वभाषेंत स्वकीयांना समजेल अशा रीतीने त्या ज्ञानाची माण्डणी करा असें कोणी म्हणताच आपण घोटाळतों. स्वकीयांना स्वभाषेंत साङ्गतां यावें म्हणून आपल्याला त्या गोष्टीचा पुन्हा निरनिराळया अङ्गांनी विचार करावा लागतो आणि या विचारामुळेच आपलें ज्ञान शुद्ध, स्पष्ट आणि दृढ होतें.

आता अेकच शब्दाचा विचार राहिला, तो म्हणजे गुजराथी शब्द 'टकळी' हा होय. महात्मा गान्धींनी हाताने कातलेल्या सुताचें माहात्म्य स्थापिलें आणि त्यांच्या प्रभावाने 'चर्खा' आणि 'टकळी' या दोन शब्दांचेंहि प्राबल्य माजलें. मराठींत रहाट आणि चाती हे दोन शब्द पूर्वीपासून आहेत. रहाट घरोघर नसतील, पण चात्या तर निदान जानवीं करण्यासाठी ब्राह्मणांच्या घरांतून परवापरवापर्यन्त फिरत होत्या; आणि नगरें वगळलीं तर अद्यापिहि फिरत असतील. असें असतांहि चातीचा विसर पडावा हें आपल्या अस्वाभाविक मनोवृत्तीचें द्योतक आहे हें कोणासहि मान्य होअील. 'खेडूत' आणि 'किसान' हे जे शब्द आता मिरवूं लागले आहेत त्यांचा अुत्कर्ष होण्याचें कारण आपलीच मनोवृत्ति होय. खेडूत आणि चर्खा हे शब्द मोल्सवर्थच्या कोशांत नाहीत; पण आधुनिक महाराष्ट्र शब्दकोशांत ते दिलेले दिसतात!

या सर्व विवेचनाचा निष्कर्ष पुढीलप्रमाणे साङ्गतां येअील. (१) मराठी लेखकांनी भाषेचा नि वाङ्मयाचा खोल अभ्यास केला पाहिजे. मराठी ही मातृभाषा आहे, ती सहज समजते आणि तिच्या

---

अुचली हा समर्पक शब्द कोणीतरी सुचविल्याचें लिहिलें आहे, 'वॉटर बॉटल'ला कोल्हापुराकडे गेळें हा शब्द आहे.

द्वारा आपला आशय सहजासहजी व्यक्त करतां येतो, तेव्हा तिचा प्रयत्न-पूर्वक अभ्यास करण्याचें प्रयोजन नाही, विशेषतः विद्यालयांतून संस्कृताचा थोडाफार अभ्यास अळेंबळें होत असल्याने तर तसें प्रयोजन मुळीच नाही असें वाटतें; पण हें चुकीचें आहे. आपण सुशिक्षित लोक 'अपॉअिण्ट्मेण्ट्' हा शब्द सर्वांना कळो वा न कळो पण वापरतों; आणि कोणी मराठी शब्द वापरा म्हटलें तर तो सुचविण्याचा भार त्या आक्षेपकावरच टाकतों. परन्तु ज्यांना अिङ्ग्रजीचा गन्धही नाही असे शास्त्री 'सङ्केत' हा शब्द सहजासहजी योजितात. तो लक्षांत आला म्हणजे मग आश्चर्य वाटतें. श्री. दि. वि. काळे यांचा सह्याद्रीच्या सप्टेम्बर १९३७ च्या अङ्कांतील 'चिनी युद्ध व त्याचें भवितव्य' हा लेख पुष्कळांनी वाचला असेल. पण त्यामधील 'सर्वत्र दिसणारी फुटीर वृत्ति जाअून त्या ठिकाणीं अेकीचें वाता-वरण आलें' (पृ. ७०३) या वाक्यांतील 'फुटीर' या सुन्दर शब्दाचा अुपयोग कितीकांच्या ध्यानांत आला असेल! सुशिक्षितांना 'फिसिपॅरस् टेण्डन्सी' हा शब्द विशेष आठवतो. 'फुटीर वा फुटरें अङ्ग' आपण म्हण-तोंच; पण फुटून वेगवेगळे होणारा या अर्थाने 'फूट' पासून निघालेला फुटीर हा शब्द वापरल्याने फुटीर या शब्दाची व्याप्ति तर वाढतेच; पण यापुढे अेकत्र येअून अेक होणारा या अर्थाने 'जूट' पासून 'जुटीर' हा शब्दहि सुचविला जातो.

(२) निरनिराळ्या शास्त्रांच्या परिभाषेंतील जे शब्द अुपयुक्त आहेत त्यांचें स्मरण बहुजनसमाजाला त्या त्या शास्त्रांतील तज्ज्ञांनी करून दिलें पाहिजे. काडमोड वा घटस्फोट याला 'बन्धमोक्ष' हें सम्भावित नांव अर्थ-शास्त्रांत सापडल्यावर लग्नविच्छेदासारखा नवा शब्द हवाच कशाला! धर्मशास्त्र तर प्राङ्न्याय, (Res Judicata) अेकच्छायाश्रित (Collectively and severally) यासारखे किती तरी अुपयुक्त शब्द देअूं शकेल.

(३) जे परकी शब्द स्वभाषेंतील शब्दांना मागे सारून पुढारले आहेत आणि कोणतीहि नवी अर्थच्छटा व्यक्त करीत नाहीत, अशांच्यावर तर

तत्काळ बहिष्कार टाकला पाहिजे. त्यांना बहिष्कृत केल्यावांचून आपल्याला आपल्या मराठी शब्दांची आठवणच होणार नाहीं. 'जोराने वाद झाला यांतील 'जोराने' हा शब्द वापरायचा नाही असें केळकरांनी ठरविलें, तेव्हाच त्यांना 'आवेग' हा शब्द सुचला.—'आवेगाने' या शब्दापेक्षा नेटाने, कसून हे दोन शब्द आधी सुचायला हवे होते. 'लगत' हें शब्दयोगी अव्ययहि त्यांना 'बरोबर'च्या बहिष्कारामुळेच सुचलें असावें. सावरकरांना 'शिकारी' हा शब्द नको, ते 'मृगयु' हा दुर्बोध शब्द वापरतात. त्यांना 'पारधी' शब्दाची आठवण होत नाही. बहिष्काराचा हेतु स्वकीयांचा शोध नि पुरस्कार हा असला पाहिजे.

(४) जे परकी शब्द मराठी शब्दांना मागे सारून पुढे आलेले नाहीत, परन्तु ज्यांचा स्वीकार केल्यामुळे नवे मराठी शब्द निर्माण होअू शकले असते ते झाले नाहीत अशा रूढ परकी शब्दांचा अुपयोग अुपयुक्ततावादी लेखकांनी करायला अडचण नाही. त्याचप्रमाणे ज्या परकी शब्दांचा अुपयोग अर्थाच्या नवीन सूक्ष्म छटा व्यक्त करण्यासाठी करतां येतो, त्यांचाहि त्यांनी अुपयोग करायला अडचण नाही. पण यापुढे तरी आपल्या नव्या नडी स्वावलम्बनाने भागविण्याचा त्यांनी प्रयत्न केला पाहिजे.

(५) परावलम्बी हिन्दुस्थानाचा पाश्चात्य विचारांशीं, टुमीशीं आणि वस्तूशीं नित्य सम्बन्ध येत असतांना नित्य नवेनवे शब्द, विशिष्टार्थवाचक शब्द, कानावर, डोळ्यावर आणि भाषेवर अेअून आदळणें अपरिहार्य आहे. आता टपाल विमानाने जाअूं लागलें तसा मराठी वर्तमानपत्रांतून 'हवाअी-मार्गें' असा शब्दप्रयोग येअूं लागला. हवाअी हें फार्सी विशेषण कशाला? आपण आकाशमार्गें म्हणायला काय अडचण आहे? अन्तराळांतून येणाऱ्या आणि विशिष्ट यन्त्राच्या साह्यावांचून श्रुतिगोचर न होणाऱ्या ध्वनींना 'आकाशवाणी' म्हणतां येणार नाही; कारण 'आकाशवाणी' या शब्दाचा अर्थ निश्चित आहे. पण 'नभोवाणी' हा ज्ञानप्रकाशाचा शब्द रूढ करायला काय अडचण आहे? स्वकीयाविषयीं आपुलीक वाटूं लागली

आणि आपल्या नडी स्वावलम्बनाने परिश्रमपूर्वक भागविण्याची वृत्ति बळावली म्हणजे मग काही परकी शब्द मराठींत आले, तर तेवढ्याने ती बाटणारहि नाही आणि क्षीण नि स्वत्वाला पारखीहि होणार नाही. परन्तु शुद्ध मराठी शब्दांचा व्याप नि पराक्रम वाढविण्याचा प्रयत्न मराठी वक्त्यांनी नि लेखकांनी सतत करीत राहिलें पाहिजे. आपल्या मराठी शब्दांच्या कार्यक्षमतेविषयी आपण साशङ्क राहूंच नये. शब्दांच्या सङ्केतांना मनुष्यांच्या सहकार्याव्यतिरिक्त निराळा स्वतन्त्र आधार नाही. परकी शब्दांच्या ठिकाणीं जर आपण अुत्पन्न केलेले अर्थ येअूं शकतात, तर आपल्याच शब्दांच्या ठिकाणीं ते कां येअूं नयेत! आमच्या मनोवृत्तींतच क्रान्ति व्हायला हवी आहे.

भाषेच्या प्रकरणीं मी अितका स्वत्वाभिनिवेश दाखवितों आणि वेष विलायती पद्धतीचा करतों यांत केळकरांना विसङ्गति दिसते; परन्तु मुळांत विसङ्गति नाही. मी अितका स्वत्वभिनिवेशी असलों तरी मराठी वाङ्मयांत सुनीतगज्जलादि विदेशी प्रकार रुढ करण्याचा मी काही थोडा प्रयत्न केलेला नाही. भाषेचा विचार करतांनाहि भाषेंत परिवर्तन अगदी होणारच नाही, अथवा तें अगदी होअूंच नये अशा मताचा मी नाही. परन्तु हें परिवर्तन आपणच आपल्या भाषेंतून स्वत्वसंरक्षणाच्या नि स्वत्व संवर्धनाच्या दृष्टीने केलें पाहिजे. धर्माच्या आचारविचारांत परिवर्तन अपरिहार्यच नव्हे, तर अिष्ट आहे. परन्तु तेंहि समाजाच्या धारणेच्या नि साक्षात् अभ्युदयाच्या दृष्टीने आपणच केलेलें हवें. बहुजनसमाज जें करतो तें मी बहुशः करतोंच; परन्तु अेखादी गोष्ट बहुजनसमाज करतो म्हणून ती मी केलीच पाहिजे असें नाही. भाषाशुद्धीचेंच तत्त्व घ्या, तें बहुजनसमाजाला पटून आचरणांत अद्यापि यावयाचें आहे. माझें वर्तन बहुजन समाजाच्या आचरणाविरुद्ध आहे; पण अेवढयाने तें गर्ह्य ठरत नाही. वेषभूषेच्या प्रकरणीं अमुक अेक गोष्ट महाराष्ट्रीयत्वाची द्योतक आहे असें मला दिसलें, तर तिचा मी अवश्य स्वीकार करीन. तसें ठरलेलें नाही तोंपर्यंत मी

माझें अभिरुचिस्वातन्त्र्य घालवायला अनुकूल नाही. कोट-पाटलोण ही काही आता अमुकच अेका देशाची अशी खूण राहिलेली नाही. तेव्हा जोंपर्यंत मी स्वदेशी कापड वापरून स्वदेशी विणकऱ्यांचें हित पहात आहें तोंपर्यंत कोट-पाटलोणींच्या घाटाने कोणताच अधर्म होत नाही. आपल्याला मान मिळावा वा अज्ञ जनांनी भ्यावें म्हणून जर मी हा वेष करीन तर तें पेठी प्रतिष्ठेसाठी खादीची डगलाटोपी घालण्याअितकेंच निन्द्य होअील. विलायती वेषपद्धत म्हणून मी काही तिची प्रतिष्ठा मानीत नाही. विलायती पद्धतीचा वेष केला असतांना मी अुघड भाजीपालाच काय पण खराटाहि घेअून राजरस्त्याने जाअूं शकतों, नव्हे, गेलों आहे हें दूषण ठेवणाऱ्यांनी ध्यानांत धरावें. मी हिन्दुस्थानी हिन्दु महाराष्ट्रीय आहे. वैयक्तिक सङ्कुचित स्वार्थाच्या मागे न लागतां समाजाच्या हिताची काळजी वाहून स्वयंस्फूर्तीने कर्तव्याचरण करावें यापरता धर्म नाही.

नामें 'माधव-जूलियन्' प्रथमतः जो होय पद्याश्रयी
अन् नेअी 'पटवर्धन'-द्विजकुल प्रख्यातितें वाङ्मयीं,
जो 'छन्दोरचना' रची, प्रगति जो शास्त्रीं करी तत्त्वता
'भाषाशुद्धि-विवेक' सिद्ध करुनी तो दे सुधींना अता.

# बहिष्कार्य शब्दांचा कोश

अक्कल– बुद्धि, शहाणपण.
अक्कलेचा खन्दक– बुद्धीचा गड्डा.
अक्कलहुशारीने– सावधानचित्ताने.
अकस– तेढ, वैर.
अखत्यार– अधिकार.
अखेर– शेवट, अन्त; शेवटीं.
अगर– अथवा.
अङ्गुस्तान– बोट-टोपण.
अजब– विचित्र, आश्चर्यकारक.
अजमावणें– पारखणें.
अजमास– अटकळ.
अजिजी– गयावया, अतिलीनता.
अत्तर– फुलेल.
अत्तर-गुलाब– मानपान.
अत्तरदाणी– फुलेल-पात्र.
अदब– सभ्यपणा, नम्रपणा.
अदा– फेड.
अदावत– तेढ, वैर.
अन्दाज– प्रमाण, तर्क, अटकळ.
अन्दाजपत्रक– अटकळ-पत्रक.
अनामत– विश्वास-ठेव, ठेव.
अफरातफर– अपहार.
अफवा– कण्डी, भुमका, किम्वदन्ती.
अब्रू– प्रतिष्ठा, लौकिक.
अम्मल–कृति, गुङ्गी, सत्ता, समय.
अम्मल-बजावणी–वहिवाट, करणी.
अम्मल-दार– अधिकारी.
अम्मलदारी– अधिकार.
अमदानी– आवक, भरभराट, राजवट.
अमीर-उमराव– महाराव.
अर्क– निष्कर्ष, अङ्गरस.
अर्ज– निवेदन, विनन्तीपत्र.
अर्जदार– निवेदक, याचक.
अर्जी– याचना.
अल्बत्– खचित, निश्चित.
अला-बला– अिडा-पीडा.
अलाहिदा– पृथक्, निराळें, सवतें, पृथक्पणें.
अव्वल– प्रथम, प्राथमिक.
अवअी– भुमका.
अवलाद–प्रजा, सन्तान.
अश्राप– सज्जन.
अस्तनी– बाही.
अस्मान– आकाश.
अस्मानी– आकाशी.
अस्मानी-सुलतानी– महदापत्ति, क्रान्ति.
अस्सल– मूळ, अकृत्रिम, जातिवन्त.
असामी– वार्षिक नेमणूक, व्यक्ति.

अहवाल— वृत्तान्त, अितिवृत्त.
आजार— दुखणें, व्याधि, विकार.
आजारी— अस्वस्थ, दुखणाअीत, दुखणेकरी.
आजू बाजूस— अवती-भवती.
आतश बाजी— आग-खेळ.
आदत— सवय, खोड.
आदमी— माणूस.
आदा— आवक, अुत्पन्न, आय.
आफत— आपत्ति, आपदा.
आब— प्रतिष्ठा, दरारा.
आब-कारी— फुल्सराअी, सुरा-अी (खातें), मदकारी.
आब्दागीर— सूर्यपान.
आबाद— समृद्ध, सम्पन्न.
आबादी-आबाद— भरभराट, सम्पन्नता, सुबत्ता.
आबादानी— भरभराट, चलती.
आम-दार(?)— लोकप्रतिनिधि.
आराम—विश्रान्ति,शान्ति, स्वास्थ्य-
आराम-खुर्ची— विश्रामखुर्ची
आरामशीर— शान्त, शान्तपणें, स्वस्थपणें.
आरास— सजवणूक,शृङ्गार-माण्डणी.
आलमदुनिया— सारें जग.
आलेजाही कारखाना—विराट खटला
आवाज— ध्वनि, स्वर.
आवाजी— कण्ठ, गळा.
आशक— प्रेमिक.
आशुकमाशुक— प्रणयी जोडपें.
अिज्जत— प्रतिष्ठा.
आस्ते— हळू! धीरे!
अिजा— दुखापत; अपाय.
अितबार— विश्वास.
अितमाम— परिवार, सन्मान.
अितराजी— राग, रोष.
अिनकार— नकार, अमान्यता.
अिन्साफ—न्याय-निवाडा.
अिनाम— पारितोषिक, दान.
अिनाम जमीन—दानभूमि, अग्रहार-भूमि.
अिनामी— अग्रहार.
अिब्लीस— दुष्ट, खोडसाळ, दैत्य.
अिभ्रत— पत-प्रतिष्ठा.
अिमला— वास्तु, मन्दिर.
अिमान— वचन, सचोटी.
अिमानें-अितबारें— अेकनिष्ठेने.
अिमारत— मन्दिर, बान्धकाम.
अिराखत— लघ्वी.
अिरादा— मनोदय, विचार, बेत.
अिलाखा— प्रान्त.
अिलाज— अुपाय, अुपचार.
अिश्क— प्रेम, प्रणय.
अिश्क-बाज— छाकटा, रङ्गेल, विलासी.
अिश्कबाजी—छाकटेपण, प्रणय-विलास.
अिशारत, अिशारा— सूचना.
अिसम— मनुष्य.

अिसवी सन– खिस्ताब्द.
अुमदा– जातिवन्त, थोर, गुणी.
अुमर– वय, आयुष्य.
अुमराव– महाराव.
अुमेद– आशा, धीर, आकाङ्क्षा.
अुमेद-वार–आशाअीत,बिनपगार, स्पर्धालु.
अुमेद-वारी– बिनपगारी सेवा.
अुर्फ– म्हणजे.
अुस्तवारी– शुश्रूषा, व्यवस्था.
अेकदम– अेकाअेकी.
अैन– भर.
अैना– आरसा.
अैनेमहाल–आरसेमन्दिर.
अैपत– सामर्थ्य, अर्थशक्ति.
अैपतदार– श्रीमन्त, समर्थ.
अैवज– मत्ता, द्रव्य.
अैवजीं– ठिकाणीं.
अैशाराम– सुख-विलास.
कङ्गाल– दरिद्री.
कङ्गोरा– कड, काठ.
कजा– खटला, तण्टा.
कजेदलाल– नारद, भाण्डखोर,
कजाग– कर्कशा, बोलभाण्ड.
कत्तल– कापाकापी, संहार, हत्याकाण्ड.
कतबा– लेख.
कदम– पाअूल.
कदर– योग्यता, प्रभाव.
कब्जा– मूठ, पकड, स्वामित्व, भोगवट.
कबर– थडगें, समाधि.
कबरस्तान– निखनन-स्थान.
कबिला– कुटुम्ब, परिवार.
कबुलायत– सम्मतिपत्र, स्वीकार-पत्र.
कबुली– मान्यता,सम्मति,प्रतिपत्ति
कबुलीजबाब– मान्यता-वचन, स्वीकार-वचन.
कबूल– मान्य,अनुकूल.
कबूतर-खाना– कपोत-घर.
कम-अस्सल– अकरमाशा.
कम-कुवत– दुर्बळ.
कम-जास्त– न्यूनाधिक,अुणेअधिक
कमजोर– दुर्बळ.
कमतरता– अुणीव, तुटवडा.
कमनशीब– दुर्दैवी; दुर्दैव.
कम्बक्ती– दुर्दैव, शिक्षा.
कमर, कम्बर– कड, कटि, मध्य, माज.
कमर-पट्टा– माज-पट्टा.
कमान– खण्डमण्डल, तोरण, कमठा, धनुष्याकृति.
कमाल– पराकाष्ठा,कळस,महत्तम, धन्य.
कमी– अुणें.
कमी करणें = काढून टाकणें, मागें घेणें.
कमी होणें– अुणावणें.
कयास– अटकळ, तर्क.

कर्ज– ऋण, रीण.
कर्जखत, कर्जरोखा– ऋण-पत्र.
कर्जदार– ऋणाअीत, ऋणको.
कर्जबाजारी– ऋणग्रस्त.
करामत– कौशल्य.
करार– ठराव, निश्चय, आण-भाक.
करारनामा– ठराव-पत्र.
करारी– निश्चयी, बाणेदार.
करोल (अुत्पन्न)–सिद्ध, सज्ज, अढळ.
कल्हअी– कथिलाचें पाणी.
कलम– पन्हेरें.
कलम करणें– छाटून टाकणें.
कलमबहाद्दर–लेखणीशूर.
कलमवार– क्रमशः, सविस्तर.
कवायत– सामुदायिक हालचाल, 'सञ्चलन'.
कवायती– सञ्चलनी.
कसब– गुण, कला, कौशल्य.
कसबी– गुणी.
कसबीण– वेश्या.
कसरत– व्यायाम.
कसरती– व्यायामशील.
कसर– अुणीव, तुटवडा.
कसाब– खाटीक.
कसूर– चूक, हयगय.
कसोशी– कष्टाळूपणा, दक्षता.
कहर– कोप, प्रळय.
कहार– अुन्छाद.
कहारी (स्वभाव)– सन्तापी.
कागद– पत्र, पान.
काफर– लुच्चा, लबाड, धूर्त.
काबीज– पाडाव, हस्तगत.
काबूंत– स्वाधीन, कह्यांत.
कायदा– नियम, दण्डक.
कायदे-कानू– नियमदण्डक.
कायदेबाज– विधिविशारद.
कायदेशीर– सशास्त्र, विहित.
कायम–टिकाअू, ठाम, स्थिर, स्थायी.
कायमचा (निकाल)– नित्याचा, शेवटला (निर्णय).
कारकीर्द– राजवट, सत्ताकाळ.
कारकुनी–खर्डेघाशी.
कारकून–खर्डेघाशा.
कारखाना– काम-घर.
कारखानदार– कामघर-धनी.
कारभार– राज्यव्यवस्था, पाळ-मार, ताडनपालन, राजशासन, अुद्योग.
कारभारी– व्यवस्थापक, कार्यकर्ता, धुरीण, दादला.
कारस्थान– व्यूह; कारवाअी.
कारागिरी– कौशल्य, हस्तनैपुण्य.
कारागीर– शिल्पी, कुशल कामकरी.
काळे-शार– काळे-रोम.
किताब-खाना– ग्रन्थ-भाण्डार.
किताब– सम्बोधन, पदवी.
कित्ता– अक्षर-वळण; वळण.
किनार– कांठ, कोर.
किनारा– तीर, कांठ, वेळा (पुलीन)
किफायत– लाभ.
किफायतशीर– लाभदायक.

किम्मत— मूल्य, योग्यता; महत्त्व.
किमती— मूल्यवान्.
किल्ला— गड, दुर्ग, कोट.
किल्ली— चावी.
किल्लेदार— गडाधिकारी.
कुची— गल्ली, बोळ.
कुमक— अुपराळा, साहाय्य.
कुर्बाण करणें— ओवाळून टाकणें.
कुर्रेबाज— अैटदार, चढेल, मानी.
कुली— मोलारी, मोलकरी.
कुलूप— तालें.
कुवत— शक्ति.
कुस्ती— झोम्बी; मल्लयुद्ध.
कूच— प्रयाण.
कूच-दर-कूच—सारख्या चाली करीत.
केरवा— दृष्टमणि.
कैची— पकड, कात्री.
कैद— अटक, बन्दीकरण.
कैद-खाना— अटक-घर.
कैदी— बन्दी, राजबन्दी.
कैफ— धुन्दी, अुन्माद.
कैफियत— वर्णन, वृत्तान्त.
कोतें (ज्ञान)— अपुरें, थोडें.
कोम— पत्नी, जिवा कोम दगडू.
कोशीस— प्रयत्न, परिश्रम.
ख्याली-खुशाली— रङ्गढङ्ग, सुख-विलास.
खञ्ची— निर्वृषण.
खजिना— सांठा, भाण्डार, कोष.
खजिनदार— भाण्डारी, कोषाध्यक्ष.
खजील— ओशाळा, लज्जित, खट्टू.
खडाजङ्गी— कडाक्याचें भाण्डण.
खत— प्रमाणपत्र.
खतम— समाप्त.
खन्दक— चर, परिखा; गड्डा (बुद्धीचा)
खप्पा-मर्जी— रोष.
खबर— वार्ता, समाचार.
खबर-बात— वार्ता-समाचार.
खबर-दार— सावध, सम्भाळ! सावधान! हां! ध्यानांत धर.
खबर-दारी— सावधानता, काळजी.
खमीर— अम्बवण, फुगवण.
खर्च— वेंच, व्यय, विनियोग; व्ययित.
खर्च-वेंच— व्यय-वेंच.
खर्चणें— वेंचणें, व्यय करणें.
खर्ची— वेच-पैका.
खर्ची पडणें— व्ययित होणें.
खर्चीक— अुधळ्या.
खराब— वाओीट, दुराचरणी. ख॰ होणें, करणें=बिघडणें, बिघडविणें.
खराबी— नासाडी, बिघाड, दुर्दशा.
खरीप— कार्तिकपिक.
खरेदी— क्रय.
खल्बत— अेकान्त, गुप्तचर्चा.
खलाशी— नावाडी.
खलास— समाप्त.
खलिता— थैली, राजपत्र.
खसखस— अफू-बीं.
खाक— राख.
खाजगी— व्यक्तिगत, गुप्त.

खातर– क्षिति;-साठीं.
खातर-जमा– समाधान, शङ्का-निवारण, निर्वाळा, निःशङ्कता.
खात्री– दृढमत, निश्चय, निर्वाळा.
खात्रीने– खचित, निश्चित.
खात्रीलायक– विश्वसनीय.
खाजगी– गृहविषयक, व्यक्तिगत.
खानदानी– कुलीन, अुच्च, थोर-कुळी.
खाना– महाभोजन,-घर.
खानेसुमारी– शिर-गणती.
खामी–दोष, अुणीव.
खामोश– गप !
खालसा– अिङ्ग्रजांचे सत्तेखालील; सर्कार-ग्रस्त.
खाली– रिकामा.
खावन्द– प्रभु, स्वामी.
खाशी– अुत्तम, चाङ्गलें !
खास– विशेष, विशिष्ट, निश्चित, खरोखर.
खास-दार–अश्वसेवक; वर्गप्रतिनिधि.
खासा– अभिजात; श्रेष्ठ; श्रीमन्त, राजघराण्यांतील जवळचा.
खिदमतगार– परिचारक.
खिरापत– प्रसाद; साखरखोबरें.
खुद्– स्वतः जात्या; जातीने.
खुनी– मारेकरी.
खुप-सुरत– सुन्दर.
खुबी– रहस्य, मर्म, मार्मिकपणा, चतुराअी.
खुबीदार– मार्मिक.
खुमारी– चटक, चटकदारपणा.
खुराक– आहार.
खुर्द– लहान.
खुलासा– अुलगडा; स्पष्टीकरण; शुद्धभाव.
खुलासेवार– सविस्तर, स्पष्टपणें.
खुश्कीने– भू-मार्गें.
खुश-मस्करी– थट्टा, विनोद.
खुश-मस्कऱ्या– विदूषक.
खुशामत–तोण्डपूजा; तोण्डपूजेपणा; प्रियभाषण; लाळघोटेपणा; हांजी-हांजी.
खुशामत्या– लाळघोट्या.
खुशाल– सुखरूप; बेधडक; सुखेनैव.
खुशाली– सुखरूपता, क्षेमकुशल.
खुशी– अिच्छा; स्वेच्छा; लहर; रङ्ग; अिच्छु.
खून– हत्या.
खूप– पुष्कळ, अुत्तम ! भले !
खूश– सुप्रसन्न.
खेरीज– वांचून,-विना,-वीण; वगळून, व्यतिरिक्त; आणि वर.
खैर– बरें, भलें, गोमटें.
खैरात– दानधर्म; देकार.
खोगीर– पलाण.
खोगीर-भरती–कुचकाम्यांचा भरणा.
गच्ची– आगाशी; चुन्याचें धाबें.
गहजब– कोप, प्रलय, अनर्थ.
गन्ज– ताम्ब, ताम्बारें, कीट.

गन्जणें– ताम्बारणें.
गन्जी– रास.
गन्जीफा– दशावतारी वाटोळे पत्ते.
गडद– दाट.
गडप– ग्रस्त, अदृश्य.
गनिमीकावा– मराठ-कावा.
गप्प–थाप, कल्पित कथा.
गप्पा-सप्पा– गोष्टी-कहाण्या.
गप्पीदास–थापाड्या, बाताड्या.
गफलत–दुर्लक्ष, घोटाळा.
गमजा– खेळ, चवण्या, चावटपणा.
गम खाणें– मूग गिळणें.
गर्क– निमग्न.
गर्द– दाट.
गर्दन– मान.
गर्दी– दाटी, समूह, संमर्द.
गरमा, गरमी– अुष्मा, अुकाडा, अुपदंश.
गरज–प्रयोजन, अुणीव, नड, अडचण.
गरजवन्त–नडलेला, अडलेला.
गरजवन्ताला अक्कल नाही– नडलेला सदा गाढव.
गरम– तप्त,. अून.
गरम होणें– तापणें, तावणें.
गरमागरम– अूनअून.
गरीबी– दारिद्र्य, नम्रता.
गरीब– दरिद्री, दीन, निरुपद्रवी.
गरीबगुरीब– दीनदुबळे.
गलबत– तारूं.
गल्लत–फिरवाफिरव, घोटाळा, चूक.
गल्ला– आवक-पैका.
(गल्ली) कुची– बोळकण्डी.
गलबला– गडबड, धामधूम, गोन्धळ.
गलेफ– खोळ, अभ्रा.
गस्त– फिरती, रात-फिरती.
गाफील– असावध, निष्काळजी.
गाफिलगिरी– असावधता, निष्काळजीपणा, हयगय.
गारद– मृत, नष्ट.
गिर्दी–वाटोळी अुशी.
गिरिफ्तार करणें–अटक करणें.
गिलावा– लिम्पण.
गिल्ला–ओरड, हाकाटी.
गुङ्ग–निमग्न.
गुङ्गी– भूल, 'सुनी' (नागपुरा-कडील); बेशुद्धि.
गुजरणें– प्रविष्ट करणें.
गुजराण; गुजारा– निर्वाह, अुप-जीविका.
गुदस्तसालीं, गुदस्ता– गतवर्षी.
गुन्हा–अपराध, दोष.
गुन्हेगार– अपराधी, दोषी.
गुमास्ता– प्रतिनिधि, सेवक.
गुमास्तगिरी– प्रतिनिधिपण.
गुर्मी– चढेलपणा; माज; मद.
गुल्कन्द– गुलाबपाक.
गुल्छबू– निशिगन्ध; रङ्गेल.
गुल्जार– टवटवीत, विलासी.

गुलहौशी— रसिक, रङ्गेल.
गुलाबी— सौम्य, सुखकर.
गोडीगुलाबीने— खेळीमेळीने, सामोपचाराने.
गुलाम— दास; लबाड.
गुलामगिरी— बन्दि-विक्री, दास्य.
गू— विष्टा.
गैर— अयोग्य.
गैरमर्जी— अवकृपा.
गैरवाजवी— अयोग्य.
गैरशिस्त— नियमबाह्य.
गैरसमज— अपसमज.
गैरहजर— अनुपस्थित.
गोता— चट्टा, बूड, ठोकर.
गोशवारा— साराश.
गोशा— अदर्शन; अन्तःपुर.
ग्वाही— साक्ष.
घुमट— डेरा, कलश.
घुस्सा— राग, रोष.
घोडे-मैदान— घोड-दौड, रणखेत.
चपाती— अेकचाडी, पोळी, फुलकी.
चबुतरा— चौथरा.
चरबी— मेद, माज.
चलाख— चपळ, तरतरीत.
चलाखी— चापल्य, तरतरी.
चहूं-बाजूस— चहूंकडे.
चश्मा— आरशी, अुपनेत्र.
चाकर— सेवक.
चाकरपेशा— सेवकवृत्तीचा.
चाकरी— सेवा.
चाकू— सुरी.
चापट— थप्पड, थाप.
चापणें— रागेजणें, रागें भरणें.
चाबूक— कोरडा, आसूड.
चीज— वस्तु, पद.
चीजवस्त— वस्तुमात्र.
चुगली— चहाडी.
चुगलखोर— चहाड-करी.
चेहरा— तोण्ड, मुद्रा, चर्या, तोण्ड-वळा.
चेहरेपट्टी— तोण्डवळा.
चोप— दण्ड, मार, ठोक.
चोपणें— ठोकणे, मारणें.
चोपदार— वेत्रधारी.
छबिना— रातमिरवणूक, मिरवणूक.
छान— सुन्दर.
छानछोकी— झोक, डामडौल.
छापखाना— मुद्रणालय.
छापणें— ठसविणें, मुद्रित करणें.
छापा— मारा.
ज्वान— तरुण.
ज्वानी— तारुण्य.
जकात— कर-पट्टी.
जखम—घायटा, क्षत, दुखापत.
जखमी— घायाळ.
जङ्गजङ्ग पछाडणें— आटोकाट प्रयत्न करणें.
जङ्गल— रान.
जङ्गली— रानटी.
जञ्जिरा— पाणकोट; सिन्धुदुर्ग.

जड-जवाहीर– सोनें, नाणें.
जनान-खाना– अन्तःपुर.
जनाना– स्त्रीपरिवार, अन्तःपुर.
जनानी– स्त्रैण, बायकी.
जनावर– प्राणी, पशु.
जप्त– राज-हृत; राजग्रस्त.
जप्ती– राजग्रास.
जबर– मोठा, भारी, वरचढ.
जबर-दस्त– बलाढ्य.
जबर-दस्ती– बलात्कार, बळ.
जबरी– बलात्कार.
जबानी– साक्ष.
जबाब– अुत्तर.
जबाब-दार– अुत्तरदायी, विचारी.
जबाब-दारी– भार, अुत्तरदायित्व, 'वक्तव्य'.
जम– सन्च, जुळवा-जुळव, बस.
जम-जमणें– बस बसणें.
जमणें– अेकवटणें, मिळणें.
जमविणें– मिळविणें.
जमा– प्राप्ति, गोळा.
जमाखर्च– आयव्यय.
जमादार– नायक.
जमाना– काळ; मनु; समय.
जमाबन्दी– साराठरवणूक.
जमाव– समूह.
जमीन– भूअी, भूमि, शेत.
जमीन-दार– शेत-धनी.
जमीन-दोस्त– चीत, भुअी-सपाट.
जमीन-जुम्ला– शेतीवाडी.
जय्यत (तयारी)– सम्पूर्ण (सिद्धता), सज्ज.
जरतारी– सोनसळी.
जरब– धाक, दरारा.
जरा– अम्मळ, तिळमात्र.
जराशाने– थोड्या वेळाने.
जरूर– अवश्य, आवश्यकता, अुणीव, क्षिति.
जरूरी– आवश्यकता, अुणीव, क्षिति.
जल्सा– गाणें-वाणें, गाणें--बजावणें, बैठक (गाण्याची).
जलद– द्रुत, तातडीने, सत्वर.
जलदी– धाअी, त्वरा.
जवाहीर– रत्नसङ्ग्रह.
जवाहीर-खाना– रत्नभाण्डार.
जहर– विष.
जहरी– विषारी.
जहाज– तारूं.
जहांबाज (स्त्री)– धाडशी, कर्कशा, बोलभाण्ड.
जागा– स्थळ, स्थान, ठिकाण, वाव.
जात (किताब)–व्यक्तिगत (पदवी).
जादा– अधिक, पुरवणी.
जादू– गारूड, चेटुक, माया, चमत्कार.
जादूगार– गारुडी, चेटक्या.
जादुगारी– मोहनी, चेटुक.
जानीदोस्त– जिवलग मित्र.
जामा–पृथक् बिऱ्हाड.
जामदारखाना– वस्त्रागार, दागिने-

भाण्डार.
जामा-निमा— वेष.
जामीन—प्रतिभू, बन्धक.
जायबन्दी— निरुपयोगी.
जाया— घायाळ, निरुपयोगी.
जारी— चालूं.
जारीने— नेटाने.
जालीम— जहाल, जळजळीत.
जास्त— अधिक.
जास्त-कमी— अधिक-अुणें.
जासूद— निरोप नेणारा.
जाहीर— अुघड, सार्वजनिक (भाषण, सन्मान), प्रकट.
जाहीर करणें— प्रकाशित करणें.
जाहीरपणें—अुघडपणें, प्रकटपणें.
जाहिरात— परिचायिका, प्रकटन.
जाहीरनामा— प्रसिद्धिपत्रक.
जिकीर— कटकट, घासाघीस, त्रास, भगभग.
जिगर-दोस्त— जिवलग मित्र.
जिणगर— पलाण-करी.
जिन्दगी— धन.
जिन्नस— वस्तु.
जिना— दादर, सोपान.
जिम्मा—भार,अुत्तरदायित्व, 'वक्तव्य'
जिराअीत— शेत-भूमि; पाअूस-पिकी भूमि.
जिल्हअी— अुजळा.
जिल्हअीदार— अुजळाअीत.
जीन - पलाण.
जुजबी— किरकोळ.
जुमानणें— गांठणें.
जुलमी— अन्यायी, बलात्कारी.
जुलाब— रेचक; रेच, ढाळ.
जुलूम— बलात्कार, अन्याय, पीडा.
जेरीस आणणें—हतबल करणें.
जोर— शक्ति, सामर्थ्य, अुठाव, नेट.
जोरकस—बळकट.
जोरी— बळ,बलात्कार.
जौजे— पत्नी.
टन्चाअी— चणचण, तुटवडा, महागाअी.
डाग— चटका, चरका.
डागणें— भाजणें, चटका देणें.
डाव-पेच— युक्ति-जुक्ती, कारवाअी.
तख्त--सिंहासन.
तख्तपोशी— कडीपाट; फळीबन्दी'
तक्ता— फळी, कोष्टक.
तक्रार— आक्षेप, ओरड, कागाळी, गाऱ्हाणें.
तक्रारखोर— कुरकुऱ्या, कटकऱ्या.
तकलादी— भङ्गुर.
तकलीफ— त्रास.
तकलुबी— बनावट, भङ्गुर.
तकवा— अुत्साह.
तक्शीम— वांटा.
तगाअी— दाणेपैका.
तगादा— निकड, लकडा.
तङ्ग— घट्ट, आवळ.
तङ्गी— तुटवडा, चणचण;

महागाओी.
तजवीज– व्यवस्था; अुपाय.
तजेला– टवटवी, नव्हाळी.
तनखा–वेतन, पगार.
तन-दुरुस्ती– आरोग्य.
तप्शील– स्पष्टीकरण, विस्तर.
तपास, तपासणी– चौकशी, शोध.
तपासणें– पारखणें, शोधणें.
तफावत– अन्तर, भेद.
तब्येत–प्रकृति; स्वभाव; लहर.
तबेला–घोड-घर.
तम्बी–धमकावणी, कानपिचकी.
ची तमा ठेवणें– क्षिति बाळगणें.
तमाम– सर्व; झाडून सर्व, अेकन्दर.
तयार– सिद्ध, सज्ज.
तयारी– सिद्धता, सज्जता; अभ्यास; जुळवाजुळव.
तर्जुमा– भाषान्तर; अनुवाद.
तर्तूद– व्यवस्था.
तर्फेने– कडेने, पक्षाने, करून; वतीने.
तर्बेज– सुशिक्षित, पारङ्गत, निष्णात.
तर्र– धुन्द.
तऱ्हा– रीत, प्रकार, टूम.
तऱ्हेदार– टुमदार.
तऱ्हेवाओीक– चमत्कारिक, विक्षिप्त.
तरफ– 'अुच्चालक'.
तरफ्दारी–समर्थन; कैवार.
तराजू– काटा; तागडी.
तल्लख– तिखट.
तल्खी, तल्खली– आग, काहिली.
तलफ– हुक्की.
तलाव– तळें.
तलास– शोध, चौकशी.
तस्त– पिक-भाण्डें, थुङ्क-भाण्डें.
तस्दी– त्रास.
तस्बीर– चित्र, छबी, छाया, प्रतिमा.
तहकूबी– थाम्बवणूक.
तहकूब– स्थगित.
तहत–सरळपर्यन्त.
तहाहयात– आजन्म, आजीव.
ताकद– शक्ति.
ताकीद– कडक आज्ञा.
तागायत– पर्यन्त.
आज-तागायत– अद्ययावत्.
ताजा– नवा, नव्हाळ, टवटवीत, अुनअून, अलीकडील.
ताजा कलम– पुरवणी लेख.
ताजातवाना– हतश्रम, टवटवीत.
ताजीम (खडी)– अुत्थापन.
ताफा– मेळा, मण्डळी.
ताबा– नियन्त्रण, सत्ता.
ताबेदार– अङ्कित, सेवक.
तारीख– दिवस, मिति.
तारस-खाना– शौचकूप.
तारीफ– प्रशंसा, स्तुति.
तालीम– आखाडा, व्यायामशाळा; अभ्यास, पूर्वप्रयोग (रङ्गीत).
तालीमबाज– आखाड-बाज.

ताले (शिकन्दर)– दैव (अुन्चीचें).
तालेवार– भाग्यशाली.
ताव (मिशीवरील)– पीळ.
तावदान– काच-फळी.
तिरन्दाज– बाणमारी, धनुर्धारी.
तिरन्दाजी– धनुर्वेद, लक्ष्यभेद.
तुणतुणें– चोण्डकें.
तुफान– वादळ; भयङ्कर.
तुफानी– क्षुब्ध, वादळी.
तुमान– चोळणा.
तुरुङ्ग– कारागृह, बन्दी-घर.
तेज– तिखट.
तैनात– नेमणूक, सेवा.
तोशीस– त्रास, चाट, झीज.
तोहमत– आळ, बालण्ट
त्वेष– रागाचा झटका, चीड.
दखल-गिरी– ठाअुकी.
दखल– ठाअुक, ठाअुकी, द० – घेणें=ध्यानांत घेणें.
दगलबाज– कपटी, फसव्या, घातकी.
दगल-बाजी– कापट्य, विश्वासघात.
दगा– फसवणूक, घात.
दगावणें– मरणें.
दङ्ग– निमग्न.
दङ्गल– गडबड, दाटी, झोम्ब्या.
ददात– अडचण, तुटवडा, काळजी.
दफन– पुरणें, निखनन, मूठमाती.
दबदबा– दरारा.
दम– धाप, श्वास. द० धरणें= थाम्बणें, टिकाव धरणें. द० देणें =धमकावणें. द० (पुरणें)=शक्ति.
दमदार– काटक, छातीचा.
दमणें– थकणें.
दमा– धाप, श्वासरोग.
दमेकरी– श्वासरोगी.
दर-रोज– प्रतिदिनीं.
दरकूच दर मजल– सारख्या दौडीने.
दर्कार– चिन्ता, प्रतिष्ठा.
दर्खास्त– मागणी.
दर्जा– पायरी, पत, योग्यता.
दर्दी– तज्ज्ञ, किडा.
दर्बार– राजसभा.
दर्बारी– विशिष्टाचारी.
दर-महा– प्रतिमासीं.
दर-म्यान– मध्ये.
दर्या– समुद्र.
दर्यावर्दी– समुद्रप्रवासी.
दरवाजा– द्वार, महाद्वार.
दरोबस्त– समस्त.
दलाल– मध्यस्थ, अडत्या.
दलाली– मध्यस्थी, अडत.
दवा– औषध.
दवा-खाना– औषधालय, वैद्य-घर.
दस्त– हात, पट्टी.
दस्तक –अनुज्ञापत्र.
दस्ता– मूठ.
दस्तुरी– वाट-पट्टी, वाहतूक-पट्टी.
दस्तैवज– प्रमाणपत्र.
दहशत– धाक, धडकी.
दाखल– प्रविष्ट.

दाखला– प्रमाणपत्र, पडताळा, उदाहरण.
दाणा– कण, धान्य, गोळी.
दाणादाण– पाङ्गापाङ्ग.
दाणेदार– कणीदार.
दाणा– शाहणा.
दाणी– धानी.
ची दाद घेणें– कडे लक्ष देणें.
दानत– बुद्धि, सद्बुद्धि.
दारू– मद्य, आग-पूड.
दारू-काम– आग-खेळ.
दारू-गोळा– आग-सामग्री.
दारू-बाज– मद्यपी.
दालन– सभामण्डप.
दावा– भाण्डण, वैर.
दावेदार– वैरी.
दावेदारी– वैर.
दिक्कत– क्षिति.
दिमतीस– सेवेस.
दिमाख– तोरा, डौल.
दिरङ्गाअी– अुशीर, विलम्ब, रेङ्गाळणी.
दिल– हृदय, काळीज, अन्तःकरण
दिल-गीर– श्रमी, खिन्न. दि०असणें ला वाअीट वाटणें.
दिल-गिरी– खेद.
दिल-जमाअी– समेट, सख्य.
दिल-दार– अुदार, सहृदय.
दिल-सफाअी– मनःशुद्धि.
दिल-भर– मनोहर, दयित.
दिलासा– आश्वासन, सान्त्वन.
दिवाण– प्रधान.
दिवाणजी– प्रधानजी.
दिवाणखाना– सभामण्डप.
दिवाण-गिरी– प्रधान-की.
दुकान– विक्री-घर, पसारा.
दुकानदार– विक्री-करी, व्यापारी.
दुतर्फा– दु-कडां, दु-कडे.
दुतर्फी– दुटप्पी, दुलग, दुपक्षी.
दुनिया– जग.
दुबार– दोनदा.
दुय्यम– हाताखालचा, गौण.
दुर्बीण– दूरदर्शी.
दुरुस्त– नीट, शुद्ध, व्यवस्थित.
दुरुस्ती– सुधारणा, सान्धजोड.
दुवा– आशीर्वाद, धन्यवाद.
दुवाब– अन्तर्वेदी.
दुस्मान– वैरी .
दुही - बेकी, फूट.
देखील– सुद्धा.
देणगी– दान.
देणेदार– ऋणको.
दोस्त, दोस्तदार– मित्र, स्नेही.
दोस्ती–मैत्री.
दौत– मशीधानी.
दौलत– सम्पत्ति, धन, राज्य.
धन-दौलत– धन-सम्पत्ति.
धास्त– भय, धडकी.
न्यहायत– अत्यन्त, नितान्त.
न्यहारी– सकाळ खाणें.

नकल– प्रतिकृति, प्रत, वेडावणूक.
नक्‌शा– प्रतिष्ठा.
नकशी– वेलबुटी.
नकशीदार– वेलबुटी-दार.
नक्की– निश्चित, नेमकें.
नकला-कार– बहुरूपी, भोरपी.
नकली– बनावट, कृत्रिम, भङ्‌गुर.
नकल्या– अनुकरण-करी, भोरपी.
नकाशा–रेषाचित्र.
नक्त, नगद– रोख, रोकड.
नखरा– थाटमाट, तोरा.
नगार खाना– डङ्केघर.
नगारा– डङ्का.
नजर– भेट.
नजराणा– अुपायंन.
नजर– दृष्टि.
नजरकैद– साधी अटक.
नजरबन्दी–साध्या अटकेंत,भुलावणी.
नजरानजर– दृष्टादृष्ट.
नजीक– जवळ, सन्निध.
नफरत– तिटकारा.
नफा– लाभ.
नफेबाजी– लाभ-लोभ.
नफेशीर– लाभदायक.
नमुना– आदर्श, वानगी.
नमुनेदार– आदर्शभूत.
नमूद– निर्दिष्ट.
नरद– सोङ्‌गटी.
नरम– मअू, मवाळ.
नरमणें– मवाळणें.
नर-मादी– पुरुष-स्त्री.
नशा– धुन्दी.
नशीब– दैव.
नशीब काढणें– भाग्यास चढणें.
नाअिलाज– निरुपाय.
नाअुमेद– निरुत्साह.
नाकबूल– प्रतिकूल.
नाखुशीने– कष्टाने, अनिच्छेने.
नाखूश– असन्तुष्ट, अप्रसन्न, रुष्ट.
नाजूक– सुकुमार, कोमल, हळवा, महत्त्वाचा.
नादान– नेणता, कर्तृत्वशून्य.
नादार– दरिद्री, अकिञ्चन.
नादारी– शुल्कसूट.
नादुरुस्त– बिघडलेलें.
नापसन्ती– प्रतिकूलता, असम्मति.
नामदार– नामवन्त.
नामर्द– बायला, भ्याड.
नामी– नामवन्त, सुप्रसिद्ध, अुत्तम.
नामुश्की–अप्रतिष्ठा; अपकीर्ति.
नामोशी–अप्रतिष्ठा, अपकीर्ति.
नामोहरम– अपेशी, पराभूत.
नायब–साहायक.
नाराज– असन्तुष्ट.
नाराजी– असन्तुष्टता.
नालस्ती– खोटी निन्दा.
नालायक– अपात्र.
नालायकी– अपात्रता.
नाव-निशी– नामजन्त्री.
नाहक– निष्कारण, अुगाच, फुकट.

निकाल– निर्णय, परिणाम, फडशा.
निखालस– शुद्ध; निवळ.
निगा– जतन, जपणूक.
निम– अद-(समासांत).
निमक– मीठ.
निमकहराम– कृतघ्न.
निमकहरामी–कृतघ्नता.
निमकहलाल– कृतज्ञ.
निमकी– अदकी.
निरख–भाव.
निशाण– झेण्डा; ढाल.
निशाण-बाजी– नेम मारी; लक्ष्य-भेद, चान्दमारी.
निशाणी–खूण.
नुक्सान–तोटा; बूड; हानि.
नूर– तेज; लहर; प्रकार.
नेक-नामदार– सु-नामवन्त.
नेकी– चाङ्गुलपणा; सचोटी.
नेस्त-नाबूत–पार नाहीसा.
नोकर– सेवक.
नोकरशाही– सेवक-राज्य; सेवक-प्राबल्य.
प्यादा– पाअीक, पायचा माणूस.
प्याद्याचा फर्जी– पाअिकाचा नाअीक
प्याला– चषक.
पड्दा– आड-वस्त्र; अदर्शन.
पन्हा– रुन्दी.
परवा– चिन्ता, भीति, क्षिति.
पर्वानगी– अनुज्ञा.
पर्वाना– अनुज्ञापत्र.
पर– पिस.
परागन्दा– घरत्यागी.
पलिता– काकडा.
पस्त– नष्ट.
पसन्त– मान्य, प्रिय.
पसन्ती– मान्यता.
पाहिलवान– मल्ल, जेठी.
पाक– शुद्ध.
पागा– घोड-शाला.
पाजी– हलकट.
पाण्ढरपेशा– बुद्धिजीवी.
पाय-खाना– शौचकूप.
पायपोस– पादत्राण; पायताण.
पायमल्ली– तुडवणूक.
पाया– आधार.
पासङ्ग– धडा, आभण्ड.
पासङ्गास न पुरणें–तुळितांच न येणें.
पील-खाना– हत्ती-शाला.
पूल– सेतु.
पेच– पीळ, मळसूत्र, पकड, सङ्कट.
पेला– चषक.
पेशवा– पुढारी, पन्तप्रधान.
पेशवाअी– पन्तप्रधानकी, भट-राज्य.
पेशा– वृत्ति, धन्दा.
पैदा– अुत्पन्न, प्राप्त.
पैदास– निर्मिति, निपज.
पैलू– कड.
पैलूदार– शाणोल्लीढ.
पोक्त– पक्व, वयस्क.
पोत–वीण.

पोलाद– तिखें.
पोलादी– तिखारी.
पोशाख– वेष, कपडे.
पोशाखी– दिखाअू.
फक्त– केवळ, मात्र.
फकिरी– भिक्षुवृत्ति.
फजीत– लज्जित, अप्रतिष्ठित.
फजिती, फज्जा– अप्रतिष्ठा.
फत्ते– यशस्वी, विजयी.
फन्द–ढङ्ग.
फन्दफितूर– बण्डाळी.
फन्ना– फडशा, नाश, नष्ट.
फर्मान– आज्ञापत्र.
फर्मावणें–आज्ञापणें.
फर्माशी– अुत्कृष्ट.
फरासखाना– बैठकखातें.
फलाणा– अमुक.
फवारा– कारन्जें, अुत्क्षेप.
फस्त– नष्ट.
फाका– अुपास.
फाजील– अधिक, चावट.
फाजिलपणा– आगळीक.
फारकत– वेगळीक, विभक्तता.
फिकीर– काळजी, चिन्ता, आच, आस्था.
फितूर– बण्डाळी.
फिदा– अनुरक्त, सुप्रसन्न.
फिर्याद– कागाळी, गाऱ्हाणें.
फुर्सत– सवड, रिकामपण, अवकाश.
फैसला– फडशा, निवाडा, निर्णय.
फौज– सैन्य.
फौज-बन्द– सेना-सज्ज.
बक्षीस– पारितोषिक.
बकाली– व्यापारवृत्ति, असंस्कृत.
बगल– कांख.
बगलबच्चा– काख-पिल्लूं.
बगिचा– फुल-वाडी.
बजावणें– निक्षून साङ्गणें, कृतींत आणणें.
बजावणी– वहिवाट, करणी.
बडतर्फ– अेकीकडे, पदभ्रष्ट; दूर.
बडतर्फी– इकालपट्टी.
बद– कु–.
बद-ख्याली– दुराचारी.
बद-नामी– दुर्लौकिक.
बद-फैली– कु-कर्मी, व्यभिचारी.
बद्दल– करितां, साठी, कारणें ठिकाणीं.
बदल– पालट, फेर; स्थित्यन्तर.
बदलणें– पालटणें, फिरणें, फिरविणें.
बदला– फेड, परतफेड.
बदली– थारे-पालट.
बन्दर– नौकाशय.
बन्दा-गुलाम– अङ्कित, दास.
बन्दोबस्त– व्यवस्था; जपणूक; अुपाय.
बर्कत– लाभ, यश.
बर्खास्त– समाप्त, विसर्जन.
बर्फ– हिम, गोठ-पाणी.
बर-हुकूम– प्रमाणे.
बरोबर– समान, बिनचूक; योग्य,

-सर्वे,-समागमें,-सङ्गती.
बरोबरी— समानता; स्पर्धा.
बला— पीडा.
बस— पुरे !
बहर— भर.
बहाणा— निमित्त, ढोङ्ग.
बहाद्दर— शूर.
बहाद्दरी— शौर्य.
बहार— गम्मत; आनन्ददायक कृति.
बहाल-करणें— अर्पण करणें.
बहालमर्जी— सुप्रसन्नता; मोठा लाभ.
बाकी— शेष, अुर्वरित; नाही तर.
बाग— फुलवाडी, अुद्यान, अुपवन.
बागशाअी— रुखवत, वृक्षवाडी.
बागाअीत— मळा, मळे-लागवड.
बाजार— गुजरी, पेठ, हाट.
बाजार-गप्प— चिलमी वार्ता, वदन्ता.
बाजार-बुणगे— भलतेच, अ-लढाअू, कुचकामी लोक.
बाजिन्दा— खेळाडू, चाळवणारा.
बाजी— खेळ.
बाजू— कड, पक्ष.
बातमी— वार्ता.
बातमीदार— वार्ता-हर.
बाद— निरुपयोगी.
बाप-जादे— वाड-वडील.
बाब, बाबत— गोष्ट, सम्बन्धी.
बारकाअी, बारकावा— सूक्ष्मपणा.
बारीक— सूक्ष्म, कृश, सडपातळ.
बालेकिल्ला— टोक-गड, माथेगड.



बिचारा— बापडा.
बिगर— वांचून.
बित्तम्बातमी— सम्पूर्ण वर्तमान, अन्तःस्थ वार्ता.
बिदागी— बोळवणी.
बिन-तक्रार— निमूटपणें.
बिन-दिक्कत— बेधडक.
बिमार— अस्वस्थ, दुखणाअीत.
बिल्कूल— सर्वस्वी, मुळीच.
बिलन्दर— बे-लाग, अथाङ्ग लुच्चा.
बिशाद— छाती, प्राज्ञा, शक्ति.
बुढ्ढुक— वृद्ध, थोर.
बुर्खा— अवगुण्ठन.
बुरूज— हुडा.
बेअकली— अजाण, निर्बुद्ध, मूर्ख.
बे-अदबी— अपमान.
बेअब्रु— अप्रतिष्ठा, दुर्लौकिक.
बे-अिमान— कपटी.
बे कायदेशीर— नियमबाह्य.
बे-कार— बिन-काम.
बे-कारी— बिन-कामी.
बेगमी— पुरवठा, सङ्ग्रह.
बेगारी— वेठीचा.
बे-गुमान— अविचारी अुन्मत्त.
बे-चिराख— अुजाड, अुध्वस्त, ओस, ओसाड.
बे-जबाबदार— अविचारी.
बेजार— त्रस्त.
बे-दर्कार— अविचारी, निष्काळजी.
बे-दम— निपचीत.

बेदिक्कत– बेधडक.
बे-पर्वा– अविचारी, अुन्मत्त.
बे-फाम– धुन्द, अुन्मत्त, अनावर.
बे-फिकीर– निष्काळजी, निश्चिन्त.
बे-बन्द– बन्धनातीत.
बे-मालूम– गुप्तपणें, संशयातीत.
बे-मुर्वत– निर्भीड, अुद्धट.
बेरीज– संयोजन, मिळवणी.
बे-वकूब– मूर्ख, अजागळ.
बे-वारशी– ज्याला धनी नाही असें.
बे-शक– निःशङ्कपणें, निस्संशय.
बे-शरम– निलाजरा, निर्लज्ज.
बेश– चाङ्गलें, अुत्तम.
बे-सुमार– अपरिमित, अमर्याद.
बेहद्द– निःसीम, अत्यन्त.
बेहेत्तर– श्रेयस्कर, भलें.
बे-होश– बे-शुद्ध, धुन्द.
भारदस्त– प्रतिष्ठित, ठेपराअीचा.
म्यान– कोष.
मक्ता– ठेका.
मक्तेदार– ठेकेदार.
मकान– घर.
मखलाशी– सारवासारव, मल्लिनाथी, समर्थन.
मगदूर– सामर्थ्य.
मगरूर– चढेल.
मगरूरी– चढेलपणा, ताठा.
मगज– गीर, सार.
मगर-मस्त– अुन्मत्त.
मजकूर– लिखित.
मज्बुती– बळकटी.
मज्बूत– बळकट.
मज्लस– बैठक, सभा.
मजल– दौड, पल्ला, धाव, चाल.
मजल दर मजल– सारख्या चाली करीत.
मजा– रङ्ग.
मजाल– प्राज्ञा, छाती.
मजुरी– मोल.
मजूर– मोलकरी, मोलारी, अङ्ग-काम्या.
मजेदार– चटकदार.
मत्लब– हेतु, तात्पर्य.
मत्लबी– आप्पलपोट्या, स्वार्थसाधू.
मदत– साह्य.
मदतगार– साहायक.
मदतनीस– साहायक.
मदार– भार, भिस्त.
मन्जुरी– होकार, सम्मति, मान्यता.
मन्जूर– सम्मत, मान्य.
मन-मुराद–मनसोक्त,पोटभर,यथेच्छ.
मना– आडकाठी, अटकाव.
मनाअी– आडकाठी, प्रतिबन्ध.
मनोरा– दिवेखाम्ब, दीपस्तम्भ, दीपमाळ.
मयत– मृत.
मर्जी– अिच्छा, लहर, कृपा, लोभ.
मर्द– पुरुष, शूर.
मर्दानी– पुरुषी.
मर्दुमकी– शौर्य.

मर्हूम— स्वर्गवासी.
मलूल—क्लान्त, निस्तेज, कोमेजलेला.
मशागत (शेताची) — कष्टसेवा.
मशाल— दिवटी.
मस्करी— थट्टा, टवाळी, कुचाळी.
मस्कऱ्या— विदूषक.
मस्त— धष्टपुष्ट, मत्त.
मस्तवाल— अुर्मट, माजोरी.
मस्ती— मद, माज.
मस्लत— योजना, कार्य, गोष्ट.
मसुदा— आराखडा, कच्चा खर्डा.
महशूर— सर्वश्रुत, सुप्रसिद्ध.
महसूल— अुत्पन्न, धारा, सारा.
महा— मास.
महामूर— भरपूर, विपुल.
महाल— मन्दिर.
महिना— मास.
माजी— पूर्वील, गत.
मातबर— भला, मोठा.
मातब्बरी— प्रतिष्ठा, थोरवी.
माफ— क्षम्य, सूट.
माफक— नेमस्त, बेतशीर.
माफी— क्षमा, सूट.
मामुली— सामान्य, किरकोळ.
मामूल-वहिवाट— सामान्य वहिवाट.
मायना— सम्बोधन पद्धति.
माया— पुञ्जी.
मार्फत— विद्यमानें, मध्यस्थीने.
माल— धन, सम्पत्ति.
मालक— धनी, स्वामी, यजमान.
मालकी— धनीपण, स्वामित्व.
मालीश— चम्पी, मर्दन.
माशूक— रमणीय, कमनीय, मारू.
मासला— वानगी, प्रकार.
माहिती— ठाअुकी, ज्ञान.
माहीत— ठाअुक, ज्ञान, विदित.
माहीतगार— जाणता, अनुभविक.
मिजान— प्रमाण, परिमिति.
मिजास— अैट, तोरा.
मिजाशी, मिजासखोर— मानी.
मिन्धा—ओशाळा.
मिनतवारीने— मनधरणीने, कष्टाने.
मिरास— दायभाग.
मिरासदार दायाद.
मिस्कील— लबाड.
मिळकत —धनसम्पत्ति.
मुक्रर— निश्चित, ठाम.
मुक्काम— वस्ती, बिऱ्हाड.
मुकाबला— सामना.
मुख्त्यार— अधिकारी, प्रतिनिधि.
मुख्त्यारी— प्रतिनिधित्व, अधिकार.
चा मुडदा पाडणे— चा प्राण घेणें.
मुत्सद्दी— राजकारणी, कारस्थानी, धूर्त, धोरणी.
मुत्सद्दी-गिरी— राजकारण, कारस्थान धूर्तता.
मुद्दा— हेतु, प्रश्न.
मुद्दाम— बुद्ध्या, बळें.
मुद्देसूद— प्रमाणशुद्ध.
मुदत— वेळ, अवधि, सवड.

मुन्सफ— निवाडे-करी.
मुब्लक— पुष्कळ, अमाप.
मुभा— अनुज्ञा; मोकळीक.
मुर्दाड— मृतवत्;भ्याड; मृत प्राण्याचें मांस.
मुर्वत— भीड.
मुरब्बी— तज्ज्ञ.
मुलाखत— भेट-गाठ; सम्भाषण.
मुलाजा— भीड-मान.
मुलूख— प्रदेश; देश.
मुलूख-गिरी— दिग्विजय.
मुलूख-मैदान— बोल-भाण्ड.
मुश्किल— कठिण;अडचण; सङ्कट.
मुश्किली— अडचण; पञ्चाईत.
मुशाफर— प्रवासी; वाटसरू.
मुशाफरी— प्रवास.
मेख— खुण्टी; रहस्य; अिङ्गित.
मेजवानी—महाभोजन; समाराधना, जेवणावळ.
मेवा— फळ.
मेवेकरी— मिठाओी-करी.
मेहनत— कष्ट, परिश्रम.
मेहनताना— कष्टावळ.
मेहनती— कष्टाळू.
मेहेर-नजर— कृपादृष्टि.
मेहेरबानी— कृपा.
मैदान— पटाङ्गण.
मैफल— गाणेंवाणें, बैठक.
मोका— समय; सन्धि.
मोत— मरण; परम सङ्कट.
मोताद— महाग.
मोबदला— परत-फेड.
मोसम— काळ, ऋतु.
मोहबत— भीड.
मोहोर— मुद्रा.
मोहोरबन्द— मुद्रा-बद्ध, लाखबन्द.
मोहरेदार (कागद)— गुळगुळीत.
मोहीम— पराक्रमण; धावणी.
मौज— गम्मत.
यन्दा— यावर्षी.
याद— आठवण.
याद, यादी— जन्त्री, सूची.
यार— मित्र.
रकम— धनसङ्ख्या.
रकाना— स्तम्भ.
रग— मद; माज.
रगेल— चढेल; मत्त.
रङ्ग-महाल— विलासमन्दिर.
रङ्ग-रोगण— तेल-पाणी.
रजओी— दुलओी; लेप(पाङ्घरायचा).
रजा— सुटी, निरोप.
रन्जणें—गान्जणें.
रञ्जीस येणें— गान्जणें.
रतीब— अुकाडा (दुधाचा).
रद्द— अमान्य.
रद्दी— टाकाअू; टाकाअू कागद.
रद-बदली— शिष्टाओी; भीड-वेंच.
रफू करणें— तुणणें.
रुबाब— अैट; ठसठशीतपणा.
रब्बी— वैशाखपीक.

रयत– प्रजा.
रवानगी– पाठवणी; पाठवणूक.
रवाना– चालू.
रस्ता– रथ्या; सडक; बिदी.
रस्तेबन्दी– सडक-बान्धणी.
रसद– धान्य, सामग्री.
रसीद– पावती; पोंच.
रहदारी– येजा, वाहतूक, वर्दळ.
राजरोस– दिवसाढवळ्या, अुघडपणें.
राजी– अनुकूल.
राजी-नामा– सोडचिठ्ठी, त्यागपत्र.
राबता– परिपाठ.
रास्त– अृजू, सरळ, योग्य.
रिवाज– पद्धत, वहिवाट, रूढि, चाल.
रिसालदार–घोडदळाधिपति.
रिसाला– घोडदळ.
रीत-रिवाज– चाल-रीत.
रुजवात– भेट, खरें-खोटें.
रुजू–प्रविष्ट.
रुबरू– समक्ष.
रु-माल– तोण्डपुसणें.
रोख–मोहरा, कटाक्ष.
राखा–प्रमाणपत्र.
रोगण–तेल; तेलिया रङ्ग.
रोज–दिवस; प्रत्यहीं.
रोजगार–अुद्योग-धन्दा.
रोजी– दिवसाला; दिवस-वेच.
रोशनाअी–दिवे-बत्ती; लखलखाट; दीपोत्सव.
लकब–ढब.
लगामी–अधीन.
लङ्गडा–पाङ्गळा.
लङ्गडणें–पाङ्गळणें.
लङ्गोट-यार– बाळ-मित्र.
लज्जत–स्वाद, चटक.
लज्जत-दार– चटक-दार.
लवाजमा– परिवार.
लश्कर– सैन्य.
लश्करी– सैनिक.
लाचार–क्षीणोपाय, हतबल, असहाय.
लाचारी– असहायता; निरुपाय.
लायक– पात्र, योग्य, अनुरूप.
लायकी– पात्रता, योग्यता, कर्तृत्व.
लुच्चा– लबाड, सोदा, ठक.
लुच्चेगिरी– लबाडी, ठकाअी.
लुत्रा– चोम्बडा.
व– अन्, नि, न्, आणि.
वक्त, वखत– काळ-वेळ, प्रङ्सग.
वक्तशीर– वेळेवर, समयशीर.
वक्तशीरपणा– समयशीरपणा.
वकिली–शिष्टाअी, पक्षसमर्थन, कैवार.
वकील–पक्षसमर्थक, कैवारी, प्रतिनिधि
वकूब– शहाणपण, कर्तृत्व.
वग-वशिला– भीड-मध्यस्थी.
वगैरे– अित्यादि.
वजन– तोल, प्रतिष्ठा, छाप.
वजनदार– तोल-दार, जड, प्रतिष्ठित.
वजनी– तोली, जोखी.
वजा– विवर्जन.
वजा करणें– विवर्जणें.

वजा-बाकी— विवर्जन.
वजीर— प्रधान.
वतन— कुळभूमि, कुळ-वाडी.
वतनदार— कुळवाड-धनी.
वर्ख— तगट.
वर्चश्मा, वर्चस्व— वरमान, प्राबल्य.
वर्म— मर्म.
वरात— हुण्डी.
वह्शी— विक्षिप्त व्यक्ति.
वशिला— मध्यस्थी, भलावण.
वस्ताद— गुरु, मर्मज्ञ, निष्णात; धूर्त.
वस्ताद-गिरी— धूर्तपणा.
वसूल— आवक, अुगवणूक, अुत्पन्न.
वहिमी— संशयी, शङ्केखोर.
वहीम— संशय.
वाकब-गार— जाणता, तज्ज्ञ, कर्तृत्ववान्.
वाखा— पटकी, महामारी, नासवणी.
वाजवी— योग्य, सरळ.
वायदा— अवधीचें अभिवचन.
वारस— दायाद.
वारसा— दायभाग.
वारसदार —दायाद, धनी, कैवारी.
वास्तपुस्त— चौकशी, समाचार.
वासलात— विल्हेवाट, फडशा.
वाहवा— ओहो ! प्रशंसा, धन्यवाद.
विजार— चोळणा.
विलायती— विदेशी, युरोपिअन.
विहीर (!)— आड, बाव, बावडी, कुवा.
शक्ल— युक्तिजुक्ति.
शर्त— अट. बिनशर्त— बिन-अट.
शर्थ— पराकाष्ठा, सीमा.
शर्मिन्दा— ओशाळा.
शर्यत— घोड-दौड, पैज.
शहर— नगर.
शहामत— प्राज्ञा, छाती.
शाअी— मशी, शिरें.
शार— रोम.
शागिर्द— धोतरेंबडव्या.
शागिर्द-पेशा— परिचारक.
शाबास— धन्य !
शाबासकी— धन्यवाद.
शाबिती— सिद्धता, स्थापना.
शाबीत— सिद्ध, स्थापित.
शाबूत— अभङ्ग, बळकट.
शामदान— मेणबत्तीची ठाणवी.
शामियाना— डेरा.
शाहिरी— गोन्धळी,-लावणी. पोवाड्याची.
शाही— राज्य, राशी.
शाहीर— गोन्धळी कवि
शिक्का— मुद्रा, ठसा, छाप.
शिकस्त— पराकाष्ठा.
शिकार— सावज, पारध, मृगया.
शिकारी— पारधी.
शिताफी— चपळाअी, युक्ति.
शिपाअी— सैनिक, शस्त्रधारी, पट्टेवाला.
शिफारस— भलावण.

शिफारशी तट्टू– भलावणीचें घोडें.
शिर्का– आम्लासव.
शिरजोर– चढेल, डोअीजड.
शिरस्ता– रूढि, वहिवाट.
शिल्लक– शेष.
शिलकी– अुर्वरित.
शिल्शिला– सम्बन्ध.
शिवाय– वाचून, विना, वीण; आणि वर.
शिस्त– धरबन्ध, व्यवस्था.
शिस्तवार– पद्धतशीर.
शेखी– बढाअी, प्रौढी, अैट.
शेत-खाना– शौचकूप.
शेम्ला– सोगा (पटक्याचा).
शेर– बलिष्ठ.
शोख, शौक– आवड, नाद, छन्द.
शोखी– नादी, छन्दी, रङ्गेल.
स्वार– राअूत.
स्वारी– धावणी, पराक्रमण, आरूढ व्यक्ति.
सक्त– कठिण, कडक.
सक्ती– कडाका, बलात्कार.
सजा– शिक्षा.
सत्का– ओवाळणी.
सतावणें– सन्तापविणें, त्रस्त करणें.
सद्दी– सुदैव.
सदहू– अुपरिनिर्दिष्ट.
सनद– राज-पत्र, अधिकारपत्र.
सनदशीर– दण्डक-शीर.
सफर– यात्रा, प्रवास.
सफाअी– गुळगुळीतपणा, सहजता.
सफाअीदार– गुळगुळीत, नीटनेटकें.
सफेद– श्वेत, शुभ्र.
सफेता– पाण्ढरी.
सफेती– पाण्ढरी, चुनेपाणी.
सबब– कारण, निमित्त, म्हणून.
सबूर–हळुहळू, धीरे !
सबुरी– धीर, शान्तता, सावकाशी.
समशेर-बहाद्दर– तर्वार-शूर.
समअी– ठाणवी, खाम्बपणती.
सरकत– भागी.
सर्द– थण्ड, ओलसर.
सर्दार– महाराव.
सर्दारकी– महाराव-की.
सर्दी– थण्डी, ओलावा, पडसें.
सर्बत– रस-पाणी, पेय.
सर्बराही– व्यवस्था, पाहूणचार.
सर-हद्द–शीव, सीमा.
सरदणें– ओलसरणें, गारठणें.
सराअी– धर्मशाळा, पडशाला.
सराफ– नाणेपारखी, सोन्यामोत्याचे व्यापारी.
सरासरी– सामान्यप्रमाणें.
सल्ला, सल्ला-मसलत } मन्त्र, हितवाद.
सल्लागार– मन्त्री, सचिव, हितवादी.
सलामत– सुरक्षित.
सलामी– अभिवन्दन.
सलोखा– सख्याचार.
सवाल– प्रश्न, विचारणा.

सहल—फेरी, फिरती.
सहा- माही— षण्मास.
सहीं-सलामत— सुखरूप.
सही— स्वाक्षरी, सम्मति.
साजिन्दा— बजवय्या.
सादर करणें— प्रविष्ट करणें,
साधा— अनलङ्कृत, ऋजू, सरळ.
साफ— स्वच्छ, गुळगुळीत.
साफ सुफी— घास-पूस.
सामान— सामुग्री.
सामील— समाविष्ट, साहायक.
सालगिरे— वर्षगांठ, वाढदिवस.
साल— वर्ष.
साल-दर-साल— वर्षानुवर्ष.
सालाबादप्रमाणे-वार्षिक वहिवाटी-प्रमाणे.
सालीना— वार्षिक.
सालोसाल— वर्षानुवर्ष.
साहेब— स्वामी, प्रभु, राव.
साहेबी— थोरवी, सत्ता.
सुभा— प्रान्त, राज्य (सवतें).
सुमार— परिमाण, नियम, वेळ.
सुमारें— आगेमागे, जवळजवळ, लगभग.
सुरत— तोण्ड, मूर्ति.
सुरुवात— आरम्भ.
सुरू—चालू, आरब्ध.
सुस्त— मन्द, आळशी.
सुस्ती— जाड्य, आळस.
सुस्तावणें— आळसणें, मन्दावणें.

सैतान— दैत्य, राक्षस.
सोबत—सङ्गती, सङ्गत.
सोबती— सङ्गाती.
सौलत— सूट.
सौदा— व्यवहार, क्रयविक्रय.
सौदागर— व्यापारी.
हक्क— अधिकार, स्वत्व, प्राप्तव्य.
हक्कदार— अधिकारी.
हकनाक— अन्यायाने, विनाकारण.
हङ्गाम— ऋतु.
हङ्गामी— तात्कालिक.
हजर, हजीर—अुपस्थित.
हजरी, हजिरी—अुपस्थिति.
हजर-जबाबी—समयसूचक बोलणारा.
हजाम— न्हावी.
हजामत— श्मश्रू, भादरणूक; खरडपट्टी
हजार— सहस्र.
हद्द— सीमा,-पुढे हद्द (निरुपाय) आहे.
हप्ता— फेड-भाग.
हप्तेवारी— भाग-फेड.
हमखास— निश्चित.
हम-रस्ता— सार्वजनिक रथ्या.
हमाम-खाना—सार्वजनिक न्हाणीघर.
हमाल— ओझेकरी.
हमाली—ओझे-नेणावळ; वाहणावळ.
हमी— अुत्तरदायित्व, 'वक्तव्य'.
हमीदार— अुत्तरदायी.
हमेश— नेहमी, सदासर्वदा.

हयात— विद्यमान; आयुष्य.
हर-अेक— प्रत्येक.
हरकत—आडकाठी, अडथळा, आक्षेप, अडचण.
हर-हमेश— नेहमी, सदासर्वदा, सदान्कदा.
हरहुन्नरी— बहुगुणी.
हराम— निषिद्ध.
हरामखोर— लबाड; लफङ्ग्या.
हलगा— कडी.
हलगर्जी— हयगयी, निष्काळजी.
हल्ला— चढाअी, मारा.
हल्वाअी— मिठाअी-करी.
हल्ली— साम्प्रत, सध्या.
हलाकी— पडती, दैना.
हवा— शीतोष्णमान; वारें.
हवाअी जहाज— आकाश-तारूं.
हवापाणी— वारेंपाणी.
हवाल— स्थिति, वृत्तान्त.
हवाला— आधार.
हवाली— स्वाधीन.
हवा-शीर— वारें-शीर, वारें-शील; पवनशील.
हवेली— थोर घर.
हशील— भाडें, अर्थ, तात्पर्य.
हाल— अपेष्टा, दुर्दशा.
हाल-हवाल— वर्तमान.
हालोहाल— तावडतोब, क्षेपनिक्षेप, टाकोटाक.
हिक्मत— युक्तिजुक्ती, कावा.
हिम्मत—धैर्य, अुत्साह, महत्त्वाकाङ्क्षा.
हिशेब, हिशोब— गणना, गणती, आयव्यय.
हिशेबी— व्यवस्थित.
हिस्सा— वांटा. हिस्सेदार— वांटेकरी.
हिस्सेरशी— वांटणी.
हुक्का— गुडगुडी.
हुकमत— अधिकार, सत्ता.
हुकमी— अङ्कित, निश्चित.
हुकूम— आज्ञा.
हुकूम-नामा— निवाडा-पत्र.
हुज्जत— वाद, वादङ्ग, घासाघीस.
हुज्जतखोर— वादङ्गी.
हुजऱ्या— परिचारक.
हुजूर— स्वामी.
चे हुजूरास— चे सेवेशी.
हुद्दा— पदवी.
हुद्देदार— अधिकारी.
हुन्नर— कला.
हुशार— बुद्धिमान, तरतरीत, चुणचुणीत, सावध, दक्ष, टवटवीत.
हुशारी— बुद्धिमानता, तरतरी, सावधानता, दक्षता, टवटवी.
हूल— ओरड, भुमका.
हेलकरी— ओझेकरी.
हैराण— त्रस्त.
हैवान— पशु, प्राणी.
हौद— टाकें
हौशी— रसिक, रङ्गेल.
हौस— अिच्छा, आवड, नाद.